मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला
पुस्तक १०३ रें

# जीवनयोग



लेखकः—
श्रीयुत भालचंद्र.



प्रकाशक—
मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी.
गिरगांव, मुंबई.

किंमत १-०-०

# अनुक्रमणिका

# जीवनयोग

## ( एक अध्यात्मकथा )

### प्रकरण पहिलें

### प्रवेश

उन्हाळ्याचे दिवस, अनाथ बालिकाश्रमांतील मुली सुट्टीनिमित्त आपापल्या घरीं जाऊं लागल्या, तों तों मला अधिकाधिक उदास वाटूं लागलें. आधींच मी उदासी ! दहाव्या वर्षी, लग्नानंतर सात आठ महिन्यांत प्लेगांत माझा संसार आटोपलेला ! त्यावर वर्षाभरानें माझे आईबाप प्लेगालाच बळी पडलेले ! माझ्या वडिलांचा आणि अनाथ बालिकाश्रमाच्या संस्थापकांचा जुना स्नेह; त्यामुळें त्यांनीं मला आपल्या आश्रमांत आणून लहानाची मोठी केली; व विद्यादान दिलें. ह्या त्रिभुवनांत 'माझें' ह्मणायला मला कोणी नसतां, त्यांनीं व त्यांच्या पत्नीनें दहा अकरा वर्षे पोटच्या पोरीप्रमाणें माझें संगोपन केलें; त्यांची उतराई मी होऊं तरी कशी, असें मला होऊन नुकतीच शेवटली परीक्षा होतांच मी त्यांच्या आश्रमाला वाहून घेतलेलें होतें ! माझ्या उपकारकर्त्यांचें कार्य तें माझें कार्य, अशा भावनेनें गेले चार महिने मी आश्रमांत शिक्षकिणीचें काम केलें व अनाथ मुलींच्या सहवासांत सुखी झाल्यें. तरी पण मनांतल्या मनांत, अंतःकरणांतल्या अंतःकरणांत उदासीनता दडून होतीच, ती कधींमधीं उसळी मारून बाहेर येई ! मुली आपापल्या घरीं जाऊं लागतांच सारा आश्रम मला शुष्क वाटूं लागला व ही उदासीनतेची छाया घनदाट होऊं लागली ! अखेर आपली आपण एकटीच ना ? हा कटु विचार कशाकडेहि चित्त लागूं देईना. ह्या सुटींत मी कितीतरी गोष्टी करण्याचें योजिलें होतें, पण आतां त्या मजकडून होणार तरी कशा ? अशा मनःस्थितींत मी चूर असतां उषेकडून एक चिठ्ठी आली. आम्हीं सारीं उन्हाळ्याकरितां महाबळेश्वरास जात आहों, तूं येतेस का ? तूं बरोबर असल्यास माझा काळ सुखाचा जाईल; नाहीं ह्मणूं नको. वगैरे लिहून बरोबर येण्याची तिनें मला ह्या चिठ्ठींत फार आग्रहाची विनंती केली होती.

उषा ही पुण्यांतले सुप्रसिद्ध विद्वान् सरदार श्रीमंत आप्पासाहेब यांची एकुलती एक मुलगी; वयानें माझ्याहून चांगली तीन चार वर्षांनीं लहान, ह्मणजे सतरा अठरा वर्षांची. तिची माझी ओळख प्रथमतः फीमेल हायस्कुलांत झालेली. अनाथबालिकाश्रमांत इंग्रजीचा वरचा अभ्यास होण्याची त्या वेळीं सोय नसल्यामुळें आह्मां वरच्या वर्गांतील विद्यार्थिनींची पुण्यांत रहाण्याची व फीमेल हायस्कुलांत शिक्षणाची सोय केली होती. उषा ही फीमेल हायस्कुलांतील विद्यार्थिनी. शाळेंत ती मजहून बऱ्याच खालच्या वर्गांत होती; तरी तिनें आपण होऊन माझी ओळख करून घेतली व पुढें आपल्या गाडींत मला घरीं नेण्याचा वरचेवर हेका घेऊन दोनचारदां घेऊनहि गेली होती ! पण यापेक्षां अधिक असा माझा तिच्याशीं प्रेमसंबंध नव्हता. यामुळें महाबळेश्वरास येण्याविषयीं तिनें इतक्या आग्रहानें लिहिलें होतें तरी जाणें मला बरें वाटेना ! ह्मणून, " मला येतां येत नाहीं; कामें आहेत; रागावूं नको." अशा अर्थी उत्तर पाठवून तिचे आभार मानून मी मोकळी झाल्यें होत्यें !

पण संध्याकाळीं पहात्यें तों उषेचे वडील श्री. आप्पासाहेब यांची स्वारी दत्त ह्मणून माझ्यासमोर उभी !

" हें बघ गीते ! तूं आलीस तर उषेला किती सुख वाटेल ह्मणून सांगूं ! तुला यायलाच हवें ! नाहीं ह्मणून चालायचें नाहीं ! तयारी कर; आज रात्रीं यायचें ! "

" पण–कामें बरींच आहेत ! " मी उत्तर दिलें.

" अग, कामें तर सर्वांच्याच पाठीस लागलेलीं आहेत जन्मभर ! पण त्याला करणार कसें ! उषेची

प्रकृति महाबळेश्वरच्या थंड हवेवांचून कांहीं सुधारणार नाहीं, ह्मणून डॉक्टरांचें ह्मणणें! शिवाय, माझीहि प्रकृति अगदीं ढांसळली अलीकडे! तेव्हां पहायचें आतां महाबळेश्वरच्या हवेनें कांहीं बरें वाटतें का? देव ह्मणतात तो तरी पहा कसा तो! सगळें कांहीं देतो; पण सुख कसें तें लागूं नाहीं देत जीवाला!"

मी कांहींच बोलल्यें नाहीं. "खरें कीं नाहीं मी ह्मणतों तें?" आप्पासाहेबांनीं विचारलें.

"मला काय कळतं आहे त्यांत!-पण त्याचा दोष देवाकडे कसा?"-मीं ह्मटलें.

"आमच्याचकडे?-तसेंहि असेल!-बरें तें राहो! येतेसना आमच्याबरोबर? पहा, उषेला फार आनंद होईल तूं आल्यानें!-चलच कशी!"

यावर काय बोलावें, तेंच मला कळेना! "पण बाई"-मी अडखळत ह्मटलें.

पणबिण नको! उषेला तिच्या आईच्यामागें दुसरें कोण आहे मोकळेपणानें बोलायला चालायला? आणि हें बघ तुझ्यावर भारी लोभ आहे तिचा! अगदीं वहिणीसारखा! तेव्हां तिचा हिरमोड करणें शोभतें कां तुला?"

माझा निरुपायच झाला! 'हो' ह्मणण्यावांचून गत्यंतरच उरलें नाहीं.

"उषेचा इतका हेकाच आहे तर येत्यें बापडी! पण आजच, आपल्याबरोबर नाहीं येत मी! माझी एक मैत्रिण, बाईचां, उद्यां सकाळच्या गाडीनें निघणार आहे; तिच्याबरोबर निघेन. मी बाईस तिच्याकडे दोन दिवस राहून पुढें महाबळेश्वरास येईन."

"कांहीं हरकत नाहीं! पण यायला चुकूं नको! आमच्या बरोबरच येतीस, तर बरें होतें! पण तुझ्या मर्जीप्रमाणेंच कां होईना!-ठरलेंच तर हें असें?"

"ठरलें!"

"पण बाईचा, तुझ्या मैत्रिणीच्या घरचा पत्ता कळू दे! तुला तेथून महाबळेश्वरास आणायला माणूस पाठवूं!"

यमुनाबाईच्या घरचा पत्ता मी कागदावर लिहून दिला.

"आणि नक्की कधीं निघशील तिथून?"

"आज रविवार!-गुरुवारीं सकाळीं बाईहून निघेन!"

"ठीक! गुरुवारीं सकाळच्या आंत माणूस येईल; त्याबरोबर निघून यायचें!-बरें! येतों आतां मी! आज रात्रीं आम्हीं जाणार! तूं उद्यां सकाळच्या गाडीनें इथून नीघच!"

"खास निघत्यें" असें मी आश्वासन दिलें व अप्पासाहेबांनीं माझा निरोप घेतला.

यमुनाबाई उद्यां सकाळच्या गाडीनें घरीं जायची होती. तिला माझा विचार ऐकून फार आनंद झाला. नंतर रात्रीचें जेवण आटपून, लागलीच मी आपल्या खोलींत जाऊन एकटीच बसल्यें. काय कारण असेल देव जाणे? श्री. आप्पासाहेबांनां 'हो' ह्मटल्या वेळेपासून माझ्या वृत्तींत एकदम एक प्रकारचा उल्हसितपणा संचारला. त्या उल्हसित वृत्तीचा पूर्ण उपभोग घेण्याकरितांच हातावर पाणी पडतांच मी खोलींत जाऊन बसल्यें. नित्याप्रमाणें मैत्रिणीशीं गप्पा गोष्टी करण्यास थांबल्यें नाहीं! खरें ह्मटलें तर श्री. अप्पासाहेबांच्या आचारविचाराची व उषेच्या स्वभावाची मला ऐकून माहिती होती; तेव्हां त्यांच्या सहवासापासून मला सुख मिळेल, ह्या आशेनें मी उल्हसित होईन, असा संभवच नव्हता! मग माझी वृत्ति अशी एकदम उल्हसित कां बरें व्हावी? थोड्या वेळेपूर्वीची उदासीनतेची छाया पार मावळून जाऊन तिच्या जागीं अननुभूत अशा आनंदाचा संचार झाला! आनंदप्रकाशांत मी विहरूं लागल्यें! देवा, ही सुख-वृष्टि अशीच चालूं दे!-अशी त्या सौख्यमेघाची मी मनांतल्या मनांत करुणा भाकली! ह्या सुखप्रवाह कांहीं गूढ अध्यात्मिक कारणानें उत्पन्न झाला असावा, हें मी जाणून होत्यें! व ह्मणून विश्वांतील अखिल अधिभौतिक ऐश्वर्यलाभाहूनहि त्याचें मोल मला अधिक होतें! जगांत दुःखद असें कांहीं नाहीं, अशक्य असें कांहीं नाहीं, असें मला होऊन गेलें! त्या आनंद तेजांत दुःखाच्या अणुरेणुलाहि वाव नव्हता! त्या मनःस्थितींत माझे कित्येक तास निघून गेले. खोलीची खिडकी उघडून बाहेर वर दृष्टि टाकिली तो शुद्ध नील नभांतून असंख्य तारका तेजोमुख वितरीत होत्या! सर्वत्र शुष्क, शांत होतें! सर्व विश्व झोपीं गेलें होतें; किंवा गेल्यासारखें दिसत होतें, असें ह्मटलें असतां अधिक शोभेल! कारण अशा शांत निशा-कालींहि विश्वाचा अल्पांशच निद्रित असतो; बहुतांश जागृतच असतो! शांत शांत! जिकडे तिकडे नितांत शांत झालें होतें! एवढ्या विशाल ब्रह्मांडांत कशाच्याच ध्वनि ह्या वेळीं निघत नाहीं, ह्मणून मी कान देऊन ऐकूं लागल्यें! तों समोरच्या वृक्षगुच्छांतून व

त्यांच्या पलीकडून अस्फुट संगीतध्वनि निघताहेत व मजकडे त्यांच्या लहरीवर लहरी येताहेतसें मला वाटलें! हा क्षण ह्मणजे माझ्या आजवरच्या अध्यात्मिक तृष्णेच्या परिपूर्तीचाच क्षण होय, असें माझ्या मनांत आलें! पण दुसऱ्याच क्षणीं ते संगीतध्वनि एकदं येई-नासे झाले! तेव्हां, आज नाहीं उद्या, लवकरच ती परिपूर्ति खास होणार व तिचेंच हें पूर्वचिन्ह होय, अशी मी मनाशी गांठ बांधली. एरव्हीं आजच्या ह्या असाधारण सुखानुभूतीचा व ह्या संगीताचा अर्थ मी दुसरा काय करणार? भावि अध्यात्मिक सुखाची ही पूर्व सूचनाच होय, दुसरें काय?—अशी मनाची समजूत घालून मी खिडकी बंद केली आणि झोंपी गेल्यें!

झोंप अगदीं गोड, प्रगाढ लागली. सकाळीं जागीं होतांच निघण्याची तयारी केली; गाडीच्या वेळेवर दोघीजणीं स्टेशनावर जाऊन तिकिटें काढून बायकांच्या डब्यांत बसलों. डब्यांत दुसऱ्या कोणीहि बायका नस-ल्यामुळें मोकळेपणानें गप्पागोष्टी सांगायला येतील, याचा आह्माला आनंद झाला. गाडी सुटण्याला थोडासा अवधि होता; प्लॅटफार्मवर कांहींजण उगीच इकडून तिकडे हिंडत होते व निष्कारण डब्यांत डोकावून पहात होते. त्यांनां पाहून यमुनाबाई ह्मणाली, "हीं असलीं माणसं पाहिलीं किनई गीते, ह्मणजे आपण सारीं पूर्वी पशुपक्षी होतों खास, असं वाटतं मला!"

"तें कां?" मी विचारिलें.

"तो बघ, तो आतांच आपल्या डब्यांत डोकावून गेलेला गृहस्थ! कशी अगदीं गिधाडासारखी मुद्रा दिसते त्याची! दुसरा एकजण आतां इतक्यांत गेला इकडून, तो थेट अगदीं गाढवासारखा दिसला मला."

"तुझं आपलं कांहीं चमत्कारिकच!"

"नाहीं ग! पण तुला नाहीं वाटत असं? कांहीं माणसांच्या मुद्रा इतक्या थेट पशुपक्षांसारख्या दिसतात, कीं, तीं नुकतींच त्या कोटींतून मानव कोटींत आलीं असावींत. किंवा आपल्या जुन्या पुनर्जन्माच्या कल्पने-प्रमाणें पुढल्या जन्मीं तरी खास पशुपक्षि होणार, असं आपलं मला वाटतं! कुविचारी, दुराचारी, माणसं खालच्या जन्माला, हिंस्र पशुपक्षांच्या जन्माला जातात, असं तूंच नेहमीं ह्मणत असतेस ना? मग हीं माणसं त्याच पुढल्या जन्माची तयारी करीत नसतील ह्मणून कशावरून? नि हीच त्यांची अधोगति मला तर बाई त्यांच्या मुद्रेंत स्पष्ट उमटलेली दिसते!"

"खरं-खरं, आहे तूं ह्मणतेस तें! मलादिखील कितीदा असंच वाटतं" असें मी ह्मटलें, इतक्यांत गाडी सुटली. पुनर्जन्माच्या प्रश्नावर यमुनाबाईचे व माझे अनेक वादविवाद पूर्वी झालेले होते व त्यासंबंधीं परस्परांचे विचार परस्परांनां चांगले ठाऊक होते; ह्मणून त्या विषयावर अधिक बोलणें यावेळीं झालें नाहीं. गाडी जोरांत चालली; एकामागून एक अशीं अनेक स्टेशनें गेलीं व दुसऱ्या अनेक गप्पागोष्टी निघाल्या. एके ठिकाणीं शेतांत पांखरें भांडत होतीं, तीं पाहून यमुनाबाई ह्मणाली "या जगांतले अणुरेणूहि एक प्रकारचा संग्राम करिताहेत! कृमिकीटक, जीवजंतू, पशुपक्षि, सारीं हा संग्राम करिताहेत! यालाच जीवन-संग्राम ह्मणतात. माणसामाणसांत ह्या जीवन-संग्रामाबरोबर आणखीहि एक उच्च प्रकारचा संग्राम चालला आहे! सत् आणि असत्, चांगलें आणि वाईट, पाप आणि पुण्य, ह्यांचा संग्राम आपल्या मनांत चाललेला असतो! असत् जिंकून सत् विजयी करा-वयाचें, हाच या सर्व संग्रामांचा हेतू आहे! अगदीं अंतापर्यंत हा संग्राम असा चालावयाचा!"

"अंतापर्यंत? पण आपल्या जीवनाला अंत कुठं आहे?"

"खरंच का तुला वाटतं, कीं या जीवनाला अंत असा नाहींच, तें अनंत आहे ह्मणून?"

"वाटतं ह्मणून काय विचारतेस? तशी माझी पक्की खात्री आहे!"

"तसंच जर असेल, तर हा संग्रामहि अनंतच ह्मणायचा!—नि काय ग, मग आपला जीव या संग्रा-मानें थकूनभागून कंटाळून नाहीं जाणार?"

"देव थकूनभागून कंटाळून जाईलसं वाटतं तुला?"

"खरंच वाटतं! हा सगळा जगड्व्याळ कारखाना अखंड चालवायचा त्याला तरी कंटाळा नाहीं का येणार?"

"नाहीं ग! त्याला कंटाळा कसा येईल? देवाला कंटाळा आला कीं, अंतच झाला सगळ्या ब्रह्मांडाचा, नि जीवनाचा!—नाहीं का?"

"खरंच गडे!"—असें ह्मणून यमुनाबाई थोडा वेळ स्तब्ध झाली. यावर आणखीहि आमच्या कितीतरी गप्पागोष्टी झाल्या. संध्याकाळच्या सुमारास गाडी वाठार स्टेशनवर आली. आह्मीं उतरून बाईच्या

टांग्यांत बढलों व रात्रीच्या जेवणाला बाईस यमुनाबाईच्या घरीं येऊन पोंचलों.

यमुनाबाईच्या घरीं तिची आई, एक बंधु, त्यांचें कुटुंब व लहान मुलगा, एवढींच माणसें! बंधू वकील होते. दहा वर्षांपूर्वी, यमुनाबाईच्या लग्नानंतर वर्षाभरानें, तिचा नवरा बापावर रागावून हिमालयांत निघून गेला होता व तिकडे तो तपस्वी झाल्याची बातमी चारपांच वर्षांपूर्वी आली होती. ती कळतांच यमुनाबाईच्या बंधूंनीं तिला माहेरीं आणून अनाथबालिकाश्रमांत ठेविली. मजपेक्षां दोन वर्षांनीं ती मोठी होती. वाचनाची व स्वयंविचारणेची संवय तिला दांडगी असल्यामुळें तिचे विचार प्रगल्भ व पोक्त असत! तिच्या घरीं माझे हे दोन दिवस मोठे मजेंत गेले. बुधवारीं संध्याकाळीं महाबळेश्वराहून श्री. आप्पासाहेबांचा मनुष्य मला नेण्याकरितां आला. गुरुवारीं उजाडतांच मी त्याच्याबरोबर महाबळेश्वरास जाण्याकरितां निघाल्यें.

"हें बघ, तुला सांगून ठेवित्यें गीते! उषेला तरी तुझा कंटाळा येईल, नाहीं तर तुला तरी उषेचा कंटाळा येईल! कांहीं झालें तरी तुला लौकरच परत यावें लागणार! नि आलीस, कीं, मग आपण सगळी सुटी इथंच मजेंत काढूं! पण इथंच ये हो! नाहींतर जाशील परभारें निघून!" "नाहीं जाणार ग!" ह्मणून मी टांग्यांत पाय ठेविला. सह्याद्रीच्या चढणीला लागल्यावेळेपासून मी रम्य–उदात्त पर्वतश्री व वनश्री पहाण्यांत जी दंग होऊन गेल्यें, ती महाबळेश्वरास मुंबई–पॉइंटवरील श्री. आप्पासाहेबांच्या बंगल्याशीं आल्यें, तेव्हां भानावर आल्यें! श्री. आप्पासाहेब व उषा माझी वाट पहात बंगल्यापुढील बगीच्यांत उभीच होतीं.

"या गीताबाई!"–ह्मणून श्री. आप्पासाहेबांनीं माझें स्वागत केलें. मी खालीं उतरतांच उषेनें माझ्या हातांत हात घालून "बाई नि यमुनाबाई तुला बरीच मानवलेली दिसतात ग!"–असे हंसत हंसत उद्गार काढले! "या प्रांताची हवाच बाई चांगली!"–असें मी उत्तरादाखल कांहीं तरी बोलायला हवें ह्मणून बोलल्यें! आम्ही बंगल्यांत एका दिवाणखान्यांत आल्यावर "चहा घ्यायला येतो हं मी गीताबाई" असें ह्मणून श्री. आप्पासाहेब दुसऱ्या दालनांत गेले. "तुझ्या खोलींतच चल गडे एकदम" ह्मणून उषेनें मला एका प्रशस्त खोलींत नेली.

खोली कसची, दिवाणखानाच तो! त्याच्या अगदीं मध्यावर रेशमी पडदा टांगून त्याचे दोन भाग केले होते. एका भागांत भिंतीशीं एक टेबल, त्यावर मोठासा आरसा व पुष्पकलश वगैरे सामान असून, मध्येंच एक वाटोळें टेबल व त्यासभोंवतीं मखमाली गादीच्या खुर्च्या व इझिचेअर्स ठेविलेल्या होत्या. दुसऱ्या भागांत एक मोठा पलंग व एक इझिचेअर इतकेंच सामान होतें. सर्व दिवाणखान्याभर मऊ गालीचा अंथरलेला असून, खिडक्यांना सुंदर पडदे व भिंतीला तसबिरी टांगलेल्या होत्या. एकंदरींत ही खोली मला गोस्कर व सुखकर व्हावी अशी सर्व व्यवस्था केलेली होती. मी सभोंवार दृष्टि फेकून ती नीटपणें पहात्यें आहे तों "बघ आप्पा नि डॉक्टर इकडेच आले!"–असें उषा ह्मणाली. मी वळून दाराकडे बघत्यें तो श्री. आप्पासाहेब व दुसरे एक गृहस्थ आंत आले. त्या दुसऱ्या गृहस्थांना पहातांच मला कसेंसेंच वाटलें! कां तें देव जाणें!

प्रकरण दुसरें

## विद्युन्मंदिर

श्रीमंतांनीं आंत येतांच त्या गृहस्थाकडे बोट करून मला ह्मटलें, "हे डॉक्टर भास्करराव! विलायतेहून नुकतेच परीक्षा देऊन आलेले आहेत. यांचेंच औषध उषेला नि मला चालूं आहे. ह्मणून यांना बरोबर आणलेले आहेत. यांच्याशीं अगदीं मोकळेपणानें वागायचें, बरें का? हे आपल्यांतलेच आहेत!"

भास्कररावांनीं चमत्कारिक स्मित केलें व एका आरामखुर्चीवर अंग टाकलें. श्री. आप्पासाहेबहि दुसऱ्या एका आरामखुर्चीवर पडले: तों चहा, बिस्किटें, फळें वगैरे टेबलावर येऊन पडलीं.

"बैस गीते, आतां चहा घेऊं!" ह्मणून उषा भिंतीजवळील टेबलाशीं खुर्चीवर बसली: व मीहि दुसऱ्या एका खुर्चीवर बसल्यें. चहापान सुरू झालें. मी कांहींच बोलल्यें नाहीं: मुकाट चहा घेत होत्यें. भास्कररावा

मधून मधून भ्रुकुटी वक्र करून चष्म्यावरून मजकडे पहात होते. त्यांना पहातांच मला जसा त्यांच्याविषयीं एक प्रकारचा तिरस्कार वाटूं लागला होता, तसा त्यांनाहि मजविषयीं वाटत असावासें दिसलें. त्यांचें वय अठ्ठा-वीस तीसपर्यंत असावें: डोळे घारे, भिंवया जाड, वर्ण गोरा, बांधा कृश व ठेंगणा: हे गृहस्थ समोर नसतील तर बरें, असें मला कां बरें वाटावें याचें मला गूढ पडलें.

मला गप्प बसलेली पाहून आप्पासाहेब म्हणाले, "कां कंटाळून नाहींस ? प्रवास त्रासाचा नाहीं ना वाटला ?"

"छे, मुळींच नाहीं. उलट, मजेचा झाला. इकडचें हें सृष्टिसौंदर्य पाहून तर भारी-भारी आनंद झाला."

"सृष्टिसौंदर्य ! सृष्टिसौंदर्याच्या भोक्त्या दिसतां तुम्ही !" तिरस्कारपूर्ण दृष्टीनें मजकडे पहात भास्कर-रावांनीं उद्गार काढले.

"म्हणजे ? सृष्टिसौंदर्याची भक्त कुणाला असणार नाहीं ? ज्याला ती नसेल, तो हृदयशून्यच म्हणायचा ! आपल्याला ती नसावीसें दिसतें !"

यावर काय बोलावें, हें न सुचून भास्कररावांनीं चपापल्यासारखें केलें. व खिशांतून एक चिरूट काढून ओठांत ते धरून ठेवले ! हें पाहून आप्पा-साहेब म्हणाले, "आमच्या गीताबाई म्हणजे स्पष्टवक्त्या. त्यांची ही सर्व मतें ऐकून कॉलेजांतल्या माझ्या एका सहाध्यायाची मला आठवण होते ! त्यांचें नांव सुधाकर देशमुख ! मोठी चमत्कारिक त्यांची वृत्ति नि मतें ! देव, पुनर्जन्म वगैरे वगैरे झाडून साऱ्या खुळांवर त्यांची श्रद्धा ! योगवासिष्ठ, उपनिषदें वगैरेंच्या वाचनांत, नि प्राणायाम, समाधि वगैरेंत त्यांच्या रात्रीच्या रात्री जात असत ! त्यांचा बाप पंजाबांत कुठेंसा कॉन्ट्रॅक्टर होता ! मुबलक पैसा कमाविला होता त्यांनीं, नि तिकडेच या सुधाकरांचा जन्म झाला. त्यांची आई ते अगदीं लहान असतांच निवर्तलेली: बाप त्यांच्या बारा तेराव्या वर्षी वारला. त्यानें आपली सारी धन-दौलत, दहा बारा लाखांची, ट्रस्टींच्या ताब्यांत देऊन ठेविली होती. ती हे सुधाकर वयांत आल्यावर कॉले-जांत असतांच त्यांना मिळाली. त्यावेळीं ते ज्यूनिअर बी. ए. च्या वर्गांत होते. मीहि त्यांच्याच वर्गांत होतों. मजहून ते चांगले दोनतीन वर्षांनीं लहान. पण त्यांच्या गंभीर वृत्तिमुळें ते आम्हां सर्वांना मोठे वाटत. या गीतेची जशी आम्हांला कांहींशी भीति वाटते, तशी त्यांची वाटे. अभ्यासांत, तसाच क्रिकेट–टेनिस–बोटिंग वगैरेंतहि त्यांचा हातखंडा. एक दिवस काय झालें– वीस वर्षे होऊन गेलीं त्या गोष्टीला: पण मला ती अगदीं काल घडल्यासारखी आठवते. हां, कॉलेजांतलें आमचें शेवटलें वर्ष तें. रात्रीचीं जेवणें आटपून आम्हीं आपल्या खोलींत जात होतों. तों समोरून हे सुधाकर आले. बाकीची मंडळी त्यांना टाळण्याकरितां चट सारी आपापल्या खोलींत शिरली, आणि मीच एकटा सांपडलों त्यांच्या तावडींत. पण कंटाळलां नाहींत ना या चऱ्हाटाला ?" असें म्हणून श्रीमंत मध्येंच थांबले.

"छे ! मुळींच नाहीं ! चालूं द्यावें पुढें !" भास्कर-राव म्हणाले, तेव्हां श्रीमंत पुढें म्हणाले, "पुढें काय झालें ? मजजवळ येऊन माझ्या खांद्यावर त्यांनीं हात टेंकला: नि मला म्हणतात, "काय हो सरदार ! तुम्ही मंडळी मला पाहून अशी पळतां कां ? माझी तुम्हांला भीतिबीति तर नाहीं वाटत ?"–नि असें कांहीं चमत्कारिक हंसले, कीं सांगतां येत नाहीं ! मी म्हटलें, "नाहीं ! तसें नाहीं कांहीं." त्यावर ते म्हणतात, "माझी ही वृत्ति नि मतें तुम्हांला विक्षिप्तपणाचीं वाटत असावीत: म्हणून मला तुम्ही टाळीत असावेत ! पण हे पहा, तुमची मला कींव येते ! भारी कींव येते ! कारण तुम्ही भारी पाळण्यांत आहांत रे !" "तें कसें बुवा ?" मी विचारलें. "कसें तें सांगूं तुम्हांला ? पण वेळ आहे तुम्हांला, मी सांगतों तें ऐकायला आतां ?" "छे ! आतां वेळ नाहीं. मग केव्हां तरी ऐकूं." असें म्हणून मी जो निसटलों, तो पुढें केव्हांहि त्यांच्या दृष्टीस म्हणून पडलों नाहीं. त्या वर्षी ते बी. ए. तर झालेच: पण पहिल्या वर्गांत पहिले येऊन कित्येक बक्षिसें नि स्कॉलरशिपाहि त्यांनीं उपटल्या. नि त्यावर जे कुठें गेले, त्याचा अझून थांग पत्ता नाहीं. कुठें असतील, नि काय करीत असतील, कुणी सांगावें ? बहुतेक योगी, संन्यासी झाले असतील. नाहीं तर, गेलेहि असतील हा लोक सोडून ! आज एकाएकी ही मला त्यांची आठवण झाली. या गीताबाईवरूनच आठवण झाली. हिच्यासारखीच पहा त्यांची वृत्ति नि मतें. गीतेचाहि देव, दैव, पुनर्जन्म वगैरेवर विश्वास आहे, हें मला ठाऊक आहे ऐकून–काय, मी म्हणतों तें खरें कीं नाहीं गीताबाई ?"

"भारी धर्मभोळी आहे ती !" उषा मध्येंच म्हणाली–

“ दैव, पुनर्जन्म वगैरे गोष्टींवर खरेंच विश्वास आहे माझा. पण धर्मभोळी नाहीं हो मी उगे ! ” असें मी हंसत हंसत उत्तर केलें.

“ काय ! हीं पाखंडें तुम्हांला खरीं वाटतात ! तुम्ही एवढ्या शिकलेल्या त्या कसल्या मग ! ” असें भास्कर-रावनें उपहास दृष्टीनें मजकडे पहात मला विचारिलें.

“ आहे खरं बाई असं ! माझ्या प्रामाणिक समजुतीनें त्या गोष्टी जर मला खऱ्या वाटतात, तर त्याला मी काय करूं ? ” मी जरा ठासून म्हटलें.

“ पहा, मी म्हटलं तें ! आहे कीं नाहीं आमची मीनाबाई त्या सुधाकराच्याच मताची ! असो ! बराच वेळ झाला. मीतलाहि भूक लागली असेल. आतां उठावेंच.” असें म्हणून श्रीमंतांची स्वारी उठली; त्या-बरोबर डॉक्टरहि उठून त्यांच्याबरोबर गेले. “किनई, कपाळ दुखतें आहे माझें थोडें !” म्हणून उषाहि उठली.

त्यानंतर स्नानें-जेवणें झालीं. इतर मंडळी वास-कुर्शीला जातांच मी आपल्या खोलींत आल्यें. आप्पा-साहेबांनीं सांगितलेली सुधाकर देशमुखांची गोष्ट कांहीं केल्या माझ्या मनांतून जाईना, व त्यामुळें माझें चित्त कशाकडेहि लागेना. अशा मनःस्थितींत संध्याकाळ होऊन दिवे लागले व रात्रीचीं जेवणें झालीं. जेवणा-नंतर मी आपल्या खोलींत येऊन बसल्यें.

इतक्यांत एक चाकर खोलींत येऊन म्हणतो, “बाई-साहेब, ती पहा गम्मत.” त्यानें बोट केलें तिकडे मी खिडकींतून पाहिलें व आश्चर्यानें अगदीं थक्क होऊन गेल्यें !

बंगल्याच्या पूर्वेकडे जवळच सुमारें पाव मैलाच्या अंतरावर एक विद्युन्मंदिर ! संध्याकाळपर्यंत तें तेथें नव्हतें. नि आतांच कसें आलें ? असा मी अचंबा करत्यें आहे, तों उषा, भास्करराव व आप्पासाहेब वगैरे मंडळी घाईघाईनें आंत आली. “ मीनि, तो बघ चमत्कार ! तुला त्यांत विशेष वाटणार नाहीं म्हणा, पण आमची तर मति गुंग झाली आहे हें पाहून ! अग, संध्याकाळपर्यंत तिथें बंगलाबिंगला कांहींहि नव्हतें; नि आतांच ही विजेची रोषनाई केलेला बंगला आला कुठून ?”

आम्हीं सगळीं तोंडांत बोटें घालून मूकस्तंभाप्रमाणें त्या बंगल्याकडे व त्यावर लटकाविलेल्या असंख्य विद्युत् दीपमालांकडे पहात राहिलों. तों “बाई आंत माणसेंहि दिसताहेत ! तीं पहा !” असें उषा ओरडली ! आम्हीं डोळे ताणून पाहूं लागलों ! कांहीं आकृति बंगल्यांत इकडून तिकडे हिंडत असलेल्या खिडक्यांतून दिसत होत्या ! “काय हा चमत्कार ! म्हणावें तरी काय याला हीं माणसें नि हा बंगला असा आला तरी कुठून अचा-नक ? कीं जमिनींतून एकदम वर आला ?” असे उद्गार श्री. आप्पासाहेब मधून मधून काढीत होते. रात्रीचा अंधकार अधिकाधिक गडद होऊं लागला, तों तों तें विद्युन्मंदिर अधिकाधिक उज्वलित होऊं लागलें ! जव-ळच पाव मैलाच्या अंतरावर तें दिसत होतें, तरी त्याच्या व आमच्या बंगल्याच्या मध्यंतरीं एक खोल दरी असल्यामुळें अशा काळ्याकुट्ट रात्रीं तेथें जाऊन तो चमत्कार आहे तरी काय, हें प्रत्यक्ष पाहून येणें आम्हांला शक्य नव्हतें ! म्हणून, इथूनच त्याकडे पहात रहाण्यावांचून गत्यंतर नव्हतें.

याप्रमाणें पंधरा-वीस मिनिटें गेलीं असतील नस-तील तों एकदम त्या बंगल्यांतून गोड संगीत ध्वनीहि ऐकूं येऊं लागले. ते ध्वनि मानवी कंठाचे असावेत, कीं एखाद्या वाद्याचे असावेत, तें सांगतां येईना. पण ते किती तरी कर्णमनोहर होते ! आम्हीं सगळीं ते कान भरून ऐकत राहिलों. सुमारें पाऊणतास आमचे कान व डोळे जादूनें भारल्याप्रमाणें त्या चमत्काराकडे लागून राहिले. तों एकदम तो विद्युत्प्रकाश नाहींसा झाला व बंगला काळ्याकुट्ट काळोखांत गडप होऊन गेला. नाहीं म्हणा-यला, बंगल्यांत तीनचार सामान्य दिवे ताऱ्यां प्रमाणें लुकलुकत होते, तेवढेच. संगीत मात्र चालू होतेंच.

“ काय बाई चमत्कार तरी !” उषा उद्गारली ‘ “ चमत्कार खरा.” असें आप्पासाहेब म्हणाले “ कसचा आला आहे चमत्कार ? कोणा तरी विक्षिप्त कोट्याधिशाची करमणूक दिसते आहे ही.” डॉ. भास्क-रराव तिरस्कारानें हंसून म्हणाले. “तें खरें, पण कोट्या-धिश झाला, अगदीं लक्ष्मीपुत्र झाला, तरी असा चुटकीसरशीं बंगला कसा बांधील तो ?” आप्पा साहेबांनीं प्रश्न केला. “काय असेल, सांगवत नाहीं. असो. सकाळीं कळेलच काय गौडबंगाल आहे तें. चला, आतां झोपा सगळ्यांनीं.” असें म्हणून श्रीमंत निघून गेले. उषा, डॉक्टर व चाकरमाणसेंहि त्यांच्या पाठोपाठ गेलीं; व मी एकटीच खिडकींत उभी राहून त्या विद्युन्मंदिराकडे डोळे लावून, त्यांतून निघणारें तें संगीत कान भरून ऐकूं लागल्यें.

वारा मंदगतीनें वहात होता व त्याबरोबर महाबळेश्वर वनश्रींच्या तो स्वर्गीय सुगंध व त्याहूनहि स्वर्गीय असे ते विद्युन्मंदिरांतून निघणारे संगीतस्वर, हीं मजकडे वहात येत होतीं. मोहनीनें भारल्याप्रमाणें मी निश्चल उभी होत्यें. असे वेडें करणारे संगीतालाप मी आजवर कधीं ऐकिले नव्हते. घटकावर घटका गेल्या, तरी ते मोहक आलाप मी एकचित्तानें ऐकतच होत्यें. जणूं काय, ते केवळ मजकरितांच कोणी काढीत आहे, इतकी मी अगदीं पंचप्राण तिकडे लावून एकाग्रतेनें ऐकत होत्यें. शेवटीं त्या संगीतश्रवणाच्या तंद्रींतच मी खिडकीजवळून हलल्यें व पलंगावर जाऊन पडून निजून ते ऐकत राहिल्यें. त्या तंद्रींत कितीतरी मधुर कल्पना मनांत येत होत्या. किती गोड गोड सुखस्वप्नांचा अनुभव मी घेत होत्यें. बऱ्याच वेळानें तें संगीत मंद मंद होऊन शेवटीं अगदीं बंद झालें. तेव्हां मात्र मी एकदम भानावर आल्यें. गादीवरून उठून बसल्यें व तें खरोखरच बंद झालें कीं काय, हें पहाण्याकरितां कान देऊन ऐकूं लागल्यें. पण नाहीं. तें बंद झालेंच खरें. पुनः सुरू होत नाहींसें पाहून पलंगावरून उठल्यें व जाऊन खिडकी मिटली. पुनः वाटलें, नाहीं—खिडकी उघडीच असूं द्यावी. नाहीतर, पुनः तें सुरू झाल्यें तर आपण त्याला मुकूं. म्हणून खिडकी पुनः उघडली व त्या विद्युन्मंदिराकडे पाहिलें. सामसूम ! तें संगीत तर नाहींच, पण एवढा वेळपर्यंत चांदण्याप्रमाणें लुकलुकणारे ते दीपहि नाहींत. निश्वास सोडून मोठ्या जीवावर ती खिडकी शेवटीं मी मिटून घेतली व अंथरुणावर येऊन पडल्यें.

एव्हांना अर्धा अधिक रात्र उलटून गेली होती. अंथरुणावर पडल्यें खरी; पण तें मधुर संगीत माझ्या कानांत व मनांत सारखें घुमतच होतें. थंडी फार वाजूं लागली, म्हणून पांघरूण घेतलें व आतां झोंपी जायचेंच, असा निश्चय करून डोळे मिटले. क्षणार्धांत गोडगोड अशी झोंप आली. झोंप ! केवढ्या निर्मळ सुखाची जननी ती ! निद्रालोक म्हणजे दुसरा स्वर्गच ! आणि त्यांतलीं तीं दिव्य स्वप्नमंदिरें म्हणजे स्वर्गाचा स्वर्ग ! अशाच एका स्वप्नमंदिरांत मी आज प्रवेश केला. पूर्वी अनेकवार हीं स्वप्नमंदिरें मी पाहिलेलीं, हें खरें ! पण आज ज्यांत प्रवेश केला, त्याचें सौंदर्य केवळ अवर्णनीय ! वर उंचउंच डोक्यावर एक विशाल हीरक डंबरी पसरलेली. तिच्यांत उषःकालच्या मुग्ध अस्फुट तेजासारखें तेज सर्वत्र फांकलेलें. त्या डंबरींतून अगदीं उंचावरून अदृश्यपणें कोणीतरी व्याख्यान देत आहे. आणि त्या व्याख्यानाचा विषय काय ? तर प्रेम !

प्रकरण तिसरें

## स्वप्नसंदेश

ज्या वाणींतून तें व्याख्यान स्रवत होतें ती इतकी मधुर होती, कीं, जणूं काय सुधावृष्टीच होत आहे असें मला वाटलें. इतकी विशुद्ध, इतकी सोज्वळ व करुणामय वाणी मी उभ्या जन्मांत कधीं ऐकिली नव्हती !

" निद्रालोकीं स्वप्नमंदिरांत परिभ्रमण करणाऱ्या आत्म्या ! तुझें हें सारें शोधन, तुझे हे सारे श्रम प्रेमावांचून कसे सफल होणार ? निष्प्रेम, निःशब्द मूकतेंत तूं आणखी किती काळ बुडून रहाणार ?"

मी दृष्टि वर करून ही सुधामधुर वाणी कोणाची हें पाहूं लागल्यें, तों कोणीहि दिसेना.

" या जीवनसंगीतांत मुख्य सूर प्रेमाचा. त्या सुरावांचून सारें संगीत निःसार, बेसूर व मूक होय. ज्या प्रेमावर सर्व ब्रह्मांड चाललें आहे व जें परब्रह्माचाच निश्वास होय, जीवन होय, वैभव होय, व त्याच्या सच्चिदानंदाची परिपूर्ति होय, तें हें प्रेमच अमरत्वाचा प्राणभूत आहे. हे आत्म्या ! तुला ज्ञान हवें, सामर्थ्य हवें; पण या प्रेमाची तुला कांहीं जाणीव आहे का ?"

मी कंपित झाल्यें. या प्रश्नाला मला उत्तर देतां येईना ! माझ्या सभोंवार त्या सर्व मंदिरांत असंख्य चिद्व्यक्ति अदृश्यपणें वावरत आहेतसें मला वाटलें. आणि ज्या चिद्व्यक्तीनें हा प्रश्न मला केला तीहि दिसत नसल्यामुळें प्रत्युत्तर तरी कोणाला देऊं नि काय देऊं, हेंच मला कळेना !

" फार प्राचीन काळीं, अनेक युगांपूर्वी, ही भूमि ही दुःखभूमि—ब्रह्मांडसंगीताशीं एकतान होती. नादब्रह्माशीं तिचा सूर जमलेला होता. परंतु कालांतरानें

तिचा तो सूर ढळून ती तेजांतून तिमिरांत गेली. तेजांत पुनः जायचें सोडून तिनें ब्रह्मांडसंगीताशीं विसदृश असा भलताच एक सूर धरला आहे! तो सूर द्वेषाचा! प्रेमाचा सूर सोडून तिनें द्वेषाचा सूर धरिला आहे. प्रत्येक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राचा हेवा व तिरस्कार करीत आहे. प्रत्येक मानव दुसऱ्याशीं वैर करीत असून दुसऱ्याचा लाभ त्याला पहावेनासा झाला आहे. आणि सर्वांत दुःखाची गोष्ट ही, कीं, प्रत्येक धर्मपंथ दुसऱ्या धर्मपंथांना शिव्याशाप देऊन परमात्म्याचा कोप आपणावर बळेंच ओढून घेत आहे. प्रेमाचा सूर सोडून द्वेषाचा सूर या भूमीनें धरल्यामुळें ब्रह्मांडजीवनसंगीताशीं तिचा मेळ जमणें शक्यच नाहीं. द्वेषाचा स्वीकार या भूमीनें केल्यामुळें तिला सत्याहून असत्य बरें वाटत आहे. दयेहून मत्सर बरा वाटतो आहे. औदार्याहून स्वार्थ बरा वाटतो आहे. हे दुःखभूमि! तुझा विनाशकाल आतां जवळ आला आहे. आतां तरी ही द्वेषकक्षा सोडून देऊन त्या प्रेम-कक्षेंत प्रवेश कर!"

इतका वेळ मी निमूटपणें ऐकत होत्यें. थोडें भय वाटलें, तरी आतां मी बोलण्याचा प्रयत्न केला व अडखळत म्हटल्यें. "का बरें! आमचा नि ह्या भूमीचा नाश कां बरें होईल? अगदीं आरंभीं आम्ही जितकीं अल्पज्ञ होतों, तितकींच आजहि आहों, नाहीं का? मग सन्मार्ग सोडून असन्मार्गाचा अवलंब झाला, ह्यांत आमचा काय बरें दोष?"

निःशब्द!-माझ्या प्रश्नाला उत्तर येईना. मला गुद-मरल्यासारखें वाटूं लागलें. तों एकदम विजेच्या पट्ट्यासारखा पट्टा चमकला व ती वाणी बोलूं लागली.

"सन्मार्ग स्पष्ट रेखाटलेला आहे. सृष्टिधर्म तो दाखवितो आहे. सृष्टिधर्मानुसार कां चालूं नये? सृष्टि-धर्म सुटला, कीं विनाश हा ठेवलेला. सृष्टिधर्मापरता दुसरा मार्गदर्शक धर्म नाहीं. सृष्टिधर्मापरतें दुसरें मार्गदर्शक ज्ञान नाहीं!"

मी हात जोडिले. डोळे पाण्यानें भरून आले. मी म्हटलें, "हे चिद्व्यक्ति, मी अज्ञ. मला काय कळतें आहे, क्षमा कर, पण ज्या प्रेमाचा इतका वेळ महिमा गाण्यांत आला, तें परमात्म्याकडूनच जर ह्या भूमीला अद्याप लाभत नाहीं, तर तिचा तरणोपाय कसा होईल?"

पुनः निःशब्द झालें. पुनः ती विद्युत् चपला चम-कली व ती वाणी म्हणाली, "या भूमीला कसली भूक लागली आहे बरें? ईशप्रेमाची कीं स्वात्मप्रेमाची? ईशप्रेमाची भूक जर तिला लागलेली असती तर तिची मनीषा तृप्त झालीच असती. पण तिची भूक आहे स्वात्मप्रेमाची. तेव्हां तिची मनीषा तृप्त होणें दूरच राहिलें, पण परमात्म्यानें तिला जें कांहीं दिलेलें आहे. त्यालाहि तिला मुकावें लागणार हें निःसंशय होय."

मी निरुत्तर होऊन तशीच हात जोडून ऐकत राह

"खरें प्रेम म्हणजे आत्मप्रेम नव्हे. आपला आत्मा हा परमात्मस्वरूप आहे, प्रत्यक्ष परमात्मा नव्हे, तुला चिरंजीवन, अनंतजीवन पाहिजे आहे? तें तुला अनंत प्रेमांतच लाभेल. ज्या अनंत प्रेमानें तूं त्रिभुवनें हलवूं शकशील, ब्रह्मांडें निर्माण करूं शकशील, तें प्रेम म्हणजे एका आत्म्याचें दुसऱ्या आत्म्यावरील प्रेम. एका चिद्व्यक्तीचें दुसऱ्या चिद्व्यक्तीवरील प्रेम होय. आणि तें खरें प्रेम.

मी वर दृष्टी केली, तों तो अस्फुट सुग्ध प्रकाश स्फुट होऊं लागून कांहीं क्षणांनीं तें सर्व मंदिर उज्ज्वल दीप्तिमान प्रकाशानें भरून गेलें; व ती वाणी अधिक सखोल स्वर स्रवूं लागली.

"ज्या शक्तीला अनंत दिक्काल करतलामलकवत् होत, ती शक्ति हें प्रेमच होय! हें प्रेम स्वतःच्या सूर्यमाला, स्वतःच्या नक्षत्रमाला, स्वतःच्या ग्रहमाला केवळ इच्छा-मात्रें निर्माण करूं शकतें. त्याच्या मधुर स्मितानें अखिल सौंदर्य, अखिल आनंद हीं जागृत होतात. त्याचें जीवन चिरंतन असून, युगें हीं त्याच्या जीव-नांतील क्षण होत. तें दिक्कालातीत असून देश, धर्म वयमान, मृत्यु यांनां तें जुमानीत नाहीं. त्याचें दान शतगुणितरूपें त्याला परत मिळतें व त्याच्या सर्व इच्छा परमात्मा अनंतहस्तें पूर्ण करीत असतो."

ही अमृतवृष्टि मजकरितांच होत आहे का? कीं दुसऱ्या कोणाकरितां, त्या मंदिरांतील कोणा अदृश्य व्यक्तीकरितां होत आहे? असा मी आपल्या मनाशींच प्रश्न करीत हात जोडून उभी होत्यें.

"जीवनाचा मार्ग एकच, आणि तो प्रेममार्ग! ज्याचें प्रेम थोर, त्याचें जीवन थोर! ज्याला प्रेमाची किंमत नाहीं, तो जीवंत असून मेलेला. अमर होणें असेल, तर प्रेमाला आपलें तनुमन वहा. कारण, प्रेमावांचून परमात्मप्राप्तीचा प्रयत्न जरी अनंतकाल केलास, तरी तो निष्फळ होय."

या वेळीं एकदम एक धीर गंभीर संगीतलहरी माझ्या कानांवर येऊन आदळली. साश्चर्य सभोंवार पहात्यें, तों मंदिरांतील त्या शुभ्र धवल प्रकाशांत नानाविध रंगाच्या किरणरेखा चमकूं लागल्या व क्षणार्धांत त्या विभिन्नरंगी किरणसूत्रांचा इंद्रधनुष्यासारखा एक दीप्तिमान् पट बनला. त्या असंख्य सूत्ररेखा परस्परांना भेदून गेलेल्या दिसत होत्या.

" भिन्न मानवी जीवनांचीं आयुष्यरेखासूत्रें ही अशीं परस्परांत विणलेलीं, गुंतलेलीं, संलग्न झालेलीं असतात. अनंत तेजोकणांतून त्यांचा उद्भव व विकास झाल्यावर तीं विभिन्न होतात, पुनरपि एकमेकांस भेटतात; पुनः विभिन्न होतात, पुनः भेटतात! हें विभिन्न होणें व भेटणें, जे दोन जीव प्रेमरज्जूनें चिरकाल संलग्न होऊन रहावयाचे असतात, त्यांची भेट होईपर्यंत सारखें चाललेलें असतें. कित्येकदां केवळ बाह्य संस्कारामुळें व परिस्थितीमुळें हीं जीवनसूत्रें अशीच परस्परांत गुंतून जातात. पण हें त्या जीवांच्या दौर्बल्यामुळें व भीरुपणामुळें होत असतें, तथापि काल ही गुंतागुंत सोडवीतच असतो. जे दोन जीव प्रेमरज्जूनें चिरसंलग्न होऊन रहावयाचे असतात, पण बाह्य संस्कारामुळें वा परिस्थितीमुळें विभक्त असतात, ते कालांतरानें एकत्र होतात; व जडचैतन्यात्मक या अनंत स्थांत त्यांच्या जीवनसूत्रांची चिरंतन गांठ बांधली जाते. अशी एकदां त्या जीवांची गांठ पडल्यावर कालिकालांहि त्यांना वियुक्त करूं शकत नाहीं. कारण त्यांची ही लग्नग्रंथी विधिनियोजित असते, मानवनियोजित नसते. विभिन्न विगदश जीवांची मानवनियोजित लग्नग्रंथीच सुटत वा तुटत असते. प्रेमानें बांधलेल्या लग्नग्रंथी चिरकाल टिकत असतात, इतकें प्रेमाचें सामर्थ्य आहे. पण तें प्रेम धीरोदात्त, गंभीर व अचल असावें. आणा, भाका, शपथा त्यानें कालत्रयींहि मोडतां नये. प्रेम हें सर्वस्व वाटलें नाहीं तर तें शून्यवत् होय.

माझ्या दृष्टिपुढील तो तेजो रंगपट हलूं लागला. व हलतांहलतां एकदम सागरासारखा दिसूं लागला. त्याच्या लाटांच्या शिखा चित्रविचित्र रंगाच्या व तेजःपुंज असून त्या सर्व एकामागून एक मजकडेच धांव घेत आहेतसें मला वाटलें. अगदीं देहभान विसरून मी हें पहात्यें आहे, तों महा दीप्तिमान अशी एक लाट माझ्या पायाशीं येऊन आदळली व विभिन्न वर्णांचीं पांच सात पुष्पें माझ्या पायावर टाकून परत फिरली.

तीं पुष्पें मी तात्काळ उचलून अंगुलींत घेऊन पहात्यें, तों त्यांचा सुगंध व तेज हीं केवळ स्वर्गीय. सुरांच्या नंदनवनांतीलच तीं असें मला वाटलें.

" नंदनवनांतील अगम्य पुष्पांतील हीं पुष्पें, कधींहि न कोमेजणारीं व अमर अशीं हीं पांचसातच पुष्पें, सर्व मानवतेला पुरेशीं आहेत. अखिल मानवतेच्या प्रेमांतील हें प्रेम अनंतकाळाला पुरून उरेसें आहे. यांचें विकसन व्हायला किती काळ लागला. या प्रेमाची परिपूर्ति व्हायला किती काळ लागणार, तें सुरगणानांच ठाऊक. दिक्कालकाननांत असलीं पुष्पें वरचेवर फुलत नसतात. असलें प्रेम या ब्रह्मांडमालेंत वरचेवर उद्भवलेलें दिसत नसतें!"

तीं पुष्पें मी आपल्या हृदयाशीं धरून सकंपित पुढें ऐकूं लागल्यें.

" हे दुःखभागि, प्रेममार्ग सोडलास, पुढें तुझें कसें होईल? सौंदर्यानंदधामा भुलोला. तुजवरील मानव हे असे अंध कां? त्यांचे अंतर्नेत्र परमात्म्याकडे लागले, हृदयें आनंदोन्मुख झालीं व आत्मे प्रेमोन्मुख झाले, तरी दुःख त्यांना कसें तें शिवणारहि नाहीं व मृत्यूचें भय त्यांच्या वाऱ्यालाहि उभें रहाणार नाहीं."

मला बोलावेंसें वाटलें. मी ह्मटलें, " पण आह्मीं मर्त्य आहों, नाहीं का?"

" नाहीं! " ती वाणी गंभीरपणें ह्मणाली, "नाहीं. मृत्यु आहे कुठें! परमात्मा चिरंजीव आहे. आणि त्याच्यांतून फक्त चिरंजीवनच प्रवाहित होतें आहे. मग मृत्यु कोठून येणार! व मर्त्य कोण असणार?"

मी निरुत्तर झाल्यें.

" चिरंजीवनांतून मृत्यु कसा उद्भवेल? अनंत प्रेमांतून अनंत आनंदच उद्भवणार. स्थित्यंतर आहेच. उच्चतर देहधारणाकरितां उच्चतर जीवनाकरितां आत्म्याला स्थित्यंतरें आहेत. पण जीवन व प्रेम हीं चिरंतन अविनाशीच रहाणार!"

हृदयाशीं धरलेल्या त्या पुष्पांजलींवर डोकें टेकून मी तिला वंदन केलें. तत्क्षणीं तो विविधरंग किरणसागर अदृश्य झाला व मी सगूढ संगीत स्वर ऐकूं लागलें. त्या स्वराबरोबर ती वाणी पुढें ह्मणाली, "परमात्म्याचा हा प्रसाद नीट जपून ठेव. बहुकाल जें तुझें शोधन करतें आहे, त्याचा स्वीकार कर. स्वेच्छेनें वा परेच्छेनें त्याचा अव्हेर करूं नको. नाहींतर पूर्वापराधाचीच पुनरावृत्ति होईल. स्वप्नांतून जागृतींत जा. तिमिरांतून

तेजांत जा. मृत्युभयांतून जीवनांत जा. एकांतांतून प्रेमांत जा. आणि हा स्वप्नसंदेश हृदयाच्या हृदयांत ठेवून दे!"

व्याख्यानस्रोत बंद झाला. मंदिरांतील प्रकाश अंधुक होत होत थोड्याच वेळांत सर्वत्र अंधःकार झाला. तेव्हां मी डेंबरांतील त्या अदृश्य व्याख्यात्याला मोठ्या भक्तीनें नमस्कार करून व तीं पुष्पें हृदयाशीं घट्ट धरून परत यायला निघाल्यें. पण अंधकार इतका घनदाट, कीं कुठें जाऊं, नि कशी जाऊं, या विवंचनेंत पडल्यें! तों एकदम कोणीतरी प्रेमानें माझा हात धरून मला वाट दाखवीत आहेसें मला वाटलें. मी निमूटपणें त्या अदृश्य मार्गदर्शकाबरोबर चालल्यें. त्याबरोबर जात असतां माझ्या हृदयाकाशांत सूर्यप्रकाश पडून कुशंका व दुःख हीं पार नाहींशी झालींसें मला होऊन, माझ्या गतजीविताची रुक्षता व अपूर्णता मला स्पष्ट दिसूं लागली. हा अदृश्य मार्गदर्शक म्हणजे माझें जीवन पूर्ण करून त्याचें साफल्य करणाराच हाय, अशी माझी भावना झाली. या सुखद भावनेंत त्या घनदाट अंधःकारांतून मी किती काळ चालल्यें होत्यें, मला सांगवत नाहीं. वाटे, हा प्रवास असाच चिरकाल चालावा. पण इतक्यांत त्या काळोखांत गोड अशी उषःप्रभा-किरणें चमकूं लागून मी जागी झाल्यें, पहात्यें तों उषः-कालची वेळ. हृदयाशीं धरलेलीं तीं फुलें मी शोधूं लागल्यें. तों तीं फुलें नाहींत, तो अदृश्य मार्गदर्शक नाहीं, व डेंबरीहि नाहीं. तेव्हां मी भानावर आल्यें व त्या विलक्षण स्वप्नाचा विचार करीत तशीच गादीवर किती तरी वेळ पडून राहिल्यें. व्याख्यानांतील शब्द न शब्द मला आठवला. तें व्याख्यान म्हणजे माझ्या आध्यात्मिक ज्ञानतृष्णापूर्तीचा प्रस्तावच होयसें मला वाटलें. इच्छा बलवत्तर असली, की ती तृप्त झालीच पाहिजे, असा नियम आहे. त्याप्रमाणें माझ्या आज-वरच्या आध्यात्मिक तळमळीची शांति आतां खरोखरच होणार काय? असा मी मनाशीं प्रश्न केला. देव काय करील तें खरें: माझी तितकी तयारी झाली असेल, तर तो आज नाहीं उद्यां, तें सगळें करीलच करील. अशी मनाशीं गांठ बांधून मी गादीवरून उठल्यें

---

प्रकरण चौथें

# आकाशफूल

चाकरमाणसावांचून इतर कोणीहि अद्याप उठलें नव्हतें, त्यामुळें मी मुखमार्जनादि आटपून माझ्या खोलीच्या खिडकींतून समोरचा प्रातःकालीन रम्य देखावा पहात उभी राहिल्यें. बालार्काच्या कोमल किरणांनीं न्हालेलीं दूरवरचीं तीं उत्तुंग शैलशिखरें, सहस्र रंगपुष्पांनीं खुललेली ती महाबळेश्वराची वनश्री व तिच्यांतून वहात येणाऱ्या सुगंधयुक्त वायुलहरी आणि खगगायकांच्या आलापलहरी, या सगळ्यांचा सुखानुभव घेण्यांत मी रमून गेल्यें. इतक्यांत श्री. आप्पासाहेबांचे कारभारी रामभाऊ एकदम आंत येऊन विचारतात, "काय गीताबाईसाहेब, रात्रीच्या चम-त्काराचा मग काय उलगडा झाला अखेर?"

"रात्रीचा चमत्कार!" मी साश्चर्य उद्गारल्यें नि मग एकदम मला रात्रीच्या त्या विद्युन्मंदिराची आणि त्यांतून निघणाऱ्या संगीताची आठवण झाली. "हो-बाई—तो बंगला—दिसतो आहे का तो आतां?"

"छे! तो पहा, तिथें होता तो दिसतो आहे आतां तिथें?"—म्हणून रामभाऊंनीं दरीकडील टेंकाडाकडे बोट केलें. मी पहात्यें, तों खरेंच! तिथें कांहीं म्हणायला कांहींहि नव्हतें.

"चमत्कार आहे किनई हा?" रामभाऊंनी उद्गार काढले. इतक्यांत समोरून एक कातकऱ्याचें जोडपें येतांना दिसलें; त्यांना त्यांनीं हांक मारून हातांनीं खुणाविलें. क्षणभरांत फळें फुलें भाजीपाला घेतलेलें तें जोडपें बंगल्यापुढें येतांच रामभाऊ त्यांच्याकडे गेले. मीहि काय फळें फुलें आहेत, तीं पहायला राम-भाऊंच्या मागोमाग गेल्यें. रामभाऊंनीं तीं राजबेरी, स्ट्रॉबेरी, जांभळें, करवंदें इत्यादि रानटी फळफळावळ घेतली व मी रानफुलें घेतलीं. त्यावर रामभाऊ त्या कातकऱ्याला विचारतात, "कायरे, कातकरीदादा, या जंगलांत तूं रहातोस, तुला कधीं इथें बंगला दिसला विजेची रोषनाई केलेला—रात्रीचा?"

"व्हय तर दादा!" हेल काढीत तो कातकरी म्हणाला, "यकदाच पायलाय कायर मी दादा? शिम-ग्यापून रोज ह्यो जंगलांत कुठना कुठं दिसत्योच कालोकानन ल्यो बिजलीचा बंगला!"

"शिमग्यापासून ? ह्मणजे गेले दीडदोन महिने पहातों आहेस तूं तो ? कुठें कुठेंसा दिसतो तो ?" रामभाऊंनीं विचारलें.

"उच्या जंगलांत दिसतोय त्यो. आज हथं, उद्या थयं, काय नेम दादा तो कुठं दिसल त्योच ?"

"कधीं दिवसा दिसला का रे तुला तो बंगला ?"

"दिसा कसा र दिसल दादा ! बिजलीच्या कळीचा त्यो बंगला. रातचाच त्यो साहेब बनावतो र !"

"कुणाचा–कुणाचा बंगला तो ? साहेबाचा ?"

"साहेबाचा नाय त दुसरा कुणाचा र ?"

"कशावरून रे साहेबाचा ?"

"मी का पायला नाय त्यो दादा ? यो आतां घंटा-भरा आदीं भेटलानार मला त्यो साहिब."

"कुठें–कुठेंसा भेटला तुला ?"

"त्यो पलाडल्या खोऱ्यांत र. माझ्यापासनं फुलं घेतलीन त्यानं न दोन रुपय दिलन र त्यानं."

इतक्यांत कातकरणीनें पानांत गुंडाळून ठेविलेलें एक सुंदर फूल काढलें व माझ्या हातीं देऊन ह्मटलें, "बाय, यो घे तुला फूल."

त्या फुलाचा रंग अगदीं निळाभोर, आकाशासारखा असून गंध फारच मोहक व क्षणाक्षणास पालटणारा. आतां गुलाबाचा, तर दुसऱ्या क्षणीं जाईचा वा निशा-गंधाचा. आकार शेवंतीसारखा असून तेज कांहीं विलक्षणच.

"काय नांव ग बाई या फुलाचें ?" ह्मणून मी विचारितां ती कातकरी ह्मणाला. "ह्येला आकासफूल ह्मणतो ग आमी बाय. उच कड्या कपा-टांत ह्याचीं रोपीं. न रोप्याला फुलं दोनच. कदीमदी उगवतात हीं. रोज नाय. आज दोन गावलीं. तीं त्यो साहिबानं घेतलीं नि त्याचं दोन रुपय दिलान मला. त्योन एक ठेवून घेतलं. न यो दुसरं तुला वाटल त्योला दे. पैसा घेऊं नग म्हून म्हंगाला. म्हून तुला दिलय ग बाय. पैसाबिइसा नग ग मला त्योचा." ह्मणून तें जोडपें तडक निघून गेलें.

मी तें फूल केसांत खोवून आंत जाऊं लागल्यें, तों "त्या बंगल्याच्या चमत्काराची या कातकऱ्याला बरीच माहिती दिसते बरें का !" रामभाऊ ह्मणाले.

"चमत्कार कसला एवढा त्यांत ? तो कातकरीच ह्मणाला नाहीं का, तो कळीचा बंगला ह्मणून ? तसंच कांहीं असेल, दुसरं काय ?"

"तें खरें गीताबाईसाहेब. पण कळ असो, ह्मणून दिवसा कधीं न दिसणारा बंगला रात्रींचा असा एकदम उभा कसा करील ? चमत्कार नाहीं तर काय ह्मणावें याला ?" असें उत्तर करून ते आपल्या उद्योगाला गेले. मी दिवाणखान्यांत जाल्यें तों उषा माझ्या खोलीकडेच येत होती.

"मी आत्तां उठल्यें बाई. नि चहाला तुझ्याकडेच येत होत्यें. तुझं आपलं कांहीं निराळंच गडे. कशी इतक्या लौकर उठतेस, तुझं तुला ठाऊक." आम्ही खोलींत आलो. "किती छान ग तें फूल ! कसलं तें ?" माझ्या वुचड्याकडे पहात तिनें विचारिलें. "आकाश-फूल" ह्मणून कातकऱ्यानें सांगितलेली त्या फुलाची सगळी हकीकत मी तिला सांगितली.

"मोठं विलक्षणच बाई. रात्रीं किनई त्या बंगल्या-तल्या संगीतानें मला झोप कशी ती नाहीं लागली. केवढं मोठ्यानं चाललं होतं ग तें. नि सारखं अगदीं किती वेळ. भारी त्रास झाला त्यानं. डोकं उठलं माझं अगदीं." मला हंसूं आलें. "काय, त्रास झाला तुला त्या संगीतानें ? किती गोड होतं ग तें."

"गोड ! तुला सारंच गोड दिसतं. सगळ्याच गोष्टींनीं तुला आपला आनंद ठवलेला. हें कसं होतं बाई, तुझं तुला ठाऊक."

इतक्यांत चहा आला. चहा घेत घेत ती ह्मणाली "मला हें महाबळेश्वर आवडतच नाहीं मुळीं ! पण डॉक्टरांचा नि आप्पांचा आग्रह होता हवा हवी माझ्या प्रकृतीला ह्मणून. तेव्हां करणार कसं ? पण बरं कुठें वाटतं आहे मला इथं तरी ? त्यांतल्यात्यांत डॉक्टर बरोबर आले आहेत, हें तरी बरं आहे. नाहीं का ?"

"पगार देणार असाल त्यांना बराचसा ?"

"हो तर ! तीनशें रुपये दरमहा. पुण्याचा त्यांचा दवाखाना बंद रहाणार तोंवर ! तेव्हां ते आले ही मेहेरबानीच नव्हे का ? किनई ते भारी हुशार आहेत हो ! त्यांच्या उपचारांनीं मला किती बरं वाटतं पण !

"कांहीं विशेष उपचार चालू आहे वाटतं ?"

"हो ! विजेचा ! त्यांची विजेची पेटी किती छान आहे पण ! मुठी धरल्या कीं, अंगांत येऊं लागते वीज ! किती बरं वाटतं मला त्यानं ! पण किनई अगदीं थोडा वेळ. जराशानं पुनः पूर्ववत् थकल्या-सारखं वाटायला लागतं आपलं !"

"मग हा विजेचाच उपचार कां चालू ठेवला ? स्नेहमीचीं औषधं वगैरे कां नाहीं घेत ?" मी विचारलें.

"डॉक्टर ह्मणतात, एरव्हींच्या औषधांनीं प्रकृति सुधरायची नाहीं माझी ! या विजेनंच सुधरेल !"

"ती कशी ?"

"ते ह्मणतात, माझ्या अंगांतल्या रोगाचा नाश विजेनंच होईल ! दुसऱ्या कशानं नाहीं व्हायचा ! आपल्या अंगांत हे रोगजंतू कसे धाई बिन्हाड करितात, नि कारभार चालवितात, कांहीं कळत नाहीं !"

"तसंच आहे ! आपल्या अंगांत दोन प्रकारचे जंतू असतात, चांगले नि वाईट. चांगल्या जंतूंचें पोषण झालं, तर ते वाईटांना आंतून हांकून लावितात. वाईटांचें पोषण झालं, तर ते चांगल्यांना हांकून लावितात ! चांगले जंतू पोसून ते वाईटांना हांकलून देत असले, ह्मणजे प्रकृति चांगली असते. आणि वाईट पोसून ते चांगल्यांना हांकलून देत असले ह्मणजे प्रकृति वाईट असते. हें जसं आपल्या शारीरिक प्रकृतीचं, तसंच आपल्या मनाचंहि आहे हां. चांगल्या विचारांचें पोषण केलें, तर ते वाईटांना हांकून देतात. तसे वाईटांचें पोषण केलें तर चांगल्यांना हांकलून देतात. सुविचार पोसून ते कुविचारांना हांकलून देत असले, ह्मणजे आपली मनोवृत्ति कशी नेहमीं आनंदी असते. नि कुविचार पोसून ते सुविचारांना हांकलून देत असले ह्मणजे ती नेहमीं उदासवाणी, कंटाळा आल्यासारखी असायची."

"सगळं खरं ! पण आपल्या हातीं काय आहे तें ? शारीरिक काय, किंवा मानसिक काय, बहुतेक गोष्टी अनुवंशिकच असतात ह्मणून ह्मणतात नाहीं का ? मग तूं ह्मणत्येस, त्याचा कितीसा उपयोग ? आपले आईबाप, आजे पणजेच आपल्यांतल्या बहुतेक वाईट गोष्टींबद्दल जबाबदार नाहींत का ? बाई, त्यांच्यांतल्या वाईट गोष्टी आपल्यांत उतराव्यात, नि त्याबद्दल आपल्याला शासन भोगावं लागावं, काय तरी हा देवाचा न्याय ! मला तर वाटतं, कसला देव नि कसलं काय !"

हे तिचे उद्गार ऐकून मला वाईट वाटलें. मी विचारिलें, "काय तुला खरंच असं वाटतं ? अगदीं मनापासून असं वाटतं ?"

"कसं वाटतं, नि काय वाटतं, तुला सांगून काय उपयोग ? परदुःख शीतळ, हेंच खरं. असले किती किती पण वाईट विचार माझ्या मनांत येतात. अन्न पाण्यावांचून मरणारीं, दुःखांनीं गांजून गेलेलीं हतभागी माणसं जगांत किती - असंख्य आहेत. हा एकच विचार मनांत आला, तरी मी अगदीं वेडी होत्यें. नि वाटतं, कसला तो देव, नि कां त्याचं इतकं डव्हारं माजवितात ? तसंच जगांत दुःखं जर हीं अशीं पावलोंपावलीं ठेवलेलींच, सगळ्यांच्याच पाठी लागलेलीं, तर मग उद्योग तरी कशाला करायचा ? नि कां करायचा ? अशा किती तरी कल्पना मनांत येतात, अगदीं उदास करितात. हें असं अलीकडे माझं अगदीं नेहमीं होत असतं, गीते, नि ह्मणूनच तुला इथं यायचा इतका हेका धरला मी तो. ह्मटलं, तुझ्या सहवासानं तरी मी आनंदी व्हायला शिकेन. खरंच, सांग मला, तुझी वृत्ति इतकी आनंदी कशी असते ग ?"

ती अगदीं काकुळतीस आल्यासारखी दिसली. तिचे हात मी आपल्या हातांत घेऊन ह्मटलें, "उषे, त्यांत कांहीं मोठंसं कांहीं कठीण नाहीं हां."

खरं पाहिलं तर तुझं हें असं असायचं, तूं बालविधवा, जन्मविधवा ना ह्मणायची. पुढल्या सुखाची तुला काडीनेहि आशा नाहीं. असं असून तूं किती ग आनंदी नि उल्हसित असतेस. नि मी, सुदैवानं सगळं कांहीं आहे, पुढं सगळं यायचं व्हायचं आहे. असं असून अशी उदास नि कंटाळलेली कां बाई -" एकदम कांहीं सुचल्यासारखें करून ती ह्मणाली, "खरं सांगशील मला गीते !"

"काय तें ?" मी विचारलें.

"कीं पुनः संसार करायचा विचार आहे तुझा. नि ह्मणून पुढल्या सुखावर तूं अशी सुखी असतेस ? खरं कळूंदे मला."

मला तिचा भारी राग आला. जी गोष्ट माझ्या ध्यानीं मनींहि नव्हती, तिच्याविषयीं मला तिनें असा प्रश्न तरी कां करावा याचा मला अतीच राग आला. नि वाईटहि वाटलें. मी ह्मटलें, "उषे, माझ्या नाहीं ग बाई कधीं तसले विचार मनांत आले. खरंच नाहीं. अग, आनंदी वृत्तीला का कधीं, तूं ह्मणतेस तशी लग्नाची आशाच कारण लागते ? तसं असतं, तर तूं नये का आनंदी असूं ?"

"असावी खरी, पण तशी आहे का मी ? माझा आनंद दोन वर्षांपूर्वी जो मावळला, तो मावळला. आ लग्न झालं, कांहीं झालं, तरी तो फिरून येईलच, असं

कुणी सांगावं ?" असें म्हणून तिनें निश्वास सोडिला. मी विचारलें, "पण झालं तरी काय असं तुझा आनंद मावळायला ?"

"सांगू तुला ? नानासाहेब जहागीरदार ऐकून ठाऊक आहेत तुला ?" ती म्हणाली, त्यांच्या घरीं ठरलं होतं मला द्यायचं. त्यांच्या थोरल्यांनां, भाई-साहेबांनां. डेक्कन कॉलेजांत शिकत होते ते. सगळं कांहीं ठरलं, तिथीनिश्चय दिखील झाला. चार दिवसांवर आलं लग्न. तों ताप भरला त्यांनां, म्हणून तिथी पुढं ढकलली. पण तो ताप नवज्वराचा ठरून नवव्याच दिवशीं बाई आटोपलं सगळं. मला काय वाटलं तेव्हां, नि काय नाहीं, गीते तुला कसं सांगू ? त्यावेळेपासून जें उदास वाटतं आहे, तें हें आतांपर्यंत. काय करूं ग गीते ? कशानं वाटेल मला पहिल्यासारखं ?"

"हें बघ उषे !" मी म्हटलें, "देव जें कांहीं करतो, तें आपल्या बऱ्याकरितांच करीत असतो, समजलीस ? भाईसाहेबांनां नवज्वर लग्नापूर्वी झाला, नि त्यानं त्यांचा अंत झाला, तोच लग्नानंतर होता, तर काय झालं असतं बरं ? तेव्हां, झालं हेंच बरं नाहीं का झालं ? असा विचार करीत जा कशी. म्हणजे बरं वाटेल तुला हो."

उषा मजकडे सारखी पहात राहिली, कांहीं बोलली नाहीं. मी पुढें म्हणाल्यें, "नि दुसरं असं, तूं किनई प्रेम करायला शीक; म्हणजे बघ, तुझा हा उदासीनपणा गेलाच म्हणून समज. कधीं रहाणार नाहीं तो."

"प्रेम करायला शिकूं ? तें कसं शिकणार ? प्रेम करायला का कुठं शिकून येतं ?" उषा साश्चर्य म्हणाली.

"हो, शिकतां येतं तर. इच्छा मात्र पाहिजे. पण तुला तशी इच्छाच नाहीं. आपलं वाईट, अमंगल गोष्टींचंच चिंतन करीत बसल्येस. त्यावरचं, चांगल्या गोड सुखाच्या गोष्टी मनांत आणाव्यात, त्यांचं चिंतन करावं. सृष्टींतल्या सगळ्या सुंदर गोष्टी पहाव्यात. त्यांत मन रमूं द्यावं, त्यांच्यावर प्रेम करावं; फुलं, तारका, उषा, संध्या, चंद्रसूर्य, मेघमाला, वनराजि, पर्वतश्री, पशुपक्षि, निर्झरसागर, सगळ्यांवर झाडून प्रेम करायला लाग. म्हणजे बघ, तीहि तुला आपलं जीवन, आपलं सामर्थ्य, आपलं सौंदर्य द्यायला लागतील. कधीं रहायचीं नाहींत."

उषेनें स्मित करून म्हटलें: "तूं आपली एक कवीच आहेस, सगळ्यांची तुला आवड, नि सगळ्यांवर तुझें प्रेम, पण मला बाई नाहीं तें साधणार. आधीं आपल्या स्वतःकडेच पहा, म्हणून डॉक्टरचं मला सारखं सांगणं. मग या हजार गोष्टी मी कशा करणार ? नि त्या मला कशा होणार ? तें कांहीं नाहीं, तें सारं फुकट आहे मला."

"काय ? डॉ. भास्करराव सांगतात तुला, कीं दुसरं कशाकडे लक्ष देऊं नको म्हणून ?"

"नाहीं तर ? नि मीहि त्यांच्या सांगीप्रमाणें केलं नसतं, इतर हजार गोष्टींकडे लक्ष पुरविलं असतं, तर मुकलेंच असतें यापूर्वीच जिवाला."

तिचा हात मी आपल्या हातांत घेतला आणि म्हटलें, "उषे, तुझा रोग मला घालवितां येईल, तर किती बरं होईल."

"तूं का डॉक्टर आहेस, ती माझा रोग घालविणार ? डॉक्टर असतीस, तर मात्र मला तूं खास बरी करतीस. आतांच बघ, तुझ्याशीं बोलत बसल्यानं मला किती बरं वाटतं आहे.–पण गडे, जाऊं दे आतां वीज घ्यायला. ही वीज घ्यायची, म्हणजे तरी काय ? थोडं कुठं बरं वाटतं, इतक्याचसाठीं ! बाकी त्यानं माझी प्रकृति कितीशी सुधारणार तें पुरतं कळून चुकलं आहे मला."–असें म्हणून ती उठली. मीहि उठल्यें, नि म्हटलें "हे बघ, रोग जावा अशी रोग्याची बळकट इच्छा नसली, औषधोपचारावर त्याची पुरी श्रद्धा नसली, आपण बरं व्हायचंच असा त्याच्या मनाचा निर्धार नसला, तर प्रत्यक्ष धन्वंतऱ्याच्यानं दिखील कांहीं होणार नाहीं. समजलीस ? तेव्हां गडे असं कर."–माझें बोलणें पुरें होण्यापूर्वीच तिनें म्हटलें, "तें सारं कळतं ग मला, पण आतां त्याचा काय उपयोग ? मी का आतां बरी व्हायची आहे ? तूं कांहीं सांगितलेंस, नि सवरलेंस, तरी आतां का मला कशानं तरीह गुण येणार ?"

"पण उषे, तूंच मला विचारलेंस ना, कीं मी इतकी आनंदी कशानं असत्यें म्हणून सांगूं तुला आतां ?" मी तिला थांबून विचारिलें.

"सांग तर" म्हणून ती खालीं बसली. मी म्हटलें "असं पहा उषे, आपली बरी वाईट परिस्थिति आपणच बनवित असतों. आपलीं सारीं दुःखें आपल्याच कुविचारांचीं फळें. देवाकडे त्याचा काडीचाहि दोष नाहीं. हें लक्षांत बाळगून, देवावर श्रद्धा ठेवून, कांहीं झालें तरी मी आपली मनाची शांति ढळूं देत

नाहीं. तें नेहमीं शांत ठेविल्यें नि त्याचा परिणाम माझ्या वृत्तीवर व प्रकृतीवर होऊन मी अशी आनंदांत नि सुखांत असल्यें. कळलं तुला ?"

"कळलं गीते. पण देव का खरंच आहे, कीं त्याच्यावर श्रद्धा ठेवूं, नि मन शांत ठेवूं ?"

"काय ! देव नाहीं, असं तुला वाटतं उषे ? मग मात्र बाई माझं हें सांगणं फुकट आहे."

"खरंच फुकट. देव आहेसं मला वाटे पूर्वी, अगदीं लहानपणीं. पण आप्पा सांगत, देवबीव कांहीं नाहीं. नि आप्पा खोटं सांगतील ? त्यांच्याइतकी विद्वत्ता नि वाचन आहे कुणाचं ? सहज बोलता बोलता ते माणसाची बालंबाल खात्री करून देतात, कीं देवधर्म सगळीं थोतांडं आहेत म्हणून."

"असं. आतां कळलं मला." इतकें म्हणून मी गप्प राहिल्यें.

उषेचे वडील श्री. आप्पासाहेब हे मोठे नास्तिक व जडवादि म्हणून गाजत होते. त्यांचींच मतें त्यांच्या मुलीनें उचललेलीं पाहून मला फार वाईट वाटलें. मला गप्प पाहून "जाऊं दे आतां डॉक्टर वाट पहात असतील" म्हणून उषा उठली व "किती ग छान आहे तुझ्या टोकींतलं तें फूल ! अगदीं चांदणीच जशी !" असे उद्गार काढून खोलींतून निघून गेली. कांहीं पुस्तक काढून वाचीत बसावें, म्हणून मी मनांत म्हणत्यें, तों डॉ. भास्करराव धूम्रपान करीत आंत आले.

"काय तुमचा रोगी भेटला नाहीं वाटतं !" असें मी त्यांना, कांहीं तरी विचारायला पाहिजे म्हणून विचारिलें.

"कोणता रोगी ? आमचे रोगी दोन आहेत इथं." तोंडांतील चिरूट हातीं घेऊन त्यांनीं गभीरपणें उत्तर केलं.

"आपण होऊन आवडीनं झालेला रोगी—आमच्या उषाबाई !"

"हो, त्यांच्याच शोधाला मी इकडे आलों, पण त्या आवडीनें रोगी झाल्या, म्हणजे त्या कशा ?" कपाळाला आठ्या घालून त्यांनीं प्रश्न केला !

"नाहीं, तुमच्या वैद्यकांतलं मला काय कळतं आहे म्हणा, पण मला आपलं वाटतं, तिच्या नखांतदिखील रोग नाहीं. नुसतं उदासवाणें वाटतं तिला, हा का रोग झाला ?" मी हंसत हंसत म्हटलें.

"बाई, उदासवाणं वाटणं, हाहि एक रोगच आहे. पण त्याचें ज्ञान तुम्हांला कुठून असणार ?"

"नि काय, हा रोग विजेनं जाणार ? मनाचा उदासपणा विजेनं नाहींसा होणार ? मला कुणी सांगितल्या आहेत या नसत्या गोष्टी ! पण किनई तुम्हींच तिला दुखणेकरी बनविली आहेत, एरव्हीं तिला दुखणें नाहीं नि कांहीं नाहीं."

भास्कररावांची मुद्रा एकदम क्रुद्ध झाली व "वैद्यक कशाशीं खातात, हें तरी कळतं का तुम्हांला ?" असें जरा जोरानें मला त्यांनीं विचारिलें.

"नाहीं, तुमचं वैद्यक मला काडीभरहि कळत नाहीं, म्हणून मी आधींच सांगितलं आहे तुम्हांला. मला इतकं ठाऊक आहे, कीं, मनाच्या उदासपणावर औषध मानसिकच असलं पाहिजे. शारीरिक उपायानें तो कधीं जाणार नाहीं."

हें ऐकून डॉक्टर वुटमळले. माझें विधान त्यांना पटून, त्यावर काय बोलावें हेंच त्यांनां कळेना.

"मग उषाबाई इथं नाहींत म्हणतां." असें म्हणून हातांतील चिरूट खिडकीबाहेर फेकून स्वारी जाऊं लागली.

"छे, नाहीं." म्हणून, मला हंसं आलें, तें कसेंबसें आवरून मी विचारिलें "मला नाहीं का तुमची वीज चालायची ? मलाहि कसं उदासवाणं वाटतं नेहमी."

"तुम्हांला ?" थांबून त्यांनीं प्रश्न केला. "हो." म्हणतांच, "नाडी पाहूं." म्हणून त्यांनीं हात पुढें केला. मीहि न कचरतां पहावेंच आतां यांचें वैद्यक, म्हणून हात पुढें केला. तो हातीं घेऊन ते माझी नाडी पाहूं लागले. इच्छाशक्ति म्हणून जर कांहीं असेल तर तिचा परिणाम दिसलाच पाहिजे. या दृढ भावनेनें मी त्या डॉक्टरावर चालवूं लागल्यें. अणार्धांत त्यांच्या दृष्टींतील व मुद्रेवरील कोधयुक्त तिरस्कार, तेज व जाणीव हीं नाहींशी होऊन एखाद्या संगमरवरी पुतळ्याप्रमाणें दिसूं लागले. त्याच स्थितींत त्यांना थोडा वेळ ठेवून, प्रयोग मनाजोगा वठला, अशी खात्री झाल्यावर, माझी इच्छाशक्ति मी मागें घेतली. व "नाडी ठीक चालते ना ?" असें म्हणून मी आपला हात त्यांच्या हातांतून काढून घेतला. डोळे चोळून जागे झाल्यासारखे करून "हो तुमची मी नाडी पहात होतों, नाहीं का ?" असें म्हणत स्वारी भानावर आली.

"हो, नि आतां उषेला वीज द्यायची आहे. ती वाट पहात असेल तुमची" असें मी म्हणतांच "हो" असें मोठ्यानें, कांहींसे गोंधळल्यासारखें करून स्वारी एकदम खोलीबाहेर निघून गेली. स्वारी अशी खजील झालेली पाहून मला खरोखरच फार बरें वाटलें.

प्रकरण पांचवें

# अकल्पित योग

दोन प्रहरच्या जेवणानंतर मी वाचायला बसल्यें, पण वाचनाकडे लक्ष ह्मणून लागेना. रात्रीच्या त्या विद्युन्मंदिराचे व त्याच्या मालकाकडून सकाळीं अकस्पित रीतीनें मजकडे आलेल्या त्या आकाश-फुलाचेच विचार मनांत येऊन या विलक्षण योगायोगाबद्दल राहून राहून कौतुक वाटे व वाचनाचा धागा सुटे. अशा स्थितींत अगदीं संध्याकाळपर्यंतचा माझा काळ गेला. संध्याकाळीं चहा घेतल्यावर बंगल्याच्या बागेकडे पहाल्यें तों बगीच्यांत आरामखुर्चीवर पडलेल्या श्रीमंतांची व माझी दृष्टादृष्ट झाली. "गीताबाई, इकडे ये हें बघ आकाशाचे रंग कसे नामी दिसताहेत ते." असें ह्मणून पश्चिमाकाशाकडे त्यांनीं दृष्टि टाकली. मी तिकडे पाहिलें, तों "तिथून नाहीं नीट दिसणार. इकडे बागेंत ये." ह्मणून त्यांनीं ह्मणतांच, मी बागेंत आलें.

सूर्य अस्तंगत झाला होता व संध्यारागांत पश्चिमा बुडून गेलीशी दिसत होती. देहभान विसरून मी तिकडे पहात राहिल्यें. स्वर्गाच्या हृदयांतील भक्तिरसच बाहेर उचंबळून आला आहे कीं काय, असें मला होउन मीहि त्याच्या अवलोकनांत बुडून गेल्यें. "काय ग तुझी तंद्री लागलीशी ! त्यांत तुला देवबीव तर नाहीं दिसत !" आप्पासाहेबांनीं प्रश्न केला.

मी भानावर येऊन "नाहीं-होय. देवच दिसतो मला त्यांत." असें किंचित् चुटमळून उत्तर केलें. "बरा तुला देव दिसतो या रंगांत, मला तर नाहीं तो कुठें दिसत"

"पडद्याआंत पाहिलें, कीं दिसेल तो. त्या मूलतत्त्वाचें दर्शन जडापलीकडे दृष्टि गेल्यावाचून कसें होईल ?"

"मूलतत्त्व, मला तर जडाच्या अणूपरमाणूवांचून दुसरें कांहीं मूलतत्त्व आहेसें नाहीं वाटत. अणूपरमाणूंचें एकीकरण व विभक्तिकरण. यावरच विश्व चाललेलें आहे सगळें. सूर्यमाला, ग्रह, धूमकेतु, उल्का, अग, सगळा या अणुपरमाणूंचा खेळ."

"पण हे अणुपरमाणु तरी आले कुठून ? नि त्यांना खेळवितें कोण ?" मी विचारिलें.

"ते दुसरे कुठून येणार ? ते सदैव आहेतच आणि सदैव रहाणारहि ! तेंच मूलतत्त्व. त्यांना खेळविणारें तरी दुसरें कोण ? त्यांचीच शक्ति !"

"पण ती तरी त्यांनां कां खेळविते ?"

"कां खेळविते ? खेळाला हेतू कसचा ? आणि जाणीव तरी कसची त्या अणुपरमाणूंनां या खेळाची ?"

"मला आपलं वाटत, या अणूपरमाणूंनां उत्पन्न करणारी व खेळविणारी दुसरीच एक उच्चतर शक्ति आहे, तीच विश्वाची मूलभूत चालक शक्ति. तिनेंच हा सगळा खेळ मांडला आहे, आणि त्याची तिला पूर्ण जाणीवहि आहे. आपण सगळीं जसे या विश्वाचे अंश आहोंत; तसेच या विश्वचालक शक्तीचेहि अंश आहोंत, या विश्वचालक शक्तीला जर जाणीव नसती, तर आपल्यांत तरी ती कशी आली असती ?"

असें मी ह्मणतांच आप्पासाहेब निरुत्तर झाल्यासारखे मजकडे पहात राहिले. "आहे, तुझ्या या शेवटल्या मुद्यांत कांहीं अर्थ आहे."

मी पुढें ह्मणाल्यें, "तसेंच, त्या महाशक्तीचा हें विश्व निर्माण करण्यांत व चालविण्यांत जर हेतू नसता तर आपल्या जीवनांत तरी कांहीं हेतू आला असता काय ?"

"बराच विचार केला आहेस तूं या प्रश्नांचा !" आप्पासाहेब कांहींसे साश्चर्य ह्मणाले.

"विचार कसला त्यांत ! देवानें ही जी सृष्टि केली आहे व चालविली आहे, ती जाणीवेनें व हेतूनें, हें का स्पष्ट दिसत नाहीं ! हें स्पष्ट दिसत असून आपण कबूल करीत नाहीं, हेंच आश्चर्य आहे. तें कबूल करून त्याला अनुसरून आपण राहूं लागलों, तर आपल्या आयुष्यांत दुःख, आजारीपणा, कांहीं रहाणार नाहीं. खरेंच रहाणार नाहीं. असं आपलं मला वाटतं." मी त्यांच्याकडे पाहून ह्मणाल्यें.

"काय, मी आजारी आहें, तो का मी निरीश्वरवादी आहे ह्मणून ?" श्रीमंतांनीं खोंचून प्रश्न केला.

"खरेंच मला आपलं तसेंच वाटतं. असें मी ह्मणतांच, "असेल, तूं ह्मणत्येस तसेंहि असेल कदाचित्. ह्मणून ते उठले व मंदगतीनें बंगल्यांत जाऊं लागले.

अंधःकार पडूं लागून तारामंडळ चमकूं लागलें. त्याकडे पहात असतां, त्यांच्या सौंदर्यानें मोहित होऊन आंत जाण्याचें मला भानहि उरलें नाहीं. तिथेंच एखाद्या पाषाणमूर्तिप्रमाणें कितीं वेळ तरी

खिळून राहिल्यें! वर त्या असंख्य तारका, खालीं या उभ्या विश्वांत आपण एकटीच काय ती, अशी भावना होऊन, शेवटीं आपण सगळीं अशीं एकटीच ना! असा विषण्ण विचार मनांत उभा राहिला. आणि फार उदास वाटूं लागलें. मानवी जीवनाच्या अगदीं काळ्याकुट्ट क्षितिज रेषेपर्यंत विचारांनीं भरारी मारली व तेवढ्या वेळेपुरती आनंदाची जाणीवहि मला नाहींशी केली. हरहर! किती दुःख भोगीत आहे सगळी मानवजात. नि हें दुःख आपल्याला ज्याचें त्याला एकेकट्याला भोगावें लागावें ना? दुसऱ्यांनीं तें हलकें करण्याचा प्रयत्नहि करूं नये का? आपलें कांहीं झालें. आपण जगलों व मेलों, उद्योग केला वा निरुद्योगी राहिलों, जगाला त्याची सारखीच क्षिती वाटावी ना! अशी ही जगाची रीति असल्यावर मानवी जीवन-दुःख रतीभर तरी कमी होईल का? या शुभ्र तारका, हे काळेकभिन्न डोंगर, या निगूढ दऱ्या, हीं सगळीं अगदीं वेदकाळीं जशीं होतीं, तशींच आतांहि आहेत. नि आपण इथून गेल्यावर, आपल्या मागेंहि अशींच रहातील, नाहीं? याच शैलशिखरावर फार प्राचीन काळीं केवढालीं तरी नगरें नांदलीं असतील पण आतां त्यांचा मागमूस तरी राहिला आहे का? हरहर! आपल्या साऱ्या जीवनसंग्रामाचा मग उपयोग तरी काय? असे एकावर एक अनेक उद्वेगकर प्रश्न मी आपल्याला विचारीत होत्यें.

अशा स्थितींत " गीते, अग किती वेळ तरी बाहेर आहेस ही? आंत ये ना आतां." असे उषेचे शब्द माझ्या कानीं आले; व एक दीर्घ निश्वास सोडून मी आंत गेल्यें.

"जेवणाचीं पानें दिसेल वाढलीं. चल आतां जेवायला." असें तिनें ह्मणतांच "खरेंच का?" असें उत्तर करून मी तिच्या बरोबर माजघरांत गेल्यें. श्रीमंत व डॉक्टर आमची वाट पहात होतेच. त्यांच्यासमोर आमचीं दोघींचीं पानें वाढलीं होतीं, त्यावर आह्मी बसलों.

" या गीताबाई. आज थोडा उशीरच होतो आहे जेवायला. मनाविरुद्धहि केवळ संवयीनें पानाभोंवतीं पाणी फिरवीत श्रीमंत ह्मणाले. मला या त्यांच्या यांत्रिक चित्राहुति प्राणाहुतींचें हसूं आलें. पण डॉक्टरांचें व त्यांचें आधींच कांहीं गोष्टींविषयीं भाषण चाललें होतें, त्यांत ते पुनः गढून गेल्यामुळें त्यांच्या तें लक्षांत आलें नाहीं इतकें बरें झालं. उषा तें संभाषण लक्षपूर्वक ऐकूं लागली. माझें मात्र तिकडे लक्ष लागेना व जेवणहि जाईना. "कां? तुला भूक लागली नाहीं वाटतें आज गीताबाई?" आप्पासाहेबांचें मजकडे लक्ष जाऊन त्यांनीं विचारलें: " कीं कांहीं विचार चालला आहे डोक्यांत? फार फारच विचार करीत असतेस तूं बुवा."

" नाहीं." ह्मणून मीं घास घेतला.

" फाजील विचाराचा परिणाम प्रकृतीवर अनिष्टच व्हायचा. चांगली प्रकृति रहायला शक्य तितका थोडा विचार आणि शक्य तितकें पुष्कळ भक्षण व्हावें लागतें. रिकामें डोकें आणि भरलेलें पोट अशी स्थिति असल्यावाचून कसली प्रकृति, नि कसलें काय सुख?" असें व्याख्यान द्यायला ही वेळ ठीक मिळालीसें वाटून डॉ. भास्करराव मजकडे पाहून ह्मणाले.

" असें आपल्याला वाटतें, इतकेंच." मी गंभीरपणें उत्तर केलें: " रिकामें डोकें ह्मणजे अविचाराचं डोकें तें, नाहीं का?"

हें ऐकून श्रीमंत पोटभर हांसले.

" आणि डोकें अविचारी असल्यावर खरा आचार तो कसा होणार? नि खरें सुख तें कसें मिळणार? खरें सुख मिळायला शारीरिक प्रकृति जितकी चांगली रहावी लागते, तितकीच मानसिक प्रकृतीहि लागते. पण ती विचारावांचून, चांगल्या पौष्टिक विचारावांचून, मनःशक्तीला विचाराचें भक्षण आणि विचाराचाच व्यायाम मिळाल्यावांचून कशी लाभणार? शरीराबरोबर मनहि पुष्ट केलें नाहीं, तर मग तें पशूचेंच जिणें, नाहीं का?"

" खरें, खरेंच आहे गीतेचें ह्मणणें. शरीर काय, किंवा मन काय, दोन्हीहि सारख्या योग्यतेचीं साधनें आहेत. एकाकडे दुर्लक्ष करून दुसऱ्याचे डवहारे माजविले, तर सुख तें कसें लाभणार? सुखकर आचार हें साध्य, आणि मन व शरीर हीं साधनें, असेंच खरें. साध्याचा व साधनांचा घोटाळा केलांत, तुह्मीं डॉक्टर मघांच्याच सारखा!"

" श्रीमंतांच्या उत्तरानें भास्करराव निरुत्तर झाले. त्यावर कोणी कांहींच बोललें नाहीं: मुकाट जेवणें झालीं. जेवण आटपून मी आपल्या खोलींत जाणार, तों " फोनोग्राफच्या प्लेटी आणल्या आहेत गीते नव्या, ऐक त्या." असें श्रीमंतानीं ह्मटल्यावरून आह्मी सर्वच दिवाणखान्यांत जाऊन बसलो व उषा प्लेटी लावूं लागली.

**" हें असें प्रणयधन इतर धनाहुनि मोठें !**
**जग मुल्य दिलें, तरि न मिळे कवण्या वाटें !**
**कुणि चोरियलें तरि खेद न धनिका वाटे !**
**आनंद मानसीं उलट तयाच्या दाटे !**
**एकाहुनि अधिक न चोर तयाला भेटे !**
**जरि भेटे, तरि तें धन समजावें खोटें !**
**जरि फेड न झाली, तरी दुणावें नेटें !**
**परि फेड झालिया मनीं उरे बहु कष्टें !"**

हें सुप्रसिद्ध कविवर्य कोल्हटकर ह्यांचें पद संपतें न संपतें, तोंच रामभाऊ घाबऱ्या घाबऱ्या दिवाणखान्यांत आले.

"चला, चला श्रीमंत !" ते केवळ्यानें नरी ओरडून ह्मणाले, " कालचाच चमत्कार दिसतो आहे त्या दालनांतून !"

मी एकदम उठून उभी राहिल्यें. सर्वांग कंपित झालें. अंतर्यामहि कंपित झाल्यासारखें वाटलें. असें कां व्हावें, हें माझें मलाच कळेना. ज्या कशाची तरी, मला नकळत मी आतुरतेनें वाट पहात होत्यें तेंच असें अचानक माझ्यापुढें येऊन उभें राहिलें नाहींना असें मला झालें. क्षणांत आह्मीं सगळीं रामभाऊनें सांगितलेल्या दालनाच्या खिडक्यांतून ती अत्यंत कुतूहलजनक चमत्कृति पाहूं लागलों.कालचेंच तें विद्युन्मंदिर. पण आज तें बंगल्याच्या पश्चिमेकडे दिसत होतें. त्यामध्यें व आह्मांमध्यें अंतर कालच्याइतकेंच असून मध्यंतरीं भुरट्या जंगलाचें मैदान पसरलेलें होतें. त्याचा तो डोळे दिपवून टाकणारा प्रखर प्रकाश त्याच्या मागील टेकडीलाहि उज्वलित करीत होता. घरांतलीं सगळीं चाकरमाणसें भीतीनें घाबरून जाऊन त्याकडे डोळे वटारून पहात राहिलीं.

"देवा ! अगाध आहे तुझी लीला." नारद आचारी पुटपुटला. "भुताटकी ग बाय ही !" फुली कुणबीण उद्गारली. " काय, ह्मणावं तरी काय चमत्काराला." श्रीमंतांनीं प्रश्न केला. उषेला कांपरें सुटलें असून तिनें माझ्या हाताचा आश्रय घेतला होता.

" कांहीं जादूबिदू नसेल ग ही ?" जादूबिदू सब झूट असें ह्मणणाऱ्या उषेचा, जडातीत असें कांहीं असणें शक्य नाहीं, असें मानणाऱ्या आप्पासाहेबांच्या मुलीचा हा प्रश्न ऐकून मला थोडें नवल वाटलें.

" नाहीं ग, खराखुरा बंगला आहे तो. तीं माणसं नाहीं दिसत आंत तुला ?" असें मी ह्मटलें, तों " माणसं तर दिसताहेत. पण—"

विद्युन्मंदिरांत कालच्याप्रमाणेंच कांहीं माणसें इकडेतिकडे हिंडत असलेलीं दिसत होतीं. त्यांच्या हालचाली आपणासारख्याच असून त्यांच्यांत अमानुष असें कांहीं दिसत नव्हतें.

"छेः ! हा चमत्कारबिमत्कार कांहीं नाहीं श्रीमंत !" डॉ. भास्करराव त्याकडे इतका वेळ टक लावून पहात होते, ते एकदम ह्मणाले, " किंतानाचा तंबू दिसतो हा, बंगल्याच्या आकाराचा दुसरं कांहीं नाहीं हें."

" अहो पण मी कीर्दखतावण्या घेऊन बसलों होतों इथं हिशेब पहात, तों माझं लक्ष सहज बाहेर गेलं, तों काय, एकदम भडक झालं किं हो पहातां पहातां " रामभाऊंनीं ह्मटलें.

" तंबूच आहे हा, दुसरंतिसरं कांहीं नाहीं यांत भिण्यासारखं. " डॉ. भास्कररावनीं निर्भिडपणें आपलें अखेरचें मत दिलें.

" मग पाहून तरी या ना, तो तंबूच आहे कीं कसं तें. ह्मणजे शंका नाहीं उरली त्या बाबतींत." पाहून येण्याची त्यांची छाती होते का, हें पहाण्याकरितां मी डॉक्टरांकडे पाहून ह्मणाल्यें.

"खरंच ! निकाल तरी लागूं द्या एकदाचा याचा." डॉक्टरांकडे सस्मित दृष्टि टाकून श्रीमंत ह्मणाले. " कालच्यासारखी आज दरीहि नाहीं मध्यें, माळरान आहे थोडसं. कंदिल, काठी घेऊन गेलें ह्मणजे झालें."

"मीं जाऊं ? काय हरकत आहे ? पण—पण रात्रीची वेळ. काळोख फार आहे. आणि शिवाय, या महाबळेश्वरचीं फुरशीं नाहीं ठाऊक श्रीमंतांनां. उडी मारून टाळूला दंश करतात तीं. मोठी विषारी, मोठी प्राणघातक जात आहे ती !" डॉ. भास्कररावनीं धूम्रपान थांबवून सबबी काढल्या.

" फुरशीं ना ? तीं काय करताहेत ! काठी असली हातांत एक मोठीशी, आणि डोकीला असलं नीट कांहीं, ह्मणजे झालं." असें श्रीमंतांनीं ह्मणतांच डॉक्टर घुटमळून इकडेतिकडे पाहूं लागले.

" नको, डॉक्टरसाहेब नको जायला. मी जातों दोन गडी घेऊन." असें ह्मणून रामभाऊंनीं त्यांची सोडवणूक केली व तो प्रकार प्रत्यक्ष पाहून येण्याकरितां ते निघून जाऊं लागले.

" थांबा रामभाऊ, पत्र देतों मी त्या तंबूच्या मालकाला." ह्मणून श्रीमंत पत्र लिहून देण्याकरितां जाऊं लागले.

" नको आप्पा, नका जाऊं देऊं कुणालाच. कांहीं भलतं सलतं असलं, नि एक करतां एक झालं तर ?"

" वेडी नाहींस उषे ! भलतं सलतं तें काय असणार ? भलतं सलतं भितऱ्याला !" असें ह्मणून श्रीमंत व रामभाऊ तेथून निघून गेले.

माझ्या या वेळच्या मनःस्थितीची कल्पना अनुभवावांचून कुणाला होणें शक्यच नाहीं. कांहीं तरी अनपेक्षित असें घडणार, कांहीं तरी अननुभूत असें अनुभवास येणार, इतकें तर मला कळून चुकलेंच होतें. पण आपल्या सर्व भवितव्यतेवर त्या अनपेक्षिताचा व अननुभूताचा परिणाम घडणार, असेंहि माझें मन मला सांगत होतें. तो कसा, तें मात्र मला कळत नव्हतें.

" दोन गडी घेऊन गेले रामभाऊ." पांच चार मिनिटांत आप्पासाहेब परत येऊन ह्मणाले. क्षणार्धांत बाहेर काळोखांत दोन कंदील दूर दूर दूर त्या विद्युन्मंदिराकडे जातांना दिसूं लागले. आह्मीं आपली सर्व दृष्टिशक्ति एकाग्र करून त्याकडे पाहूं लागलों. विद्युत्प्रकाश क्षणोक्षणीं घनदाट होत असलेल्या तिमिर छायेशीं जणूं स्पर्धा करण्याकरितांच कीं काय, अधिकाधिक प्रज्वलित होत होता. कंदील जसजसे त्याजवळ जावूं लागले, तसतसे निस्तेज होऊन, रामभाऊ व दोन्ही गडी चिमुकल्या बाहुल्याप्रमाणें चालत असतांना दिसूं लागले.

यावर दोनचार मिनिटें गेलीं असतील नसतील, " दिसेनासे झाले ते" श्रीमंत म्हणाले, तरी मला ते अद्यापिहि दिसतच होते. डॉ. भास्करराव वगैरे इतरांनांहि ते आप्पासाहेबांप्रमाणें दिसेनासे झाले होते. माझ्या दृष्टीला मात्र ते अगदीं विद्युन्मंदिरांत शिरेतोंपर्यंत स्पष्ट दिसत होते. माझी दृष्टि त्या सर्वांहून तीक्ष्ण असल्याचें त्यावेळीं माझ्या चांगलेंच प्रत्ययाला आलें.

पुढें काय होतें, हें पहाण्याकरितां उत्कंठित झालेल्या आमच्या डोळ्यांची चमत्कृतिलालसा तृप्त करण्याकरितांच कीं काय, विद्युन्मंदिराचा प्रकाश एकदम शून्यवत् होऊन, पांच चार साधे दिवे मात्र त्या घनदाट अंधःकारांत लुकलुकूं लागून मंदिराचें अस्तित्व दाखवूं लागले. क्षणाभरानें रामभाऊंचे कंदील हलावयास लागून आम्हांकडे येताहेत असा भास झाला.

खरोखर ते कंदीलच परत येत होते. त्याबरोबरच्य व्यक्ति मात्र अगोचर होत्या. माझ्या सर्व आशांची फलश्रुतीच त्याबरोबर येत आहे, असें मला झालें. आपल्य सर्व दर्शेंद्रिय शक्ति एकवटून त्या नाचत येणाऱ्य कंदिलांकडे मी पाहूं लागल्यें. सभोंवार, वर, खालीं, चोहोंकडे घनदाट अंधःकार व तितकीच घनदाट शांततेची छाया. त्यांतून कंदिलापलीकडे कांहीं दिसतें आहे का ? कसला तरी ध्वनि ऐकूं येतो आहे का ? म्हणून माझे डोळे व कान परस्परांनां विचारूं लागले. वर आकाशांत तारका नेहमीपेक्षां अधिक तेज स्रवताहेत असें वाटलें. "तुझें भवितव्य तुजकडे येतें आहे, त्याचा स्वीकार कर." असें त्या स्मित करून मला सांगत आहेतसें वाटलें. वातावरणांतून त्यांचा हा संदेश किरणरेखारूपानें चमकत येतांना मला स्पष्ट दिसूं लागला. सभोंवार पसरलेली निःशब्दताहि आपला गूढ मूक संदेश देऊन तारकांनां पुष्टि देत आहेसें मला झालें. हें असें कां व्हावें, हें माझें मलाच कळेना. तथापि असें होत होतें इतकें मात्र खरें.

कंदील अगदीं जवळ आले. त्याबरोबर पूर्वीप्रमाणें तीन व्यक्ति नसून चार व्यक्ति आहेत, असें स्पष्ट दिसून आलें. कंदील घेतलेले ते दोन गडी, ते रामभाऊ आणि त्यांच्याबरोबर ती चौथी व्यक्ति. मलाच प्रथम ती दिसली. तिच्याकडे पाहूं लागल्यें, तों " ही मूर्ति मी कुठें तरी पाहिली आहे, नाहीं का ? अनेकदां पाहिलेली आहे, नाहीं का ?" असा मी आपल्याशीं प्रश्न केला.

" ते गृहस्थ पहा रामभाऊबरोबर." असें मी आप्पासाहेबांनां म्हणतांच " हो तेच मालक दिसताहेत त्या विद्युन्मंदिराचे; ते स्वतःच भेटीला येताहेत आपल्या. चला जावूं त्यांनां सामोरे." श्रीमंत म्हणाले व श्रीमंत, डॉ. भास्करराव, उषा आणि मी तिथून बंगल्याच्या दाराशीं गेलों. तों " काय सरदारसाहेब !" असे सुधामधुर शब्द माझ्या कानावर आले व एक मनोहर मूर्ति आमच्या पुढें येऊन उभी राहिली.

---

## प्रकरण सहावें

# ओळख

"काय सरदारसाहेब!" हे शब्द ऐकतांच आणि ते बोलणारी ती मूर्ति दृष्टीस पडतांच श्री. आप्पासाहेब स्तंभित होऊन एकसारखे टकमका पाहूं लागले. "कोण? सुधाकर!" ते शेवटीं उद्गारले. "छत्! शक्य नाहीं, सुधाकर देशमूख–नाहीं त्यांचे चिरंजीवच असावेत तुम्ही."

ती मूर्ति हांसली.

"आप्पासाहेब, तुम्ही सदाचेच संशयवादी. चमत्कार करितां येतात खरे; पण स्वतःचाच मुलगा होण्याचा चमत्कार कांहीं शक्य नाहीं कुणाला. तुमचा सहाध्यायी सुधाकर देशमूख, तोच मी. अझूनहि नाहीं ओळखलेंत मला?" असें ह्मणून ती मूर्ति दोन पावलें पुढें येऊन दारांतील प्रकाशांत उभी राहिली.

तिचें वय पंचविशीच्या आंतबाहेर दिसत होतें.शरीरयष्टि निकोप व मजबूत, छाती विशाल, एखाद्या वीरासारखी, मुखमंडळ रेखीव व आरोग्यशक्तीनें उज्वलित असें होतें. स्मित करून श्रीमंतांच्या खांद्यावर त्या मूर्तीनें आपला हात ठेविला, तेव्हां ती मूर्तिमंत पौरुषशी मला वाटली. आप्पासाहेब मात्र सभय व साश्चर्य असे तिजकडे पहातच होते.

"सुधाकर देशमूख." ते शेवटीं ह्मणाले; "त्यांच्यासारखे दिसतां तुम्ही खरें. पण ते असणें अशक्य. तुह्मी तर वयानें फार लहान दिसतां."

"वयाच्या गोष्टी जाऊं द्या श्रीमंत." कांहींसें विनोदानें त्या मूर्तीनें उत्तर केलें, "तुम्ही ज्याची विक्षिप्तांत गणना करीत असा तोच तुमचा कॉलेजांतील स्नेही मी. किती वर्षे झालीं आप्पासाहेब आपल्या भेटीला? विसावर नाहीं का?"

आप्पासाहेबांनीं सुधाकरांच्या हातांत हात घातला; व आम्ही सर्व दिवाणखान्यांत आलों. श्रीमंत, सुधाकर व डॉक्टर खुर्च्यांवर बसतांच उषेकडे वळून श्रीमंत म्हणाले, "अग, हें बघ, काल मी तुला ज्यांची हकीकत सांगितली, तेच सुधाकर देशमूख आपण ह्मणून ह्मणताहेत हे. पण माझे सहाध्यायी माझ्या वयाचे असायला हवेत, आणि हे तर त्यांच्याहून चांगले वीस वर्षांनीं लहान दिसतात."

"खरोखर श्रीमंत," आप्पासाहेबांच्या विनोदाला प्रत्युत्तर ह्मणून सुधाकर ह्मणाले "आतां मात्र मला लाज वाटूं लागली आहे कीं मी वयानें आपल्या इतकाच असूनहि दिसत मात्र नाहीं तितका."

यावेळीं मी दृष्टि वर करून त्यांच्याकडे पाहिलें मात्र, तों त्यांची दृष्टि मजकडे वळून तिच्यांत मला अनंत जन्मींच्या आठवणी लिहिलेल्या दिसल्या. त्यांचा आणि माझा चिरकालचा परिचय; आकाशाइतके, किंवा सूर्यप्रकाशाइतके ते चिरपरिचित असें माझें मन मला निक्षून सांगूं लागलें. पण तो परिचय कोठचा? तें कांहीं मला कळेना. अशा घुटमळ्यांत मला पडलेली पाहूनच कीं काय कोण जाणें, त्यांनीं आपली दृष्टि मजवरून वळवून आप्पासाहेबांशीं ते बोलूं लागले.

"माझ्या तंबूचा तुह्मां सर्वांना फार चमत्कार वाटलेला दिसतो एकूण."

"किती पण!" उषा मध्येंच ह्मणाली, "तंबू कसचा तो? राजवाडाच, किंवा मंदिरच तें विजेचं!"

"मंदिर कसलं, आणि राजवाडा कसला. तंबू आहे साधा इमारतीच्या आकाराचा. क्षणांत तो उघडतां मिटतां येऊन, मोटारीच्या साहाय्यानें वाटेल तिथें नेऊन उभारतां येतो, इतकेंच त्यांत विशेष. दुसरें काय? पण सर्वपरिचित नसलेली गोष्ट चमत्कारशी वाटते; ह्मणून तुह्मांला तो चमत्कारसा वाटला त्यांत नवल नाहीं."

"पण विजेचे दिवे कसे लटकावितां साहेब आपण त्यावर चुटकीसरशी?" रामभाऊंनीं साश्चर्य प्रश्न केला.

"त्यांत कांहीं नाहीं अवघड! विजेच्या बॅटरीनें सहज साधतें." त्यांच्याकडे सकौतूक पाहून सुधाकरांनीं उत्तर केलें.

"पण खर्च येत असेल त्याला किती तरी!" डॉ. भास्करराव उद्गारले.

"खर्चाचा नाहीं प्रश्न. प्रश्न इतकाच कीं चुटकीसरशीं हें सगळें कसें होतें." असें त्यांनां गंभीरपणें उत्तर देऊन, ते श्रीमंतांनां ह्मणाले, "उद्यां याच आप्पासाहेब सर्वांनां घेऊन माझा तंबू पहायला."

"अर्थात्! उद्यां पाहिलंच पाहिजे तुमचं विद्युन्मंदिर!" असें ह्मणून सुधाकरांचा त्यांनीं हात धरून त्यांनां आपल्या खास बैठकीच्या दिवाणखान्याकडे नेलें.

थोडा वेळ कोणी कांहींच बोललें नाहीं. शेवटीं उषा रामभाऊंकडे वळून त्यांनां विचारिते, "काय हो, पण तें विद्युन्मंदिर पहायला मिळालं का तुह्मांला नीट?"

" हो हो. नीटपणें पहायला मिळालं ताईसाहेब. काय तरी थाटमाट. राजशाली रहाणी आहे या गृहस्थाची. दुसरं कांहीं नाहीं. आणि गृहस्थ तरी किती साधा हो. श्रीमंतांची चिठी वाचतांच तडक इकडे यायला निघाला " असें रामभाऊंचें उत्तर ऐकतांच डॉ. भास्करराव सिगारेट पेटवीत मला विचारतात, "तुह्मांला काय वाटतं हो या गृहस्थाबद्दल ?"

" तें नाहीं सांगतां येत." मी शांतपणें उत्तर केलें. दुसरें तें मी काय ह्मणणार ? माझ्या तिमिरमय जीवनांत विजेप्रमाणें अनपेक्षित रीतीनें चमकून तें सुप्रकाशित करणाऱ्या सुधाकरांविषयीं डॉक्टरासारख्याजवळ मी काय सांगणार ?

या क्षणीं उषा एकाएकी चपापून श्रीमंतांच्या खास बैठकीच्या दिवाणखान्याकडे पाहूं लागली; व "ऐक" असें मला ह्मणाली.

" हे पहा, आप्पासाहेब," सुधाकरांचा सुधामधुर आवाज उच्च स्वरांत ऐकूं येऊं लागला. " वर्ष,वयोमानें यांची काय कथा ? आपला आत्मा चिरंतनचा तरुण. आणि ह्याच जाणिवेनें मी तरुण दिसतों. चैतन्य-तारुण्यांत रहाणाराला जडवार्धक्याची काय भीति ?"

उषा अधिकच चपापून मजकडे पाहूं लागली.

आप्पासाहेब यावर कांहीं बोलले; पण तें काय, तें ऐकूं येत नव्हतें. पुनः सुधाकरांचा आवाज स्पष्टपणें ऐकूं येऊं लागला, " चमत्कार तो कसला त्यांत ? संगमरवरी दगडांतून शिल्पकार आपल्या कल्पनेप्रमाणें मूर्ति काढतो, याचा चमत्कार वाटतो का तुह्मांला ? संगमरवरीसारख्या कठीण दुर्भेद्य दगडांतून कारागीर रामाची किंवा बुद्धाची मूर्ति काढतो, याचें तुह्मांला कधीं आश्चर्य वाटत नाहीं. कारण, विचार आणि श्रम यांनीं तें सुसाध्य आहे, हें तुह्मांला ठाऊक आहे. मग दगडाहून किती तरी पट मृदु अशा मानवी देहावर त्याच विचाराचा आणि श्रमाचा प्रयोग करून तो आपल्या कल्पनेप्रमाणें बनवितां आला, तर त्यांत तुह्मांला आश्चर्य तें कां वाटावें, कळत नाहीं. जड, निर्जीव दगडाला आपण वाटेल तें रूप देतों; मग चेतनायुक्त, सजीव अशा आपल्या देहाला आपल्याला कल्पनेप्रमाणें रूप कां देतां येऊं नये ?"

यावर श्रीमंतांनीं काय प्रत्युत्तर केलें, तें ऐकूं आलें नाहीं; पण थोड्याच वेळांत आह्मां सर्वांना तिकडे येण्याविषयींची त्यांची हांक ऐकूं आली. अर्थातच आम्हीं सर्व तत्काल दिवाणखान्यांत गेलों; तों " पहा हा चमत्कार. हे माझे स्नेही माझ्याइतकेच वृद्ध असूनहि कसे तरुण दिसताहेत ते," असें शंकानिवृत्त मुद्रेनें श्रीमंत ह्मणाले.

श्रीमंतांचें वय या वेळीं पंचेचाळीशीच्या आंत-बाहेरच होतें; तरी ते साठीच्या वृद्धाप्रमाणें दिसत असून स्वतःला वृद्धच समजत. इकडे, सुधाकरांचें वयहि त्यांच्याइतकेंच; तरी ते पंचवीशीच्या तरुणाला लाजवितील, अशी त्यांची मूर्ति असून, ते स्वतःला तरुणच समजत. हा विरोध पाहून एक दुसऱ्याचा सहाध्यायी असेल ही कल्पना कोणाला हास्यास्पद वाटणार नाहीं ?

मलासुद्धां हंसूं आलें. मग उषेलाहि आलें, तर त्यांत आश्चर्य कसलें ?

" तुमच्यासारखी त्यांनीं दगदग नाहीं केलेली दिसत आप्पा, ह्मणून त्यांची प्रकृति अशी राहिली." उषा धिटाईनें ह्मणाली.

" दगदग केली आहे मी, कीं नाहीं, तें काय सांगूं तुह्मांला ? पण दिवसाचा प्रत्येक पळ मी उद्योगांत घालविलेला आहे इतकें मात्र खरें आहे. या बाईंनींहि वेळाचा उपयोग माझ्यासारखाच केलेला दिसतो आप्पा-साहेब." असें मजकडे दृष्टि वळवून सुधाकर ह्मणाले.

" अगदीं खरं. मोठी उद्योगी आहे गीता. आमच्या उषेची ती मैत्रिण. यंदाच परीक्षा होऊन अनाथ बालिकाश्रमांत शिक्षकीण झाली आहे ती. मोठा गोड सहवास वाटतो आह्मांला तिचा. नेहमीं आपली आनंदी. आणि आम्हीं दोघं, मी आणि उषा, नेहमीं हीं अशीं आजारी नि कष्टी. ह्मणून आणली आहे बळेंच तिला सुटींत इकडे. पहा, कालच तुमची आठवण काढली होती मी तिच्याजवळ. आणि माहिती सांगितली तुमची मी तिला. आणि आज तुमची प्रत्यक्ष ओळख करून देतों आहे मी तिला. याला ह्मणतात अकल्पित योग."

" अकल्पित असा नाहीं ह्मणतां येत हा योग आप्पासाहेब. अगदीं हिशोबीच आहे तो. अकल्पित, अनपेक्षित असं कांहींच नाहीं घडून येत कधीं. सर्व घटना कल्पनाग्राह्य आणि अपेक्षित अशीच आहे जगाची आणि जीवनाची."

असें सुधाकरांनीं ह्मणतांच श्रीमंतांनीं स्मित करून माझ्याकडे पाहिलें व " हिचं मत जमेल तुमच्याशीं

या बाबतींत. आणि प्रत्येक बाबतींतहि." असें त्यांनीं उत्तर केलें.

" त्यांच्याकडे पहातांच कळलें मला तें श्रीमंत." असें सुधाकरांनीं सस्मित गांभीर्यानें प्रत्युत्तर दिलें व मजकडे ते गोडपणानें पाहूं लागले.

मी लज्जेनें खालीं पाहूं लागल्यें. माझ्या केंसांतल्या त्या आकाशफुलासारखेंच फूल सुधाकरांच्या बटणांत होतें. हें उषेच्या लक्षांत आलें असेल काय, असा विचार यावेळीं एकदम माझ्या मनांत उभा राहिला.

इतक्यांत चहा, बिस्किटें व फळफळावळ टेबलावर येऊन धडकलीं.

" हें काय?" सुधाकरांनीं साश्चर्य प्रश्न केला; चहा, मी चहा घेत नाहीं आप्पासाहेब. आणि घेत असलों तरी या रात्रीच्या वेळीं चहा !"

" पण आह्मांला तर रात्रीं चहा घेतल्यावांचून झोंपच येत नाहीं कशी ती. पहा, या बाबतींतहि तुमचं नि आमचं पूर्वपश्चिम." असें ह्मणून श्रीमंतांनीं दूध आणण्यास सांगितलें; तितक्यांत त्यांचें लक्ष बाह्यतः स्वतःशीं विचार करीत असलेल्या, पण वस्तुतः सुधाकरांचा शब्द नि शब्द ऐकत धुराचे लोट सोडित असलेल्या डॉ. भास्कररावाकडे गेलें.

" हे आमचे डॉ. भास्करराव, नुकतेच विलायतेहून परीक्षा देऊन आलेले आहेत. " असें श्रीमंतांनीं ह्मणतांच, सुधाकरांनीं डॉक्टरांनां चटकन् नमस्कार केला. इंग्रजी पद्धतिप्रमाणें हस्तांदोलनाची अपेक्षा करणारे डॉक्टर गोंधळून जाऊन त्यांनीं त्यांनां बावळ्यासारखा प्रतिनमस्कार केला.

दूध येतांच " तूं कांहीं चहा ध्यायची नाहींसच या वेळीं." असें ह्मणून श्रीमंतांनीं मजकडे पाहिलें; व मी "नाहीं" ह्मणतांच उषेसह सर्व चहा, व सुधाकर दूध घेऊं लागले. मी एका रिकाम्या खुर्चीवर मुकाट बसून राहिल्यें.

चहादूधपान होत असतां श्रीमंतांच्या व सुधाकरांच्या कित्येक सहाध्यायांविषयींच्या आठवणी निघाल्या. अमका हायकोर्ट वकील आहे, तमका वारला, तिसरा राजकारणांत पडून सरकारच्या नाराजीस पात्र झालेला आहे, असें ते प्रत्येकाविषयीं कांहीं तरी सांगत होते. उषा तें सर्व उत्कंठेनें ऐकत व सुधाकरांकडे कौतुकपूर्ण दृष्टीनें पहात होती.

" ही गीता कां अशी निरुद्योगी?" माझ्याकडे लक्ष जाऊन श्रीमंतांनीं प्रश्न टाकला. " आमच्या जिव्हा दुहेरी उद्योग करीत असतां तुला फळें, बिस्किटें दिखील नाहीं चालत?"

मी चटकन् सफरदळाची एक फाकळी उचलली व त्यांच्या उद्योगाला हातभार लावला.

" पहा सुधाकर, ही कशी निमूट असते ती. तुमचें तें विद्युन्मंदिर पाहून आम्हीं इकडे आश्चर्यानें थक्क झालों, पण हिला त्याचं कांहींच वाटलं नाहीं कसं तें. बरं, तुमच्याविषयीं तिला कांहीं माहिती असावी ह्मटलं, तर तसंहि नाहीं. नाहीं ह्मणायला तिच्या डोकींतलं तें फूल कुणी कातकऱ्यानं आणून दिलं तिला, तेव्हां–पण तुमच्या कोटाच्या बटणांत तसलेंच फूल लटकलें आहे किंहो सुधाकर !"

क्षणभर सर्वजण त्या दोन्हीं फुलांकडे टवकारून पाहूं लागलीं. मी लाजेनें खालीं मान घातली. कां, तें माझें मलाच सांगतां येईना.

" त्यांत विशेष तें काय आप्पासाहेब? हीं आकाशफुलें महाबळेश्वराच्या डोंगरांत पुष्कळच मिळतात. आजच मी कित्येकांच्या बटणांत आणि बुचड्यांत पाहिलीं तीं." सुधाकर माझी सोडवणूक करण्याकरितां म्हणाले.

"पण गीतेच्या डोकींतल्या फुलांत विशेष हें आहे सुधाकर, कीं आम्हीं तुमचा तो विजेचा तंबू काल पाहिला आणि आज सकाळींच कुणी कातकऱ्यानें तिला हें आणून दिलं. आणखी हें नि दुसरें एक, अशीं दोनच फुलें त्यानें तुम्हांला दिलीं होतीं सकाळीं, असंहि त्यांनीं सांगितलं गीताबाईला. तें दुसरें तुमच्या बटणांत दिसतं आहे; हें विशेष नाहीं याच्यांत?"

श्रीमंतांच्या या प्रश्नाला सुधाकरांनीं मान हलवून, "छे! त्यांत काय आलं आहे विशेष? काय त्या कातकऱ्यांनीं माझें नांव सांगितलं कीं काय तुम्हांला?" असें उत्तर दिलें.

" नांव नाहीं सांगितलं वाटतें तुमचं त्यानं. पण 'कळीच्या बंगल्याचा साहेब' असं कांहीं वर्णन केलं त्यानं तुमचं, होय ना ग गीते?"

" होय " म्हणायला मी भानावरच नव्हत्यें मुळीं.

" पण कळीच्या बंगल्याचे साहेब " सुधाकर हांसत म्हणाले, " किती तरी सांपडतील त्रिभुवनांत. त्या कातकऱ्याची कांहीं तरी चूकभूल झाली हें खचित.

असो. गीताबाईंत आणि माझ्यांत एक गोष्ट तरी समान आहे, हीच त्यांतल्या त्यांत आनंदाची गोष्ट."

"पण तिचं फूल कोमेजलंच नाहीं हो अझून. सकाळपासून तिच्या डोकींत आहे तरी." उषा मध्येंच म्हणाली.

सुधाकरांनीं कांहींच उत्तर केलें नाहीं. जणूं काय, तिचे उद्गार आपण ऐकलेच नाहींत, किंवा ते ऐकण्याची इच्छाच नाहीं आपल्याला असें त्यांनीं दाखविलें व भाषणाचा ओघच पालटला. तेव्हां कुठें माझ्या जीवांत जीव आला.

ह्यानंतरच्या संभाषणांत त्यांनीं होतां होईल तों, मजजवळ बोलण्याचें टाळून मजकडे मनोभावपूर्ण दृष्टीनें पहात असलेलेच ते मला आढळून आले. विविध विषयांवर गप्पा झाल्या; पण मी त्यांत शब्द न बोलतां खिडकीबाहेर चांदण्याकडे पहात राहिल्यें. तरी माझे कान त्या गप्पांकडे होतेच.

"बी. ए. झाल्यानंतर आजवर कुठें होतां, काय करीत होतां" असें श्रीमंतानीं विचारितां, सुधाकर ह्मणाले, "कॉलेजांतून निसटतांच–"

"निसटतांच ! जसं कांहीं येरवड्याच्या तुरुंगांत ठेविलं होतं तुह्मांला कुणी." असें श्रीमंतांनीं साश्चर्य उद्गार काढिले.

"खरोखरच तुरुंगांत होतों मी कॉलेजांत."— सुधाकरांनीं प्रत्युत्तर केलें. "ज्ञानाच्या उष्ट्या पत्रावळी ज्याला नको असतील, त्याला कॉलेज हें तुरुंगासारखेंच आहे नाहीं का? दुसरा देईल तीं चार शितें खायचीं, अशीच नाहीं का तिथली स्थिति ? तेवढ्यावरच संतुष्ट असतात, हें खरें. पण एखाद्याचं नाहीं भरत त्यांनीं पोट. त्याला त्यांनीं काय करावं ? तशांतलाच मी एक ह्मणाना !"

"पण त्या चार शितांवरच तुम्हीं परीक्षेंत सन्मान मिळविलांत ना ? " श्रीमंतांनीं प्रश्न केला.

"सन्मान " सुधाकरांनीं उत्तर केलें, "असला सन्मान मिळविण्यांत काय मोठंसं? रेमेडोक्याहि तो मिळवूं शकेल. रोज दोन तीन तास अभ्यास करूनहि मी तो मिळवूं शकलों. बाकीचा सारा वेळ मी दुसऱ्याच वाचनांत घालविला; तुह्मांला ठाऊक आहेच. "

"उपनिषदें, योगवासिष्ठ, गूढविद्या, वगैरेच्या अध्ययनांत नाहीं ? "

"आध्यात्मशास्त्र या एका शद्बांत येतें तें सारें." सुधाकर हांसत ह्मणाले.

"खरंच, आपला विश्वास आहे असल्या गोष्टीवर?" उषेनें मध्येंच प्रश्न केला.

"अर्थात्. अधिभूतात्म्याची–सृष्टीच्या अंतरंगाची किल्लीच आहे आध्यात्मशास्त्र. त्यावर विश्वास न ठेवून कसं चालेल ? "

"गौडबंगाल आहे आह्मांला तें सगळें." डॉ. भास्कररावांच्या तोंडांतून हे उद्गार व धुराचे लोट बरोबरच बाहेर आले.

सुधाकर त्यावर कांहींच बोलले नाहींत. "अध्यात्मशास्त्र हें अधिभूतात्म्याची किल्ली ती कशी बुवा ?" श्रीमंतांनीं प्रश्न टाकला.

"ती अशी " सुधाकरांनीं शांतपणें उत्तर दिलें. "आपलं शरीर ज्याप्रमाणें आपल्या अंतरंगाचं,– मानसिक शक्तीचं आणि शुद्धतेचं दर्शक असतं, त्याचप्रमाणें सृष्टी ही आपल्या बाह्य सौंदर्याच्या व सुखसमृद्धीच्या विविधतेंत स्वतःचा आत्मा, ह्मणजे तिची जीवनाधार अशी अध्यात्मशक्ति व्यक्त करीत असते. अध्यात्मशास्त्र हें या बाह्य परिणामांचें, अर्थात् कार्याचें ज्ञान देऊन वर ज्या कारणांनीं तें कार्य घडतें, त्या कारणांचेंहि ज्ञान करून देतें. या ज्ञानाचा आपल्याला व्यक्तिशः रोजच्या व्यवहारांतहि उपयोग करून घेतां येतो. ह्मणून त्याचा अभ्यास जितका अधिक, तितकं आपलं हितहि अधिक ! या अध्यात्मशास्त्रज्ञानाचा एक कण जरी आपण आपलासा केला, तरी तो आपल्या उन्नतीला साहाय्यक झाल्यावांचून कधीं रहायचा नाहीं आप्पासाहेब. "

"मग तुमची उन्नति बरीच झाली असली पाहिजे त्यानें ?" श्रीमंतांनीं हांसत हांसत विचारिलें.

"माझी उन्नति न झाल्यासारखा, दिसतो का मी ?" सुधाकरांनीं स्मित करून उत्तर दिलें.

श्रीमंत त्यांच्या त्या चित्रासारख्या मनोरम मूर्तीकडे पहात राहिले. तिचा त्यांनां हेवा वाटला असावा खास !

"मग कॉलेज सोडल्यावर कुठं–पंजाबांत गेलांत तुम्हीं ?"

"होय, लाहोरास माझ्या घरीं गेलों मी ! तिथंच माझा बहुतेक काळ गेला हा. मध्यंतरीं यूरप–अमेरिकेच्या प्रवासांत चार वर्षें व हिमालयांत दोन वर्षें

गेलीं, तितकाच बाहेर होतों मी. सध्यां आपल्या देशाचा प्रवास करतों आहे मी. ”

“ आणि ” श्रीमंत थोडे घुटमळलेले दिसले, “ तुमचं–लग्न–नाहींच झालेलं दिसत !”

सुधाकरांचे नेत्र प्रफुल्ल होऊन ते श्रीमंतांकडे पाहूं लागले. “ नाहीं. मी अविवाहितच आहे आजवर. ” असें शेवटीं त्यांनीं स्मित करून उत्तर दिलें.

“ योगी, संन्यासी व्हायचें असेल आपल्याला.” डॉक्टरांनीं धुराचा लोट सोडीत त्यांनां प्रश्न केला; विवेकानंद, वियोगानंद होऊन देशकार्य करायचं असेल आपल्याला.”

“ आजच कांहीं नाहीं सांगता येत तें.” अत्यंत गांभीर्यानें सुधाकरांनीं उत्तर देऊन, डॉक्टरांकडे तीक्ष्ण दृष्टिक्षेप केला. त्याबरोबर ते एकदम खालीं पहावयास लागून ओशाळल्यासारखे झाले.

दूध चहा संपून मंडळी आतां फळांकडे वळली.

“ चहा सोडून या श्रीमंत आपण.” सुधाकर भाषणौघ बदलण्याकरितां ह्मणाले.

“ जावें त्याच्या वंशा, तेव्हां कळे” ह्मणतात तेंच खरं.” श्रीमंत संत्र्याची पाकळी तोंडांत घालीत उत्तर करितात. “ आमच्यासारख्या आजाऱ्याला चहा ह्मणजे जीवन आहे नुस्तं. तुह्मांला तें सांगून कसं कळणार ? तुह्मीं थोडेच आहांत तसे ? बाकी तुमच्या निरोगी प्रकृतीनें तुह्मांला आमच्यासारख्याला वाटेल तें सांगण्याचा अधिकार दिलेला आहे, एवढं मात्र खरं.”

“ निरोगी प्रकृति हा तर सृष्टिनियम आहे आप्पासाहेब. ” सुधाकर ह्मणाले, “ तो मोडलों, आणि आपण आजारी पडतों. हा आपलाच दोष नाहीं ?”

“ तुमचं ठीक आहे सारं. ” करुणस्वरानें श्रीमंत प्रत्युत्तर करितात, “ आमच्यासारखे असतां, तर निराळेच उद्गार काढतां आपण, समजलांत ?”

सुधाकरांनीं दयार्द्रमुद्रेनें श्रीमंतांकडे पाहिलें व स्मित केलें.

“ मला नाहीं वाटत, मी तसं केलं असतं, आप्पासाहेब. तुमच्याप्रमाणें मी आजारी असतों तर माझ्या निष्काळजीपणानें, अविचारीपणानें मी आपली प्रकृति बिघडवून घेतली आहे; तेव्हां त्याचें शासन योग्यच आहे तें मला भोगलेंच पाहिजे. असंच मी ह्मटलें असतें. ”

“ ह्मणजे, आपल्या आजारीपणाबद्दल आपले आपणच जबाबदार असं ह्मणणं तुमचं ?” श्रीमंत ह्मणाले, “ खरं ह्मटलं, तर आपली रुग्णस्थिति आपला स्वतःचाच दोष नसून आपल्या वाडवडिलांचा दोषहि अनुवंशिक रूपानें आपल्यांत उतरलेला असतो. तसेंच, अलीकडच्या वैद्यकीय शोधावरून प्रत्यक्ष हवेंतून आणि पाण्यांतूनहि सहस्र प्राणनाशक रोगजंतू आपल्याला नकळत आपल्या शरीरांत प्रवेश करितात. असं स्पष्ट दिसून येत नाहीं काय ?”

“ प्राणनाशक जंतू !” सुधाकर शांतपणें ह्मणाले, “ माझ्या माहितीप्रमाणें प्राणनाशक जंतू असे नाहींतच मुळीं अस्तित्वांत ! जे रोगजंतू आहेत, ते निस्सत्व घटनेला अणूपरमाणू स्थिति देऊन, जीवनशक्तीला त्या अणूपरमाणूची पुनर्घटना करावयास वाव मात्र देत असतात. या जंतूंची शरीरांत अनुकूल क्षेत्र मिळालें तरच वृद्धि होते. निस्सत्व घटनेला अणूपरमाणू स्थिति देण्याच्या यांच्या क्रियेलाच ‘रोग’ ह्मणतात. पण ज्यांच्या शरीरांत या जंतूंनीं प्रवेश केलेला असतो, त्यांची जीवनशक्ति संपादनांत हयगय दिसून आल्यावांचून किंवा जीवनधारणाविषयक दुर्बलता दिसल्यावांचून त्यांनां कांहींच करतां येत नाहीं कधीं. पण हवेंत या असल्या रोगजंतूहून किती तरी लक्षपट अधिक ‘जीवनजंतू’ची संख्या आहे. आपल्या शरीरांत त्यांचें संपादन आणि वृद्धि आपण केली, तर ते या आतां सांगितलेल्या विध्वंसक जंतूंचे जेते झालेच पाहिजेत. सगळें कांहीं क्षेत्रावर अवलंबून आहे अप्पासाहेब. कुविचारांनीं रक्त दूषित झालेंच पाहिजे. आणि दूषित रक्तांतच रोगांचें जनन व वर्धन होत असतें नाहीं का ? शुद्ध विचारच रक्ताचें शुद्धीकरण करून आरोग्य आणि जीवन यांचें वर्धन करीत असतात. आतां, आनुवंशिक रोग असे कांहीं आहेत, हें मी कबूल करितों. पण त्यांचा प्रतिकार रोगी माणसाच्या विवाहाला प्रतिबंध करून, तसेंच बालपणींच योग्य ती काळजी घेऊन, करतां येण्याजोगा आहे. पण दुर्दैवानें तशी काळजी कितीजण घेतात ?”

“ काळजी ती काय घ्यायची बालपणीं ?” उषेनें प्रश्न टाकला.

“ मुलांच्या स्वेच्छेला आळा घालणें,” सुधाकरांनीं उत्तर केलें, “त्यांचें कांहींहि चालूं न देणें. जीवनाचा पहिला धडा आत्मत्याग–तो त्यांनां शिकविणें.”

उषेच्या पांढऱ्या फटफटीत गालांवर रक्तछटा आली व श्रीमंत खालीं पाहूं लागले.

"आपलं आपण जपलं नाहीं, तर दुसरं कोण जपणार आपल्याला ?" श्रीमंतांनीं प्रश्न केला.

"आपली आपण योग्य ती काळजी घेतल्यानं कांहीं स्वार्थत्यागाला व्यत्यय नाहीं येत." सुधाकरांनीं उत्तर केलें. "पण त्याहून अधिक म्हणजे निव्वळ दुर्गुण. आपण दुसऱ्याला ओझेंसें होऊं नये, म्हणून ज्याप्रमाणें आपण आपल्या उदरनिर्वाहाकरितां कांहीं काम करितों, त्याचप्रमाणें आपल्या आजारीपणानं दुसऱ्याला त्रास होऊं नये, त्यानं आपलें जिणें परावलंबी होऊं नये, म्हणून आपण आपल्या प्रकृतीची काळजी घेतलीच पाहिजे. ती न घेऊन कसं चालेल ? रुग्ण-स्थितींत असणें, म्हणजे सृष्टिनियमांचें आपण उल्लंघन केल्याचें कबूलच करणें आहे, हें का सांगायला हवं ?"

"पण कित्येक माणसं, त्यांचा कांहीं दोष नसतांहि, आजारी पडतात; याचा उलगडा कसा करायचा ?" डॉ. भास्कररावांनीं विचारलें.

"शक्य नाहीं तसं होणं." सुधाकर जरा जोरानें म्हणाले; "मूळची प्रकृति निरोगी असतां, स्वतःच्या चुकीवांचून आजारी पडणें अशक्य. ती चुकी नैतिक असो वा शारिरीक असो; पण सृष्टिनियमाविरुद्ध चुकी झालीच असली पाहिजे. एखादा आनुवंशिक रोग त्याच्या अंगीं असला, तर तोहि त्यानं मनांत आणल्या-वर गेलाच पाहिजे. माणसाचा जन्म आजारीपणांत काढण्याकरितां केलेला नाहीं, तर शक्तिमान् रहाण्या-करितां केलेला आहे. या भूमीचा तो दास होऊन रहाण्याकरितां त्याचा जन्म नाहीं. तर तिचा प्रभु असण्याकरितां त्याचा जन्म आहे. त्याच्या शक्तीची, तशीच वैयक्तिक प्रभुत्वाची सामग्री सृष्टींत आहे; तिचा त्यानें फक्त उपयोग करून घ्यायचा असतो; सृष्टि ती द्यायला सदा सिद्धच आहे. आपल्याला अहितकर असं देवाच्या योजनेंत अणुभरहि कांहीं नाहीं हें माझं ठाम मत आहे."

सुधाकरांच्या मनाला पुष्टि देण्याकरितांच कीं काय, घड्याळांत अकराचे ठोके पडूं लागले. त्याबरोबर ते एकदम उठून "अच्छा ! घेतों आतां रजा श्रीमंत !" ह्मणून खुर्चीच्या पाठीवर टाकलेला आपला पंजाबी साफा ते बांधूं लागले व दुसऱ्या दिवशीं उजाडत आपला तंबू पहाण्यास येण्याविषयीं त्यांनीं सर्वांनां आग्रहानें सांगितलें.

त्यांनां पोंचविण्यास आह्मीं बागेच्या दारापर्यंत गेलों. जातांनां असा कांहीं योग आला, कीं इतर सर्व पुढें राहून सुधाकर माझ्याजवळ आले व मजकडे पाहूं लागले. ते मजकडे पाहाताहेत हें मी पाहाण्यापूर्वीच माझ्या मनोदृष्टीला दिसून आलें; तसें चटकन् मी त्यांच्याकडे पाहिलें. त्यांची मुखप्रभा अर्थपूर्ण दिसली; तरी ते शांतपणें मजजवळ बोलूं लागले.

"शेवटीं आपली भेट झाली, ह्याचा किती आनंद होतो आहे मला ! हीं कित्येक वर्षें फक्त नांवानेंच माहिती होती मला तुझी,—आणि अंतर्यामानें !"

मी यावर कांहींच बोलल्यें नाहीं. अनिर्वचनीय भीति व आनंद यांच्या प्रवाहांत माझें मन वाहून गेलें होतें यावेळीं.

"उद्यां सकाळीं आपली भेट होईल, तेव्हां बोलूं आपण पुष्कळ." ते पुढें ह्मणाले. तरी मी कांहींच प्रत्युत्तर केलें नाहीं.

"कित्येकदां असं होतं, कीं आपली भेट पूर्वीं झालेली आहे, याचं प्रत्यक्ष ज्ञान नसतांहि आपण पूर्वीं चिरपरिचित होतों असं आपल्याला एकदम वाट-यला लागतं. नाहीं का होत असं ?"

"खरंच." त्यांनां ऐकायला आलें असेल नसेल, अशा अस्पष्ट स्वरांत मी ह्मणाल्यें. स्मित करून त्यांनीं आपली दृष्टि मजकडे लाविली. ती अगदीं प्रेमपूर्ण होती.

"ठीक. आतां उद्यां आपली भेट !"

"होय." असें मी उत्तर केलें. माझें मन मधुर, शांत रसाचा आस्वाद यावेळीं घेत होतें.

बागेच्या दाराशीं पोंचतांच "घेतों रजा आप्पा-साहेब," ह्मणून ते निघून गेले.

थोड्याच वेळांत त्यांच्याबरोबर दिलेल्या गड्याच्या हातांतले कंदील चांदण्याप्रमाणें दिसूं लागून, आस्ते आस्ते ते अदृश्यच झाले, तरी आम्ही सर्व कांहीं वेळ तिकडे पहातच होतों.

"विलक्षण गृहस्थ दिसतात !" डॉक्टर हातांतील सिगारेट फेंकून ह्मणाले; "बुद्धिमत्ता आणि विक्षिप्त-पणा याचें मिश्रणच दिसतें एक !"

"चुकतां डॉक्टर तुम्हीं" श्रीमंत चटकन् ह्मणाले; व आम्हीं बंगल्यांत यायला निघालों.

" बुद्धिमत्ता तर मूर्तिमंत आहेतच सुधाकर! पण विक्षिप्तपणा असा मुळींच नाहीं बरें त्यांच्यांत." श्रीमंत पुढें ह्मणाले, कॉलेजांत असतांना जशी होती, तशी आहे वृत्ति त्यांची! त्याच्याहून साधा आणि हुशार विद्यार्थि नव्हता त्यावेळीं."

" पण आप्पा, ते तुमच्याइतकेच का आहेत वयानं?" उषेनें विचारिलें.

" अग, दोन अडीच वर्षांनींच लहान माझ्याहून ते. इतकेंच." श्रीमंतांनीं उत्तर केलें.

" छे! शक्य नाहीं श्रीमंत हें!" डॉक्टर ह्मणाले: " सगळं खोटं दिसतं हें. आपल्या बरोबरचे कॉलेजांतले गृहस्थ नसतील हे."

चालतां चालतां श्रीमंत एकदम थांबले; व क्रुद्ध मुद्रेनं डॉक्टरांकडे पहात " तेच सुधाकर देशमुख हे. ध्यानांत ठेवा, आरंभीं मलाहि शंका आली खरी पण ती निखालस खोटी होती: सुधाकरांच्या सत्यतेविषयीं शंका घ्यायची तर मग जगांत कुणाविषयीं घेऊं नये शंका?"

मुद्रेवरील क्रुद्धता जाऊन शांतपणें ते पुढें ह्मणाले, " सुधाकरांच्या नि माझ्या भेटीचा हा योग आल्यानें एका अर्थी फार आनंद होतो खरा: पण दुसऱ्या अर्थी वाईटहि वाटतें आहे. कारण माझ्या आचारविचाराला स्थैर्य येऊन त्यांनीं वृत्तीला आज जी शांति लाभली आहे, तिला त्यांची मतें विघातक आहेत. पहा,"—माझी आठवण होऊन, मला उद्देशून श्रीमंत पुढें म्हणाले, " तुला त्यांचीं मतें पसंत पडण्यासारखीं आहेत, तुझें नि त्यांचें एक सूत जमेल खचित. माझें आणि सुधाकरांचें जमावें कसें? मतांनीं आम्ही परस्परांचे प्रतिस्पर्धीच आहोंत. विकार निराळे, विचार निराळे, आचार निराळे! उत्तरध्रुव आणि दक्षिण ध्रुव एक होतील कधीं?"

इथें कांहीं तरी न रुचण्यासारखा विचार त्यांच्या मनांत येऊन ते थोडेसे थांबले व नंतर पुढें ह्मणाले: " एक गोष्ट लक्षांत ठेवायची, विशेषतः डॉक्टरांनीं; ती ही कीं, वेड ह्मणा, माथेफिरूपणा ह्मणा, सुधाकर एका बाबतींत अढळ आहेत. तिला त्यांनीं मघांशी 'जीवनाचें महातत्त्व' हें नांव दिलें. ती कोणती? तर मृत्यु असा नाहींच. आणि असणें शक्य नाहीं. तसेंच, जीवन हें अनंत असून, कोणत्याहि रूपांत असलें तरी तें अनश्वर आहे!"

" ह्मणजे काय, ते स्वतःला अमर समजतात?" डॉ. भास्कररावनीं कांहींसे सचेष्ट बुद्धीनें विचारिलें.

" अर्थात् मर्त्य असें कुणीच नाहीं व कांहींच नाहीं, असें त्यांचें ह्मणणें. व्यक्तिशः जीवन हें प्रगतिपर व स्थित्यंतररूप असून, अमर अशा आत्म्यानें आपल्या इच्छेनुरूप व रुचीनुरूप आपला भावी देह तयार केल्यावांचून त्याचें स्थित्यंतर घडणें शक्य नाहीं. हेंच जुनं पुनर्जन्माचें तत्त्व सुधाकर निराळ्या शब्दांत सांगतात, इतकाच भेद दोहोंत."

" जुनीं खुळेंच आहेत अझून त्यांच्या डोक्यांत." उषेनें उद्गार काढले.

"आहेतच हो! माझ्याहि डोक्यांत आहेत तींच खुळें." मी उत्तर दिलें.

एव्हांना आम्हीं आंत दिवाणखान्यांत येऊन पोहोंचलों. मंडळी तिथें खुर्च्यांवर बसणार, असें पाहून " जात्यें मी आतां झोंपायला." असें उषेला सांगून माझ्या अंतर्यामाला एकान्त देण्याकरितां मी आपल्या खोलींत गेल्यें!

---

## प्रकरण सातवें

# पूर्वस्मृति

आत्मा जेव्हां आनंद विकाराचा निःशंकपणें स्वीकार करील, तेव्हांच तो खरें सुख अनुभवितो; एरव्हीं नाहीं. मला या खऱ्या सुखाची त्या चिरस्मरणीय रात्रीं अनुभूति आली. मंद वायुलहरी आपलीं शाखापर्णे सकंपित करितात, ह्मणून ज्याप्रमाणें वृक्षाला आनंद होतो, किंवा नवविकसित कलिका ज्याप्रमाणें कोंवळ्या सूर्यकिरणांनीं आनंदित होते, कां तें तिला किंवा वृक्षालाहि सांगतां येत नाहीं; त्याप्रमाणें मी ज्या सुखाचा अनुभव घेत होत्यें त्याची मीमांसा कांहीं मला करतां येत नव्हती. विचाराला मी वावच दिला नाहीं; विकारालाच मी वाहून घेतलें होत्यें असें म्हटलें तरी चालेल. आतां कारणावांचून कार्य घडत नाहीं, त्याप्रमाणें श्रीमंताशीं, किंवा उषेशीं, किंवा डॉ. भास्कररावासारख्याशीं, सुधाकरांचा जो हा संबंध

आला आहे, तो केवळ मजकरितांच, हें मी जाणून होत्यें; तरी मी तेव्हां त्या गोष्टीचा काडीभरहि विचार केला नाहीं. सुखशांतींत मनाला स्वैर विहार करूं देण्यांतच मला संतोष वाटला. दिवसभर खेळून भागलेल्या मुलासारखी मला गोड झोंप लागली; आणि सकाळीं जागें झाल्यावर त्या मुलाप्रमाणेंच मला जग अगदीं नवें, सौंदर्यसंपन्न वाटलें. आकाशाची मुखश्री निष्कलंक दिसली: ज्या प्रकाशमय वातावरणांत माझा संचार झाला होता, त्याच्यांत अभ्रपटलाचा प्रवेशहि होणें शक्य नव्हतें. अर्थात् तें वातावरण मनोनिर्मित होतें व त्याचें स्थित्यंतर माझ्या इच्छेव्यतिरिक्त दुसऱ्या कशानेंहि होणें शक्य नव्हतें, हें उघड होय! देहाची जडपरिस्थिति कशीहि असली, तरी ह्याप्रमाणें आत्मप्रकाशांत प्रत्येकाला रहातां येणें शक्य आहे. 'तुला इतका आनंद कसला झाला आहे? तो व्हायला मला तर कांहीं खरें कारण दिसत नाहीं! तुझ्या रुचि, कल्पना मनोविकार ह्यांशीं एकतान अशी कोणी व्यक्ति तुला भेटल्यासारखी वाटते? पण तुझी ही कल्पना भ्रामक ठरण्याचाहि संभव आहे. ज्या आनंदलहरीवर तुझा विहार चालला आहे, ती तुला एखाद्या दुःखपाषाणावरहि नेऊन आपटण्याचा संभव आहे!–ह्या तुझ्या हर्षातिरेकावरून तुझा पुनर्विवाहाचा विचार झाला आहेसा दिसतो.'–असा, ज्यांनां व्यवहारज्ञ ह्मणून ह्मणतात, त्यांतला एखादा मला प्रश्न करील, तर त्याला मी ह्मणेन कीं 'पुनर्विवाह हा शक्यच नसतो. ज्याला जग पुनर्विवाह ह्मणून ह्मणतें, तो पुनर्विवाहच नसतो मुळीं! शिवाय, माझ्या मनांत सुधाकराविषयीं ह्यावेळीं स्नेहावाचून दुसरा कोणताच विकार उद्भवलेला नव्हता. त्यांचीं मतें माझ्यासारखींच असून मी आजवर ज्या मार्गानें जाण्याचा प्रयत्न केलेला होता, त्याच मार्गानें ते गेलेले होते, ह्याविषयीं मला मुळींच शंका नव्हती. दोघींच्या आवडीचें एकच गाणें दोघीजणीं ज्याप्रमाणें एकाच गळयावर गातात, त्याप्रमाणें आह्मी दोघें ज्या विचारसृष्टींत आजपर्यंत स्वतंत्रपणें भ्रमत होतों, त्या विचारसृष्टींत इतउत्तर संगतीनें राहूं असें मला वाटलें तर त्यांत विशेष तें काय?

सुधाकरांचें तें विद्युन्मंदिर रात्रीच्या काळोखांत प्रकाशित होऊन जितकें मनोरम दिसत होतें, तितकेंच दिवसाच्या प्रकाशांतहि विद्युत्प्रकाशावांचून दिसत होतें. त्यांत जाऊन मी तें कधीं पाहीनसें मला झालें होतें. पण उषेला रात्रीं ताप भरल्यामुळें 'जावें कीं, न जावें' अशा घुटमळ्यांत श्रीमंत पडल्यामुळें, ठरल्याप्रमाणें उजडत आह्मांला तें पहाण्यास जातां आलें नाहीं. शेवटीं "आपण जावें श्रीमंत, मी रहातों त्यांची काळजी घ्यायला" असें डॉक्टरांचें आश्वासन मिळाल्यावर मी, श्रीमंत व रामभाऊ, असें तिघेच जायचा विचार करतों आहोंत तोंच सुधाकरांची मोटार आह्मांला न्यायला आल्याचें गड्यानें येऊन सांगितलें. आम्हीं तिघें लागलींच मोटारींत चढलों. पहातों तों सुधाकरांच्या तंबूवरून वळण घेतलेला, पण मोटार जाण्यासारखा एक चांगला प्रशस्त रस्ता होता.

क्षणांत आम्हीं तंबूसमोर येऊन उतरलों. सुधाकर आमचें स्वागत करायला तंबूबाहेर उभे होतेच! आम्हीं उतरतांच, उषेला ताप आल्याचें ऐकून व त्यामुळें तिला आणि डॉक्टरांनां येतां आलें नाहीं हें पाहून त्यांनां वाईट वाटलें. त्यांनीं आह्मांला तडक तंबूत नेलें; व तंबूंतील एक एक दालन ते आह्मांला दाखवूं लागले.

तंबूचा आकार एखाद्या बंगल्यासारखा असल्यामुळें व गालीचे, रेशमी पडदे, मखमली, कोचें, खुर्च्या, संगमरवरी टेबलें, पुष्पकलश, जगांतील उत्तमोत्तम चितार्‍यांच्या हातच्या तसबिरी व शिल्पकारांच्या हातच्या भिन्नवर्णीय व भिन्नजातीय पाषाण मूर्ति, आणि विविधाकाराच्या व रंगाच्या पुष्पसमूहाप्रमाणें वर छताला लटकलेले ते विद्युद्दीप, यांनीं तो सुशोभित केला असल्यामुळें, आंत शिरतांच आपण एखाद्या राजप्रासादांत प्रवेश केला आहेसें वाटलें. श्रीमंत तर आश्चर्यानें स्तंभित होऊन गेलेले दिसले.

"राजविलासी आहे तुमचं हें सगळं." श्रीमंतांनीं उद्गार काढले. "वडिलार्जित धनाचा सद्व्यय केला आहे सुधाकर तुम्हीं."

"धनाचा व्यय हा व्हावाच लागतो" सुधाकरांनीं सविनोद उत्तर केलें. "पण मी वडिलार्जित धनाला हातहि लावला नाहीं अझून. माझा मीच मिळवितों आणि खर्चितों."

"म्हणजे! तें कसं?" असें ह्मणून श्रीमंत त्यांच्याकडे जिज्ञासाबुद्धीनें पाहूं लागले.

" कसं तें सांगायला वेळ लागेल बराच आप्पासाहेब " सुधाकर हांसत हांसत ह्मणाले. " कुणाला लुटून बुडवून नाहीं मिळविलं मी कांहींहि. इतकेंच सांगतों सध्यां. सृष्टीजवळ कुबेराची संपत्ति आहे पण तिच्या भांडाराच्या किल्ल्या ठाऊक नसतात बहुजनाला. तिच्यावर ज्याचें निस्सीम प्रेम, त्यांनां मात्र ती अनंत हातांनीं देत असते. तशीच देते-ती मला पोटभर झालं. वडिलांनीं मला रगड ठेविलें आहे तरी माझी कमाई करायलाच हवी नाहीं का ? आजकालच्या उद्योगी जगांत अभिमानानें रहायला ज्याचा त्यानें उद्योग करून कांहीं तरी धनसंचयच करायला हवा."

एकामागून दुसरें, दुसऱ्यामागून तिसरें अशीं पांच सात दालनें पाहिल्यावर आम्हीं एका विस्तीर्ण खोलींत आलों. आंत शिरतांच ' अहाहा !' असे उद्गार आह्मां तिघांच्याहि मुखांतून एकसमयावच्छेदें बाहेर आले. सुगंधांनीं ती नुसती भरून गेलेली दिसली. दृष्टीला दिपविणाऱ्या बिलोरी व चांदी सोन्याच्या कलशांतलीं तीं फुलें, हस्तीदंती नकशी केलेलीं तीं चंदनीं खुर्च्याटेबलें कोचें, आणि जरींत विणलेले ते वाळयाचे पडदे, यांनीं त्या खोलींत सुगंध नुसता दरवळलेला होता. सुवर्णमंचकावर सोडलेले ते जरतारी रेशमी पडदे, खुर्च्या कोचांवरील त्या नानारंगीं जरतारी मखमाली, गिर्द्यावरील विद्युद्दीपांची सुवर्णदीप्ति यांनीं दृष्टि अगदीं दिपून जात होती. त्याचप्रमाणें आम्हीं आंत शिरतांच एकदम सुरू झालेल्या यांत्रिक जलतरंग वाद्याचे स्वर, यांनीं आमचे कानहि केवळ भारून टाकले असें ह्मटलें तर ती अतिशयोक्ति होणार नाहीं. याच स्वरांनीं परवा मला इतकी वेडी केली होती ती.

" कादंबरींतल्या एखाद्या राजकन्येचाच महाल दिसतो हा." श्रीमंतांनीं उद्गार काढले.

" बायकामाणसांकरितां केली आहे ही खोली." सुधाकर ह्मणाले.

" पुढली तरतूद करून ठेविली आहेत खाशी." श्रीमंतांनीं विनोद केला, व रामभाऊबरोबर ते खोली बारकाईनें पहाण्यांत गढून गेले.

" हीं फुलें आज तुझ्याकरितां भरून ठेविलीं आहेत मी हातांनीं या कलशांत."

मी सलज्ज व साश्चर्य त्यांच्याकडे पहात राहिल्यें. " पण मी का राजकन्या आहे या महालांतली ?" मी त्यांनां विचारलें.

" नाहीं ? मग का मी स्वप्नांतच पाहिलं तें सगळं ?" स्मित करून मजकडे पहात ते असें ह्मणतांच माझें अंतःकरण कंपित होऊन कांहींतरी आठवल्यासारखें मला वाटलें. पण तें काय, तें मला सांगतां येईना. मला अशा स्थितींत पाहून "इथंच बसायचं आपण थोडा वेळ. चहा होईतोंपर्यंत," असें ह्मणून ते श्रीमंतांनां व रामभाऊंनां घेऊन तेथून एकदम निघून गेले.

याप्रमाणें मी एकटीच त्या खोलींत रहातां व सभोंवारच्या त्या मनोरम वस्तूंकडे पहात असतां, असल्या श्रीमंती थाटांत मी पूर्वीं राहिलेली आहे, नाहीं का ? असें मला वाटायला लागलें. अशा थाटमाटांत माझीं वर्षेंच्या वर्षें गेलेलीं आहेत नाहींत का ? वर्षेंच्या वर्षें! केव्हांचीं तीं ? माझ्या गत चरित्राचें मी सिंहावलोकन केलें. दहाव्या वर्षी वैधव्यापत्तिः अकराव्या वर्षी मातापितरांचा मृत्यूः या अकरा वर्षांत श्रीमंतीची ' श्री ' सुद्धां मी पाहिलेली नाहीं. पुढें अनाथ बालिकाश्रमांतील काळ व विद्याभ्यासांत झालेलीं हाडाचीं काडें तीं अगदीं याच वर्षी शेवटली परीक्षा होईतोंपर्यंत. मग श्रीमंतींत ते माझे केव्हांचे दिवस गेले ? या विचारांत गढून मी एका खुर्चीवर बसल्यें. वाळा, चंदन आणि फुलें यांच्या परिमलांत व जलतरंगाच्या संगीत लहरींत माझी तंद्री लागून, एखाद्या राजकन्येच्या किंवा महाराणीच्या ऐश्वर्यांत मी विशाल भूप्रदेशावर सत्ता चालवित्यें आहे, असें मला वाटायला लागल्यें. समोरच्या आरशांतलें माझें स्वतःचें प्रतिबिंब पाहून, माझ्या मुद्रेवरील अभिमान आणि डोळ्यांत चमकणारा उद्दामपणा हीं पाहून मी शेवटीं एकदम दचकून भानावर आल्यें.

" मीच का ती ? " माझ्या तोंडून उद्गार आले. " हा अभिमान आणि उद्दामपणा आला कसा माझ्या ठिकाणीं ?" ह्मणून मी तत्काळ उठून उभी राहिल्यें. व त्या खोलींत हिंडू लागल्यें. सुधाकरांनीं तर कांहीं प्रयोग केला नसेल माझ्यावर ? पण तें शक्य तरी आहे का ?

हिंडत हिंडत मी एका पुष्पकलशाजवळ आल्यें व उभी राहिल्यें. सुधाकरांनीं हीं सगळीं फुलें माझ्याकरितांच ठेविलीं आहेत, नाहीं का ? त्या कलशांतील

निशिगंधाचीं चार फुलें मी काढून घेतलीं. पहात्यें, तर त्याखालीं स्वस्तिकाच्या आकाराचा एक ताईत. माझ्या गळयांतहि तसलाच एक ताईत माझ्या वडिलांनीं अडकविलेला होता. माझीं सगळीं भावंडें अगदीं लहानपणींच मृत्युमुखीं पडल्यामुळें, माझ्या आयुरारोग्यासाठीं कुणी योग्यानें त्यांनां तो दिलेला होता. ज्याजवळ असला ताईत असेल, त्याजवर कोणतेहि वाईट बाह्यसंस्कार होणें शक्य नाहीं, असें ते म्हणत असत. तें माझ्या लक्षांत होतें व माझी त्यावर श्रद्धाहि होती. सुधाकरांचा ताईत पाहून माझ्या गळयांतल्या ताईताची मला आठवण होऊन, त्यांच्याबद्दल आलेली कुशंका मला शिवली तरी कशी याचें माझें मलाच आश्चर्य वाटायला लागलें.

मग माझ्यांत आज कुणा निराळयाच व्यक्तीचा संचार झाल्यासारखें मला कां बरें वाटावें ? कां तें मला कांहींच सांगतां येईना. पण मी त्या संचाराचा बराच प्रतिरोध मात्र केला. तीं निशागंधाचीं चार फुलें मी आपल्या डोकींतल्या आकाशफुलाशेजारीं खोवून खोलीबाहेर आल्यें व आप्पासाहेब, सुधाकर आणि रामाभाऊ बोलत बसले होते, त्या दालनांत शिरल्यें.

तिथें जातांच सुधाकरांनीं मजकडे पाहिलें. आमचें दृष्टिमीलन झालें. तो पुष्पसंदेश मला पोंचला आणि कळलाहि, हें पाहून त्यांची दृष्टि उज्वलित झाली.

विद्युत्शक्तीविषयीं गोष्टी निघाल्या होत्या.

" विजेचें सामर्थ्य आपल्यांतील फार थोड्यांनांच कळलेलें आहे आप्पासाहेब " सुधाकर म्हणाले. " खरं पहातां, आपल्याला ऐहिक संपत्तीच्या कोणत्याहि भागाचें पुरें ज्ञान अद्याप झालेलेंच नाहीं. सर्व प्रकारच्या कार्याला, मानसिक आणि शारीरिक, त्याचप्रमाणें आपल्या प्रगतीला पुरून उरेल, इतकी सामग्री सृष्टीनें आपल्याला दिलेली आहे. पण तिची महति आपल्याला कळत नसल्यामुळें ती सध्यां निरुपयोगी झालेली आहे. वातावरणांतील पृथ्वीवरील समुद्रांतील हरएक शक्तीकडून आपली सेवा आपल्याला करून घेतां येण्याजोगी आहे. सृष्टिशक्तीच्या ज्ञानानें आपलें स्वामित्व तिच्यावर स्थापित करतां आलेंच पाहिजे. वाफेची ' चमत्कृतिजनक ' शक्ति कळायला यूरोपांत किती वर्षें लागलीं ! त्या शक्तीचा शोध करणाराचा प्रथम तिकडे किती उपहास झाला ! पण त्या शक्तींत नवीन असं कांहीं तरी होतें का ? ती अस्तित्वांत होतीच. तिचा फक्त उपयोग करून घ्यायचा होता तो उद्योगाभावानें झालेला नव्हता इतकेंच. विजेविषयींहि असंच. ती ' चमत्कार'शी आपल्याला वाटते; पण तिच्यांत चमत्कृतिजनक तें काय आहे ? तिचं आपण अद्याप ज्ञान करून घेतलेलें नाहीं, इतकंच. शास्त्राचे नवे शोध रोज लागताहेत तरी आपण दुराग्रहानें अज्ञानीच रहातों आहों याला दुसरं कुणी काय करायचं ? आपल्या देशांतल्या विविध सृष्टशक्तींचें ज्ञान आपण करून घेऊन त्याचा उपयोग करूं तर हा देश प्रतिस्वर्ग होईल; इतकी सृष्टिसंपत्ति त्याला लाभलेली आहे. आतां कांहीं थोड्या माणसांचें लक्ष इकडे वळलेलें आहे हें खरें."

"तुमचें स्वतःचें मुख्यतः " श्रीमंत मध्येंच म्हणाले.

सुधाकर हांसले. " अर्थात् ! माझं लक्ष वळलें आहेच तिकडे. बरं, आतां चहाला चलावें." म्हणून ते उठले. आम्हीं सर्व त्यांच्याबरोबर दुसऱ्या दालनांत गेलों. चहा, दूध, बिस्किटें, पाव, फळफळावळ हीं टेबलावर रांगेनें मांडून ठेविलेलीं होतीं. आम्हीं सर्व बसून तीं खाऊं लागलों.

चहाचा एक घोट घेतांच श्रीमंतांनीं "कुठला चहा हो हा ? इतका सुंदर चहा कुठेंच पाहिला नाहीं आजवर आपण !" असें सुधाकरांनां उद्देशून ते म्हणाले.

" खरोखर ! इतका सुंदर चहा कधींच घेतला नाहीं मी" असे मीहि उद्गार काढले.

" विशेष असं कांहीं नाहीं त्या चहांत " सुधाककरांनीं उत्तर केलें. " तो खरा चहा आहे इतकंच. तिबेटांतच मिळतो हा. दुसऱ्या कुठं पहायला मिळायचा नाहीं कधीं. तुम्हांला विशेषतः ठीक हा श्रीमंत."

" मला, मलाच तो कां बुवा ?" श्रीमंतांनीं तात्काळ प्रश्न केला.

" कारण आपण पक्के चहापी होऊन, प्रकृति अशी करून घेतली आहांत म्हणून. तुमच्या सध्यांच्या उपायांनीं कांहीं सुधरायची नाहीं श्रीमंत कधीं ती."

सुधाकरांनीं असें म्हणतांच " मलाहि किती दिवस वाटतं आहे असंच ! मला तें बोलून दाखवावयाचें धाडस झालं नाहीं इतकेंच." असें मी म्हणाल्यें.

श्रीमंत स्मित करून मजकडे पहायला लागले.

" एकूण तूं भितेस मला तर. पण तुझीं तीं नुसतीं तत्त्वें ऐकून का माझी प्रकृति सुधारणार होती रतिभर तरी ?"

" कृतिज्ञानावांचून तत्त्वज्ञान फुकट आहे श्रीमंत, कबूल करतों मी तें." सुधाकरांनीं मजकडे पाहून श्रीमंतांनां उत्तर केलें. " पण गीताबाईनें आपलं तत्त्वज्ञान कृतींत उतरून चांगली प्रकृति व समाधानवृत्ति ह्मणजे काय, तें प्रत्यक्ष दाखविलेलं दिसतं आहे नाहीं का? मग तिचीं तत्त्वें ऐकून आपली प्रकृति सुधारली नसती असं कशावरून ?"

" शक्यच नाहीं तें." श्रीमंतांनीं थोडेंसें चिडून प्रत्युत्तर केलें. " तिचा सगळा काळ गेलेला आहे घरांतल्या सावलींत स्वस्थपणें पडून विद्याभ्यास करण्यांत. बाहेरचं जग कसं तें ठाऊकहि नाहीं तिला. त्यामुळें क्षुल्लक गोष्टींनींहि तिचं समाधान होऊन, प्रकृतीवर हितकर परिणाम होतो तिच्या संतुष्ट वृत्तीचा. दोन फुलं पाहिलीं, एखादें गाणें ऐकलं, कीं झालं तिचं समाधान. पण माझी गोष्ट का तशांतली आहे ? अशांनीं का मला सुख होणार, आणि प्रकृति सुधारणार आहे माझी ? "

" दोन फुलं, एखादें गाणें, या का क्षुल्लक गोष्टी श्रीमंत ? " सुधाकरांनीं प्रश्न केला.

" संसारी पुरुषांनां क्षुल्लकच वाटणार त्या." श्रीमंतांनीं उत्तर दिलें.

" मग संसारहि क्षुल्लकच नाहीं. एका दृष्टीनें हा संसारहि असार क्षुद्र, नाहीं का ठरत ? "

" या निवृत्तीच्या गोष्टी नका सांगूं सुधाकर." श्रीमंत कांहींसें चिडून हंसत ह्मणाले; "माझं ह्मणणं इतकंच कीं, गीतेसारख्या मुलीला माझ्यासारख्याच्या प्रकृतीची कितीशी कल्पना येणार ? कोणत्या उपायांनीं ती सुधारेल, कोणत्यांनीं नाहीं, हें तिला कसं सांगतां येणार ? मला काय होतें आहे, तें तरी ठाऊक आहे तिला ?–तिचा कटाक्ष आहे सगळा डॉ. भास्कररावावर. मला का ठाऊक नाहीं तें ?"

" नाहीं, कुणावर नाहीं माझा कटाक्ष." मी तात्काळ उत्तर दिलें. " कोण मनोभावानें आपलं काम करितो, कोण नाटकी सोंग आणितो, हें आपलं माझी मनोदेवता मला सांगते, इतकंच."

" म्हणजे, भास्कररावांनीं सगळं नाटकी सोंग आणलं आहे, असंच कीं नाहीं तुझं ह्मणणं ?" श्रीमंत म्हणाले, "त्यांनां आपलें काम खरोखर कांहीं करतां यावें तसें करतां येत नाहीं, असा तुझा सिद्धांत. पण अशी फसवणूक करण्यांत त्यांचा हेतु तरी काय असणार ?"

सुधाकर हांसले.

" व्यवहाराच्या गोष्टी सांगतां आप्पासाहेब; आणि डॉ. भास्कररावांचा हेतु कळत नाहीं आपल्याला ?"

चहा दूध वगैरे सर्व आटपून माणसांनीं टेबलावरील सामग्री हलविली, आणि मंडळीपुढें पानसुपारीचें तबक आलें.

" तो हेतु काय सांगायला हवा आपल्याला ?" सुधाकर पुढें म्हणाले. " तुमच्यासारखे सरदार आणि उषाताईसारखी रूपगुणसंपन्न एकुलती एक मुलगी. तुह्मां दोघांनांहि डॉ० भास्कररावासारखा पक्का व्यवहारी–धोरणी माणूस आपल्या मुठींत कां ठेवतो, तें सांगायला हवें कुणाला तरी ?"

श्रीमंत थोडेसे क्रुद्ध झाल्यासारखे दिसले व आतां कांहींतरी ते प्रत्युत्तर करणार, तोंच त्यांनीं माघार घेतली; आणि शांतपणें ते ह्मणाले, " खरी स्थिति ठाऊक नाहीं तुह्मांला सुधाकर. वेदान्ती असलां, शास्त्रज्ञ असलां, तरी सर्वज्ञ कांहीं नाहीं तुम्हीं. डॉक्टरांवांचून चालणंच शक्य नाहीं माझं. माझा रोग का आतां बरा होणारा आहे ?"

" खास बरा होणारा आहे तो. " सुधाकरांनीं उत्तर केलें. " आपण रोगमुक्त झालांच पाहिजेत."

श्रीमंतांच्या निस्तेज चेहऱ्यावर एकदम आशेचं तेज चमकूं लागलं.

" बरा होईन मी ? पण सुधाकर, माझं दुखणं तरी काय आहे, तें ठाऊक आहे तुह्मांला ?"

" आहे ठाऊक मला श्रीमंत. त्याला कारण काय झालं, केव्हां झालं, तें वाढलं कसं, आणि त्याचा शेवट कसा होणार, सगळं ठाऊक आहे मला. तसंच तें घालवितां कसं येईल, तेंहि जाणतों मी. पण तें होणं, डॉ. भास्कररावापेक्षां, किंवा दुसऱ्या कुणा डॉक्टरापेक्षां तुमच्या स्वतःवरच अवलंबून आहे अधिक. सध्यांच्या उपायांनीं मात्र तें कमी होण्यापेक्षां वाढतच जाणार अधिकाधिक. पहा, आत्तां यावेळीं कळ आली तुम्हांला थोडीशी, नाहीं ? "

" हो. आली खरी. पण ती कशी कळली तुम्हांला.

" तुमच्या मुद्रेवर दिसते ती स्पष्ट. पहा आत्तां घालवितों ती क्षणांत, तुम्हीं सांगाल तर.

" सांगायला पाहिजे मी ? " श्रीमंतांनीं उत्तर केलें; " पण घालवितां येईल कां ती तुम्हांला ? "

" मी गप्पा कधींच ठोकित नाहीं. तुम्हांला ठाऊक आहेच आप्पासाहेब. " सुधाकर हांसत म्हणाले व त्यांनीं खिशांतून एक सोन्याची डबी काढली; यांतल्या या दोन गोळ्या विड्यांत खा आधीं. आत्तां राहील कळ तुमची."

तबकांतील एक पट्टी उचलून तिच्यांत त्यांनीं दोन बारीक गोळ्या घातल्या व पट्टी श्रीमंताजवळ दिली.

" टाका ती खाऊन अगदीं निर्भय चित्तानें. निदान दोन दिवस तरी कळ नाहीं उपटणार पुनः." असें सुधाकरांनीं ह्मणतांच श्रीमंतांनीं विडा तोंडांत घातला.

क्षण गेला असेल नसेल, तोंच श्रीमंतांच्या मुद्रेवर आनंद झळकायला लागला.

" कसं वाटतं आहे आतां ?" सुधाकरांनीं प्रश्न केला. " कळ आहे का ?"

" गेली." श्रीमंतांनीं उत्तर केलें; " कशी क्षणांत गेली हो ती !"

" ठीक ! आतां नाहीं येणार ती. आजतर नाहींच. आणि उद्यांहि नाहीं उपटणार ती."

" क्षणांत कसं बर वाटायला लागलं हो !" श्रीमंत ह्मणाले. " मजजवळ देऊन ठेवाच त्या गोळ्या. असतील तेवढ्या द्या. आणि पुरवाच मला त्या इत-उत्तर."

सुधाकर स्मित करून त्यांच्याकडे पाहूं लागले.

" देऊन ठेवणं बरं नाहीं होणार श्रीमंत !" सुधाकरांनीं उत्तर केलें. " कधींकाळीं आणि विशेष दक्षतेनं उपयोग केला या गोळ्यांचा तर अगदीं रामबाण आहेत त्या. पण आपल्या हातीं त्या देऊन ठेवणं सुरक्षित नाहीं आप्पासाहेब.

त्या रक्त उत्तेजित करणाऱ्या असल्यामुळें, वरचेवर घेतल्या तर संवयच लागेल त्यांची, आणि अपायकर होतील अशा संवयीनें. शिवाय, डॉ. भास्कररावांच्या औषधाला त्या मारकहि होण्याचा संभव आहे."

" भास्करराव मला ठकविताहेत, असं खरंच का वाटतं तुम्हांला ? "

" अगदीं ठकविताहेत, असं नाहीं म्हणत मी, पण उषाताईच्या बाबतींत मात्र खास ठकविताहेत आपल्याला ते. तिची प्रकृति अगदीं निरोगी असतां, तिच्यावर विद्युत्प्रयोग चालविणाराला 'ठक' म्हणूं नये, तर काय म्हणायचं ?"

" अगदीं निरोगी आहे उषेची प्रकृति म्हणतां ? " श्रीमंतांनीं साश्चर्य प्रश्न केला. " पण आज इतके दिवस ती आजारी आहे."

" इतके दिवस ते किती ? दोन वर्षेंच ना ? नानासाहेबांच्या मुलाला ती द्यायची ठरलं होतं, तेव्हांपासूनच ना ? " सुधाकर शांतपणें म्हणाले.

मी आश्चर्यचकित होऊन त्यांच्याकडे पहायला लागलें. ही माहिती सुधाकरांनां कशी कळली ?

" नानासाहेबांच्या मुलाच्या मृत्यूचा तिच्या मनावर फार वाईट परिणाम झाला आहे आप्पासाहेब. तोच तिचा रोग. मानसिक आहे तो, शारिरीक नाहीं मुळीं. डॉ. भास्कररावांनां पक्कें ठाऊक आहे तें. तरी त्यांनीं तिला ' आपली रोगी ' केली आहे, ही फसवणूक नव्हे ?"

सुधाकरांचें हें भाषण ऐकून श्रीमंत किती वेळ तरी गप्प राहिले. कांहींच बोलले नाहींत. शेवटीं अत्यंत गंभीरपणानें ते म्हणाले " भास्कररावाविषयीं तुमचा गैरसमज झाला आहे खास. काल पहिल्यानेंच पाहिलंत त्यांनां तुम्हीं ! एकाच भेटींत कितीशी कल्पना येणार माणसाची ?"

" पण त्या एकाच भेटींत त्यांचं सगळं रूप दिसलं श्रीमंत मला !" सुधाकरांनीं उत्तर केलें.

" ह्मणजे ? तें कसं ?"

" खरं नाहीं वाटणार तुह्मांला, कसं तें मी आतां सांगितलं तर." असें ह्मणून सुधाकरांनीं आपली खुर्ची कांहींशीं माझ्याकडे ओढून घेऊन, पुनः ते तिजवर बसले; " पण ही गीता सांगेल तुम्हांला, मी खरं सांगतों, कीं खोटं सांगतों तें. पण तिच्या सांगण्यावरहि तुमचा विश्वास नाहीं बसायचा. कशावरच तुमचा विश्वास नाहीं आप्पासाहेब. मग भास्कररावाचें खरें रूप मला कसें कळलें, तें सांगून तरी काय उपयोग ? गॅलिलिओचे आपण समकालीन असतां श्रीमंत, तर त्याचाहि छळ करायला कमी करतांना, असले नास्तिक आपण. आपल्याला तें सांगून काय होय ?"

" सांगा तर खरें." श्रीमंतांनीं पुनः ह्मटलें, "मग त्यावर विश्वास बसणें न बसणें, हा माझा प्रश्न."

"अर्थात् !" स्मित करून सुधाकरांनीं उत्तर केलें; "आपलें इहजीवन सर्वस्वी आपलें स्वतःचेंच आहे. त्याचें ज्याचें त्यानें वाटेल तें करावें; तसें करण्यास आपल्याला पूर्ण अधिकार आहे. पण आपल्या कर्मफलावर जसा आपला कांहीं अधिकार नाहीं, तसाच आपल्या कर्माच्या दृश्यरूपावरहि आपला कांहींच अधिकार चालत नाहीं; तें आपल्याला झांकून ठेवितां येणें शक्यच नसतें. प्रत्येक मनुष्य, स्त्री वा पुरुष, त्याला नकळत, त्याच्या आत्मप्रकट रूपांत जीवनक्रमण करीत असतात. त्यांचें सर्व बरें वाईट कर्म त्यांत प्रतिबिंबित झालेलें स्पष्ट दिसत असतें! आतां, प्रत्येकाला कांहीं तें पहातां येत नाहीं, ही निराळी गोष्ट !"

"काय म्हणतां तुम्ही, तें कळतच नाहीं मला !" श्रीमंत उद्गारले.

सुधाकरांनीं क्षणभर त्यांच्याकडे पाहिलें. "साधी गोष्ट आहे ही श्रीमंत." ते म्हणाले, "मनुष्याचें आत्मरूप प्रकट झालेंच पाहिजे, फुलांच्या विकासाबरोबरच त्याचा सुगंध दरवळतो; त्याप्रमाणें जीवनविकासाबरोबरच आत्मरूप प्रकट होत असतें. आपलें हें प्रकट झालेलें आत्मरूप आपल्याला झांकून ठेवितां येणें अशक्य. यालाच इंग्रजींत 'ऑरा' म्हणतात; यालाच आपल्याइकडे 'आत्मप्रभा' म्हणतात; प्रभा शब्द योजिला आहे श्रीमंत, आपल्या या रूपाला. तो केवळ अलंकार म्हणून योजिला नसून वस्तुस्थितीचाच दर्शक आहे तो. आपल्याभोंवतीं प्रभापटलच असतें. ही 'प्रभा' आपल्या शारिरिक व मानसिक जीवनानें पाडिलेली असते. ज्यांचे अंतर्चक्षु उघडलेले आहेत, त्यांनांच ती दिसते. त्यांच्या बाह्यचक्षूंनीं तुम्हीं त्यांनां दिसण्याआधीं अंतर्चक्षूंनीं तुमची ही 'आत्मप्रभा' त्यांनां दिसून येते. ती शुद्धतम, अति विमल असूं शकते; किंवा अशुद्ध, कलंकित असूं शकते. आपली नैतिक व शारिरिक स्थिति जितकी चांगली, तितकी ती शुद्ध असून, जितकी ती स्थिति वाईट तितकी आपली आत्मप्रभा अशुद्ध. डॉ. भास्कररावांचा स्वभाव, तसेच त्यांचे विचार त्यांच्या आत्मप्रभेंत याप्रमाणें स्पष्ट दिसतात आप्पासाहेब. आपण कसे आहांत तें, तसेंच आपलें सध्यांचें प्रकृतिमानहि आपल्या प्रभेंत याचप्रमाणें स्पष्ट दिसतें आहे."

श्रीमंतांच्या स्वभावाप्रमाणें ते सगळें अश्रद्धायुक्त मुद्रेनें ऐकत होते.

"या गोष्टी ऐकलेल्या आहेत मी सुधाकर" ते ह्मणाले, "इतर बाबतींत विश्वसनीय अशा शास्त्रीयविषयक मासिक पुस्तकांतून वाचलेलंहि आहे मी याविषयीं, पण हें सगळं काल्पनिक वाटतं मला."

"मग सांगायला कशाला सांगितलें मला आपण श्रीमंत ?" सुधाकरांनीं विचारिलें; "मला याविषयीं जें माहित आहे, आणि दिसतेंहि आहे, तेंच सांगतों आहे ना मी ?"

सुधाकरांची तीक्ष्ण दृष्टि टाळण्याकरितांच कीं काय, श्रीमंतांनीं तबकांतील सुपारी हातीं घेऊन तिच्याकडे ते पाहूं लागले !"

"आत्मप्रभेची ही नुसती कल्पना आहे, झाडं झाडें तशींच त्यांचीं पानें, हवेच्या विशिष्ट स्थितींत एक प्रकारची प्रभा पाडतात असे शोध लागलेले आहेत, एवढें कबूल आहे मला. पण माणसांचीहि तशी 'प्रभा' दिसत असेल, हें खरं नाहीं वाटत मला."

"अर्थात," असें म्हणून सुधाकरांनीं मागें खुर्चीवर अंग टाकलें. "जन्मांधापुढें दृष्टिसुखाची महति गाइलीत, तर ती त्याला खरी कशी वाटेल ?"

श्रीमंतांच्या कपाळावरील सुरकुत्या अधिक स्पष्ट दिसायला लागल्या.

"म्हणजे काय, असं म्हणतां कीं काय तुम्हीं, कीं अशा प्रकारचें प्रभापटल माझ्याभोंवतीं दिसतं आहे तुम्हाला ?"

"नाहीं तर ?" सुधाकरांनीं उत्तर केलं, "आपण जितके स्पष्ट दिसतां आहांत मला, तितकीच आपली प्रभा दिसते आहे स्पष्ट मला. पण ती शुद्ध नाहीं श्रीमंत, म्हणण्यासारखी. अशुद्ध आहे बरीच ती, धुरासारखी."

"वा शाबास !" म्हणून श्रीमंत हंसायला लागले. "बराच गौरव केलात आमचा."

"तिच्यांत काय काय दिसतं आहे, तें सगळें सांगूं का आपल्याला ?" सुधाकरांनीं गंभीरपणें प्रश्न केला.

श्रीमंतांचें हंसू पार मावळून गेलें व हात वर करून 'नको' असें ते जोरानें ह्मणाले. सुधाकरांनींहि अधिक कांहीं सांगितलें नाहीं.

"बरें हिची–गीतेची प्रभा काय म्हणते ?" श्रीमंतांनीं बळेंच स्मित करून प्रश्न केला; "तिची प्रभा तरी शुद्ध आहे का, असावी तशी ?"

सुधाकरांनीं क्षणभर कांहींच उत्तर केलं नाहीं. नंतर माझ्याकडे जणूं काय सहजगत्या त्यांनीं पाहिलें.

" अति शुद्ध आहे ही प्रभा." त्यांनीं उत्तर केलें; " आपल्याला ती दिसेल तर फार आनंद वाटेल श्रीमंत."

क्षणभर कोणीच कांहीं बोललें नाहीं. मला कसेंसेंच झालें. सुधाकर माझ्याकडे पाहूं लागले.

" मलाहि ती दिसेल, तर किती बरं होईल !" मी हंसत हंसत म्हणाल्यें. " माझी प्रभा कशी आहे, ती कांहीं मला ठाऊक नाहीं."

" ती कशी ठाऊक असणार ?" सुधाकरांनीं उत्तर केलं. " पण आपल्याभोंवतीं आपणच पाडलेली अशी असते इतकें ठाऊक असलें, म्हणजे झालें !"

श्रीमंत यावर काहीं बोलणारसें दिसलें. पण सुधाकरांचे सुधामधुर शांत स्वर ऐकून ते दबकले व अधिक कांहीं बोलले नाहींत.

" बरं, येतों आम्हीं आतां. " ते उठत म्हणाले: खूप झाल्या गप्पा. बरा मजेंत गेला वेळ."

"संध्याकाळीं पाठवूं का मोटार ?" सुधाकरांनीं उठत उठत प्रश्न केला. " ब्रह्मारण्याची मजा पहाण्यासारखी आहे इथल्या. तिकडे जाऊं आपण."

"असं म्हणतां !" श्रीमंत उद्गारले; "पण मी नाहीं येत संध्याकाळीं. मोटार येऊंद्या तुमची. ही गीता येईल तुमच्याबरोबर तिकडे. म्हणजे तिलाहि बरं वाटेल, आणि तुम्हांलाहि वादविवाद करावा लागणार नाहीं विशेषसा. खरं कीं नाहीं गीताबाई ? "

सुधाकरांनीं माझ्याकडे पाहिलें; आमची दृष्टादृष्ट झाली. आनंद आणि भीति यांनीं अंग कंपित झालें. " मी येणार नाहीं" असें मला म्हणतांच येईना.

" येईन मी. " मी अडखळत उत्तर केलें." "इथलं ब्रह्मारण्य पहाण्यासारखें आहे म्हणतात."

" ठीक. " श्रीमंतांनीं म्हटलें: " ठीक जमलं हें. सुधाकरांबरोबर जायला संकोच नको वाटायला गीते तुला. अगदीं संकोच वाटण्याचें कारण नाहीं. " मला हंसूं आलें. मला हें सांगायला नकोच होतें.

" संध्याकाळीं चाराला येईल बरं मोटार." सुधाकरांनीं मला म्हणतांच आम्हीं त्यांचा निरोप घेतला. श्रीमंतांची गाडी आम्हांला न्यायला आली होती, तिच्यांत आम्हीं चढलों, आणि क्षणांत श्रीमंतांच्या बंगल्यांत येऊन पोंचलों.

---

## प्रकरण आठवें

# गतजन्म

संध्याकाळीं चार वाजेपर्यंतचा माझा वेळ एक प्रकारच्या समाधींतच गेला, असें म्हटलें तरी चालेल.

" बरं वाटतं आहे ना आतां तुला ?" मी उषेला विचारिलें; " मग येशील का ब्रह्मारण्य पहायला माझ्याबरोबर ?"

" काय पहायचं आहे त्या ब्रह्मारण्यांत !" उषेनें उत्तर केलें; " पण तूं जा आपली. मला नाहीं पहायचं तें. सुधाकर आहेतच तुझ्याबरोबर. तुझं नि त्यांचं बरं जमलं आहे. मी कशाला मध्यें उगाच खोकला ?"

" वाहवा ग ! "–मीं म्हणाल्यें. " मला असं वाटत असतं, तर विचारल्यें का तुला ये म्हणून ?"

"ती बघ,–आलीच त्यांची मोटार तुला न्यायला." असं उषा म्हणतांच पहात्यें तर खरेंच, सुधाकरांचीच मोटार. आणि ती ते स्वतः घेऊन आलेले.

"श्रीमंत नाहींच येत ना ?" मी आणि उषा मोटारीजवळ जातांच सुधाकरांनीं प्रश्न केला. " उषाताईला बरं वाटतं आहेसं दिसतं आहे. पण ती नाहींच यायची–नाहीं ना ?"

उषेनें ' नाहीं ' म्हणतां, " मग चढ तूं तर " असें म्हणून सुधाकरांनीं मला चढण्यास हात दिला.

मी चढतांच, " लवकरच ये हं ! " असें उषेनें सांगतांच मोटार निघालीच.

सुधाकरांनीं साहेबी टोपी घातलेली होती, म्हणजे त्या वेळीं मोटारींत काढून ठेविलेली होती. कालच्याप्रमाणें साफा बांधलेला नव्हता. ती टोपी पहातांच न कळत मी स्मित केलें.

" फार सोयीची आहे ती." मजकडे पाहून ते म्हणाले; " उन्हातान्हांत तर अति उपयोग होतो तिचा. छत्रीचंहि काम होतं ह्या टोपीनं. आणि शिवाय अति साधी. ती आपली पगडी घ्या, कोण दिमाखी

दिसते ती. ती तर मला मुळींच आवडत नाहीं. मद्रासी रुमालहि आवडत नाहीं, तो अनिच बावळा. पंजाबी साफा ठीक. विशेष प्रसंगीं तोच वापरतों मी. आणि एरव्ही ही टोपी."

मी कांहीं बोलल्यें नाहीं, तरी माझी अनुमति माझ्या मुद्रेवर स्पष्ट दिसत होती.

"यूरोपियन पोशाखांत पुरुषांचा पोशाख फार सोयिस्कर, आणि साधा." ते पुढें ह्मणाले, "त्यांच्या बायकांचा पोशाख मात्र तितकाच बावळा आणि गबाळ. आपल्या महाराष्ट्रीय पोशाखांत तुमचा बायकांचा पोशाख फार सुंदर आणि सोइस्कर. आह्मां पुरुषांचा पोशाख मात्र तितकाच बावळा आणि गबाळ."

मला हंसूं आलें. सुधाकरांचें म्हणणें शब्दशः खरें होतें.

"सोय, साधेपणा आणि सौंदर्य हीं जिथं मिळतील तिथून घ्यावीत" ते पुढें म्हणाले. "धर्म त्यांच्या आड येत नाहीं; देशभक्ति त्यांच्या आड येत नाहीं. जितजेताभाव त्यांच्या आड येत नाहीं. ज्याला आपण 'आपला पोशाख' म्हणून म्हणतों, तो तरी आपला कितीसा आहे? अंगरखा मुसलमानी, सदरा मुसलमानी, पायजमा मुसलमानी पारशी कोट तर पारशीच, रुमालहि मद्रासी, कानडी, रहातां राहिलीं बंडी, धोतर आणि पागोटें. तीं तरी मूळचीं आपलीं महाराष्ट्रीय किंवा हिंदी, असं कशावरून? परिस्थित्यनुरूप इष्ट गोष्टी आजवर आपण दुसऱ्यांकडून घेत आलों आहों. आजच्या परिस्थितीला इष्ट अशा गोष्टी आपण आजहि घेतल्या तर कुठें बिघडतं?"

मोटार ब्रह्मारण्याच्या कांठावर येऊन धडकली. इथूनच तें किती तरी भयंकर दिसत होतें. मोटार सडकेआंत अरण्याच्या सीमेंत घेऊन व तिथेंच ठेवून, आम्हीं अरण्यांत पाऊल टाकतांच 'किर' वांचून दुसरें कांहींच ऐकूं येईनासें झालें. पुढें पुढें अरण्याच्या आंत-आंत आम्हीं जाऊं लागलों, तों तें 'किर'हि ऐकूं येईना. शांत! शांत! प्रगाढ शांत! शांत आणि स्तब्ध! झाडाचें पानहि या वेळीं हलत नव्हतें. त्याप्रमाणें प्रकाशहि त्या निःशब्दतेंत, निश्चलतेंत, रमून, स्वत्व विसरून तेजहीन झाला आहेसें वाटत होतें. ब्रह्मदेवानें सहस्र वर्षे येथें तपश्चर्या केली म्हणतात. खरोखरच तपश्चर्येला इतकें अनुकूल स्थल ब्रह्मांडांतहि मिळणें



दुस्साध्य. एकांत, मूर्त एकांतच तिथें नांदत होता म्हटलें, तर अतिशयोक्ति होणार नाहीं. हा एकांत, ही मूकता मला असह्य झाली. शरीरांतील शीर नि शीर तंतुवाद्याच्या ताणलेल्या तारेप्रमाणें स्पर्श करतांच तुटेल कीं काय–इतकी ताणलीशी वाटली, तरी माझ्या मुखांतून शब्दहि निघेना! विचार, विकार आणि स्मृति यांनां आलेली भरती मी आवरण्याचा प्रयत्न केला. हा केवळ कल्पनेचा खेळ, त्याच्या बरोबर मी वाहात कां जावें! असें मी आपल्या मनाला सांगूं लागल्यें. तरी, जणूं काय एखाद्या जाळ्यांत अडकल्या सारखें मला झालें, तें जाईना. सर्व पंचेंद्रियें रेशमासारख्या नाजुक, पण लोखंडासारख्या कठिण पिंजऱ्यांतच अडकल्यासारखीं मला वाटूं लागलीं. शेवटीं निरुपाय होऊन मी आपली दृष्टि सुधाकरांकडे वळविली. ते शांतपणें सप्रेम दृष्टीनें मजकडे पहातच होते. मला काय होतें आहे, तें त्यांनां कळलेंच आहेसें दिसतांच मी आपला हात त्यांच्याकडे केला.

"काय बरं याचा अर्थ?" मी अस्फुट शब्दांत ह्मणाल्यें; "कळेल का मला तो! आपला नि माझा विशेष परिचय नसतांहि—"

माझा हात त्यांनीं आपल्या दोन्ही हातांत घेतला.

"असं नाहीं ह्मणतां येणार" कंपित स्वरानीं त्यांनीं उत्तर केलें; "आपला परिचय फारकालचा आहे."

परवां रात्रीं स्वप्नांत ज्या अदृश्य व्यक्तीनें हात धरून मला काळोखांतून नेलें होतें तिचीच मला आठवण झाली. मी डोळे वर करून सुधाकरांच्या मुखाकडे पाहिलें. तों मला तें पूर्ण परिचयाचें दिसलें. ते कमलासारखे प्रफुल्ल नेत्र, तें विशाल भाल, तीं प्रतिभावंत मुखश्री, सर्व कांहीं मला चिरपरिचित असें वाटूं लागलें. आणि ही ओळख पटतांच माझें मन सभय व साश्चर्य होऊन स्तंभित झालें.

"आपला परिचय फारकाळचा आहे" पुनः ते ह्मणाले: "मात्र आपल्या मागल्या भेटीनंतर आपण फार दूर–फार फार दूर–गेलों होतों, इतकेंच. थोडा धीर धर. जराशानें ओळख पटेल माझी तुला. मला तुझी पटली आहे त्या प्रमाणेंच!"

स्मृति पूर्णपणें जागृत होऊन मला बोलायला धीर आला.

"पटली ओळख मला–ही आतांच." सकंप स्वरानें मी उत्तर केलें; "आपला परिचय फार–फार

काळचा आहे. पण तो कुठचा बरं? कुठचा तो? सांगावं मला."

माझा दुसराहि हात त्यांनीं आपल्या हातांत घेतला व मजकडे ते पहात राहिले. अनेकवर्ष ताटातूट झालेले मित्र अकल्पित रीतीनें एकाद्या निर्जन प्रदेशांत भेटले असतां त्यांच्या अंतःकरणांत जे विकार जागृत होतील, तेच विकार आह्मामध्यें जागृत झाले. असें असून आम्हां दोघांमध्यें कांहींतरी अभेद्य भिंतीसारखें उभें आहे व तें आह्माला परस्परांनां भेटूं देत नाहीं, असें आह्मा उभयतांनांहि वाटलें. भेटीच्या ह्या अनावर इच्छेला अवरोध आह्मांकडूनच झाला हें सांगावयास नकोच! आह्मां दोघांमध्यें अशी कांहीं एक रेखा आखून ठेविलेली होती, कीं ती दोघांपैकीं कोणालाहि ओलांडतां येणें शक्य नव्हतें.

सभय चित्तानें आणि जिज्ञासाबुद्धीनें मी सुधाकरांकडे पाहूं लागल्यें. त्यांची ती सतेज व गंभीर दृष्टि मजकडे लागलेलीच होती.

"आपला कुठचा परिचय आहे, तें मी सांगण्याचें कारणच नाहीं." त्यांनीं माझा एक हात सोडून प्रशांतपणें उत्तर केलें: "त्याचं तुला आपोआप स्मरण होईल जराशानं. पूर्ण स्मृतिनाश होणं शक्य नाहीं. मात्र आपल्या परस्परांविषयींच्या या आकर्षणाबद्दल आपल्याला आतां या क्षणीं आश्चर्य वाटणारच, तें स्वाभाविकच आहे.

मी कंपित झाल्यें. भीतीनें नाहीं, तर एक प्रकारच्या आनंदसंचारानें. तो कशाविषयींचा आनंद, तेंहि माझें मला सांगतां येईना.

"पुढें जाऊं आपण!" तें पुढें ह्मणाले, व मजवरील आपली दृष्टि त्यांनीं समोर वळविली. "या क्षणींच मी अधिक सांगितलं, तर तें अकालीं सांगितल्यासारखं होईल. तुला त्यानें भय वाटेल, कदाचित् रागहि येईल तुला. गतकालीं माझ्याकडून इतके अपराध झालेले आहेत, कीं भविष्यकाळीं तसे अपराध माझ्याकडून होऊं न द्यायला तूं मला साहाय्य केलं पाहिजेस. चला पुढं," असें ह्मणून ते मजकडे स्मित करून पाहूं लागले. "अरण्याच्या दुसऱ्या कांठावर जाऊं आपण." आह्मीं पुढें चाललों. किती वेळपर्यंत चाल-चाल-चाललों. दोघांपैकीं कोणीहि कांहीं बोललें नाहीं. कित्ती तरी चाललों: पण ब्रह्मारण्याचा दुसरा कांठ कांहीं येईना. खरें पहातां तो लांब नव्हता. पण मला त्यावेळीं इतकें कांहीं जड वाटत होतें, कीं एक पाऊल टाकणें, ह्मणजे एक कोस चालणें, असें मला झालें होतें. त्यामुळें तो कांठ लांबसा वाटला, यांत आश्चर्य नाहीं. शेवटीं आम्हीं त्या कांठावरील 'आर्थरसीट' वर येऊन उभीं राहिलों.

समोर प्रतापगड डोकें वर करून आह्माकडे टवकारून पहात होता. त्याच्याखालीं–आमच्या डावीकडे–सावित्री नदी ब्रह्मारण्यांतून उडी घेऊन वेगानें वहात जात असलेली दिसत होती. सूर्यप्रकाशांत ती रौप्यप्रवाहाप्रमाणें तळपत होती! सावित्री ही ब्रह्मदेवाची पत्नी. विवाहापूर्वी तिनें ब्रह्मदेवाच्या प्राप्तीकरितां ह्याच अरण्यांत तपश्चर्या केली. तपश्चर्या संपतांच बघतात तों सावित्री तापसी झालेली. तेव्हां तिला टाळण्यासाठीं त्यांनीं कड्याखालीं उडी घेतली. सावित्रीनेंहि त्यांच्या पाठीवर उडी घेतली व धांवत सुटली. ब्रह्मदेव तडक धांवत समुद्रांत जाऊन दडले. तीहि समुद्रांत शिरली व तेथें त्यांचें मीलन झालें. ह्या गोष्टीचें मला स्मरण झालें. निरभ्र आकाश असतां सूर्यास्ताच्यावेळीं येथून समुद्रहि दिसतो ह्मणतात: पण आह्माला कांहीं त्यावेळीं तो दिसला नाहीं. आमच्या पायाशीं–खालीं–काय होतें तेंहि आह्माला ह्यावेळीं दिसत नव्हतें, प्रकाशसागरांत वस्तुमात्र बुडून गेलें होतें.

"आतां मी सांगतों तुला आपली पूर्वी भेट कुठं झाली होती" सुधाकर एकदम ह्मणाले. "तसंच आपली आतां कां भेट होते आहे, तेंहि सांगतों तुला."

मी दृष्टि वर करून त्यांच्याकडे पाहिलें. हृदय धडधड उडूं लागलें. नानाप्रकारचे विचार मनांत येऊन गेले. मी बोलण्याकरितां ओठ हालविले; पण शब्दोच्चारच होईना.

"भिण्याचं कारण नाहीं," पूर्ववत् प्रशांतपणें ते ह्मणाले: "आतां हें खरं कीं गतकाळीं आपण जितके निष्काळजीपणानें वागलों, तितकेंच इतउत्तर दक्षतेनं वागलं पाहिजे. पण परस्परांविषयीं भरवंसा वाटणं हें मात्र आपणा स्वतःवरच आहे. बोलूंना पुढें?"

मी 'हं' असें मानेनेंच ह्मटलें. जवळच एक भली मोठी शिळा असून तिच्या दोन बाजूला चिमुकले वृक्ष होते: त्यांच्या शाखापल्लवांनीं त्या शिळेचें सिंहासन बनलेलें दिसत होतें. त्यावर त्यांनीं मला बसावयास सांगितलें: व स्वतः आपणहि शेजारीं बसले. येथून ब्रह्मारण्यापश्चिमेकडील सर्व प्रदेश एका दृष्टिक्षेपाबरोबर दिसत होता.

" कित्येकदा असं होतं" ते पुढें म्हणाले, " कीं रूढीनें जखडलेल्या आपल्या शिष्ट समाजांत मुद्दां, बाह्यतः अपरिचित असे स्त्रीपुरूष एकत्र आले असतां दृष्टादृष्ट होतांच त्यांच्यांत समजागृति होत असते. असं कां व्हावं, हें त्यांचं त्यांनां कळत नाहीं: पण त्याचा अनुभव मात्र त्यांनां येत असतो. असं एकदां झालं, कीं मग विश्वांतली कोणतीहि शक्ति त्यांनां वियुक्त ठेऊं शकणार नाहीं. आत्मा आत्म्याला भेटूं पहातो; हृदय हृदयाकडे धांव घेत असतें. त्यांनां आत्मवश करणाऱ्या शक्तीपुढें मग शिष्टाचार आणि रूढि हीं क्षणभरहि टिकत नाहींत. ती शक्ति सृष्टि नियमाचीच अधिकारस्थापना करीत असते. म्हणून तिला प्रतिरोध करणं, प्रत्यक्ष परमेश्वराच्याहि हातीं नसतं. त्या शक्तीचं नांव 'प्रेम' नाहीं का ? "

क्षणभर ते थांबले: आणि पुढें म्हणाले " ती शक्ति ज्यांचा योग करूं पाहील, त्यांचा वियोग करणं कुणालाहि शक्य नाहीं. कारण ती शक्ति सृष्टिधर्मच आहे. कळलं तुला हें ? "

मी खालीं मान घातली.

" आतां, त्यांचा योग व्हायला कदाचित् सहस्रावधि वर्षेंहि लागतील. कारण अनंत कालांत सहस्रावधि वर्षं हीं क्षणासारखींच. त्या सहस्रावधि वर्षांत त्यांनां विभिन्नपणें जीवन क्रमावें लागेल: विविध अनुभव घ्यावे लागतील: सुखावर पाणि सोडावें लागेल, हें खरें. पण अंतीं त्यांचा योग झालाच पाहिजे: तो न होणं अशक्य."

त्यांचा स्वर सकंप झाला. माझा हात त्यांनीं आपल्या हातीं घेऊन ते पुढें म्हणाले: " माझ्याबद्दल अविश्वास वाटत असेल, तर स्वतःवर तरी श्रद्धा असूं दे. माझ्याबद्दल तुला थोडी फार शंका आली, तर ती स्वाभाविकच आहे. तुझं वाचन बरंच झालेलं आहे: विचारहि तूं चांगलाच केलेला आहेस. तुझ्या मनाला शांति लाभलेली आहे ही एकच गोष्ट तें सर्व सांगत आहे. हा शांतिलाभ होण्याचं मुख्य कारण अलिकडच्या शिक्षणानें नाहींशी होणारी श्रद्धा तुझ्यामधून गेली नाहीं, हेंच होय. आणि त्या श्रद्धेमुळेंच तुझ्या वाचनाचा आणि विचारांचा तुझ्यावर व्हावा तो इष्ट परिणाम झालेला आहे. तुझं हृदय अदृश्य आणि चिरंतनच्या अशा गोष्टींकडे लागलेलं आहे, खरं उन्नत झालेलं आहे, खरं शांत झालेलं आहे, हे खरं, पण ते अजून एकटं एकटं आहे: माझ्या प्रमाणंच तें अजून एकटं असं आहे. नाहीं का गीते ? "

क्षणभर ते थांबले. मीहि कांहीं बोलल्यें नाहीं. या निःशब्दतेच्या क्षणांत मला जड आणि उदासवाणं असं एकदम झालं. ढगें तर नाहींना आलीं वर, म्हणून मला असें एकाएकीं झालें, हें पहाण्याकरितां मी वर आभाळाकडे दृष्टि केली. मनोहर वर्णछटांनीं पश्चिमाकाश चित्रित झालेलें होतें. निळ्या पटावरची ती गुलाबी–सोनेरी चित्रमाला पाहून कोणाची दृष्टि विलोभित होणार नाहीं ? या चित्रमालेवर धवल मेघपंक्ति चित्रित होण्याकरितां जणूं वाट पहात बसलेली दिसत होती. त्या देखाव्यांत माझें मनच रमून राहिलें नाहीं; तर प्रत्यक्ष अंतरात्माहि रमलासें मला वाटलें. माझा एक हात सुधाकरांच्या हातांत होता, तो एकदम त्यांनीं दाबल्यासारखें मला वाटलें; दृष्टीपुढें वीज चमकल्यासारखें कांहीं तरी चमकलें; व दुसऱ्याच क्षणीं तें पश्चिमाकाश, त्या खालील तो प्रतापगड आणि जिथें आम्हीं बसलों होतों, तें ब्रह्मारण्य हीं सर्व अदृश्य होऊन धुकें–धुकें–धुकें–! पुढें, वर, खालीं, मागें–सर्व दिशा बाष्पमय झालेल्या दिसूं लागल्या. मी उठून उभें रहाण्याचा बोलण्याचा प्रयत्न केला: पण उभेंहि रहातां येईना: व तोंडांतून शब्दहि निघेना. मी बेशुद्ध तर पडणार नाहींना ? असें मला वाटतें न वाटतें तों–सर्व गेलें ! पुनः मला पूर्ववत् शांत वाटूं लागलें. माझी दृष्टिशक्ति पूर्वीहून तीव्र झालीशी मला वाटली. दृश्यसृष्टि पूर्वीं कधींहि मला जितकी स्पष्ट दिसली नव्हती, तितक्या स्पष्टपणें आतां मला अनेक देखावे व गोष्टी दिसूं लागल्या. माझ्या दृष्टीपुढून त्या एकामागूनएक मंद गतीनें जाऊं लागल्या ! दुर्भेद्य गूढामध्यें आणि माझ्या मध्यें मलमलीच्या पडद्याप्रमाणें पसरलेल्या बाष्पपटावर त्यांचीं चित्रें मला सिनेमांतील चलचित्राप्रमाणें गतीनें दिसूं लागलीं. आपलें सर्व गतचरित्र प्रकाशांत त्याचप्रमाणें ध्वनींत, विविध रंगांत व विविध स्वरांत स्पष्टपणें लिहिलेलें असतें; आपले सर्व आचार, आपले सर्व विचार, आपले सर्व उच्चार यांची त्यांत नोंद केलेली असते, या गोष्टीचा अनुभव मला आतां अगदीं पूर्ण आला !

* * *

प्रथम एक विस्तीर्ण अरण्य दिसूं लागलें. द्राक्षाच्या लतांनीं गुरफटलेल्या प्रचंड वृक्षांच्या शाखापल्लवांतून आल्हादकर चंद्रकर भूभागीं उतरत होते. त्या चंद्रिकेंत एक जोडपें–तरुण व तरुणी–हातांत हात घालून चाललें होतें. तरुण त्या तरुणीजवळ कांहीं याचना करीत होता; पण ती कांहीं मान्य करीत नव्हती. एकदम त्याच्या हातांतील आपला हात काढून घेऊन, ती दूर झाली. तिचें मुख कांहीं मला दिसत नव्हतें; पण तिचा पोशाख राजशाली असून शिरोभागीं चिमुकला मुकुट झळकत होता. तरुण तिजपुढें क्षणभर खालीं मान घालून उभा राहिला नंतर त्यानें गुढगे टेकून तिचा हात आपल्या हातीं घेतला व तो आपल्या भालीं लाविला. इतक्यांत त्याच्या मागून एक स्त्री मंदगतीनें त्यांच्याकडे येतांना दिसली. ती थेट त्यांच्या पुढ्यांत येऊन उभी राहिली. ती धवलवस्त्राच्छादित होती; तिचा मुक्तकेशभार पाठीवर लोळत होता; तिच्या चलनवलनावरून तिची आतुरता व भीति हीं स्पष्ट दिसत होतीं. तिला पुढ्यांत पहातांच तरुण एकदम उडी मारून उभा राहिला. क्रोधातिशयानें त्याच्या नेत्रांतून अग्निकण बाहेर आले. कमरेचा जंबिया त्यानें बाहेर ओढला आणि तो तिच्या हृदयांत खुपसला. आघाताबरोबर तिचीं धवलवस्त्रें रक्तमय झालीं व करुणमुद्रेनें त्याजकडे पहात ती खालीं पडली. तिची मुद्रा पहात्यें, तर ती–मी, आणि तो तरुण–सुधाकर. मीं किंकाळी फोडली. पहात्यें, तर–पुढें कांहीं दिसेना.

* * *

पुन्हा वीज चमकल्यासारखें होऊन मला एक महानगरी दिसूं लागली. गृहें, गोपुरें, प्रासाद, मंदिरें, हीं दृष्टिपुढून जाऊं लागलीं. जातां जातां क्षणांत मी एका राजप्रासादांत आहेसें मला वाटलें. असंख्य प्रजाजन तेथें जमलेले होते. सिंहासनावर एक स्त्री अधिष्ठित असलेली दिसत होती. तिचें मुख अवगुंठित असून उजव्या हातीं तिनें राजदंड धरलेला होता. जरतारी, रेशमी, मखमाली वस्त्रें धारण केलेला दासदासीसमूह सिंहासनाभोंवतीं उभा होता. कानटाळे बसविणारा दुंदुभि करतालध्वनि दशदिशा भरून राहिला होता. त्यांतूनच प्रजाजनांचा जयध्वनि ऐकूं येत होता. सिंहासनाखालीं राज्ञीच्या पायाशीं जयध्वनीचा विषय एक, तरुण–शृंखलाबद्ध असून बेशुद्ध असा पडलेला होता. त्याच्या शेजारीं एक उंच काळाकभिन्न पुरुष, हातीं खड्ग घेऊन, बेशुद्ध तरुणावर आघात करण्याच्या तयारींत उभा होता. हें पहातांच माझें हृदय अनुकंपित होऊन त्या शृंखलाबद्ध बेशुद्ध तरुणास आपण वाचवावेंसें मला वाटलें. धांवत जाऊन त्याला ओढून घ्यावें, मग त्याकरितां आपले प्राण गेले तरी पुरविलें, असें मला होऊन गेलें. पण मला तिथून हलतांच येईना, तिथेंच मी जखडून राहिल्यासारखें मला झालें. इतक्यांत सिंहासनावरील ती अवगुंठित स्त्री, अर्थात् राणी उठून उभी राहिली. हातांतील राजदंड वर करून खड्गाघात करण्याची त्या काळ्याकभिन्न सेवकास तिनें आज्ञा केली. क्षणार्धांत त्या शृंखलाबद्ध तरुणाचें हृदय खड्ग–विदीर्ण होऊन त्यांतून रक्तप्रवाह उसळी घेऊन बाहेर आला. माझ्या दृष्टिपुढें काळोखी आली. पुनः मी पाहूं लागल्यें तों त्या नैष्ठुर्य मूर्तीनें–त्या राणीनें आपलें अवगुंठन मुखावरून दूर केलेलें असून–मीच ती! तसेंच वध झालेला तरुण दुसरा कुणी नसून–सुधाकरच हें दृष्टीस पडतांच मी आरोळी फोडली व मटकन् खालीं बसल्यें. "प्राणाला प्राण", त्या राणीचे शब्द माझ्या कानीं आले; "जशास तसें! सृष्टीचा धर्मच आहे हा! घ्यावें तसें द्यावें करावें तसें भरावें. देवाच्या घरचा न्यायच नाहीं का हा?"

यापुढें पुन्हा काळोख!

* * *

उषःकालची कोमल प्रभा फांकल्यासारखी मला दिसूं लागली. एक विस्तीर्ण नदी आणि तिच्या कांठीं एक रक्तपाषाणमंदिर हीं माझ्या दृष्टिपुढें दिसूं लागलीं. मंदिरासभोंवतीं पुष्प–भारांनीं लवलेली वाटिका असून तिच्यांत कांहीं बालिका व तरुणी हिंडत होत्या. एक तरुणी एकीकडेच एकटी उभी असून, ती दुःखी कष्टीशी दिसत होती, तिच्याकडे या इतर तरुणी सकरुण–तिरस्कार–दृष्टीनें पहात होत्या. आणखीहि कित्येक तरुणी त्या वाटिकेंत आल्या. मंदिरांतून गंभीर संगीतध्वनि ऐकूं येत होतेच. पहातां पहातां ती दुःखी तरुणी तेथून निघून जाऊन वाटिकेंतील तरुराजींत अदृश्य झाली. उषःकाल सरून सूर्यप्रभा क्षितिजावर तळपूं लागली! इतक्यांत मंदिरांतून एक पालखी आणि ......... सहस्र भक्तगण हीं बाहेर येऊन मंदिराला प्रदक्षिणा करूं लागली. वाद्यध्वनींत गीतालापहि ऐकूं

येत होते. एक प्रदक्षिणा संपतांच पालखी मंदिराच्या महाद्वारापुढें उतरली. एक उंच भव्य असा उपासक पुढें येऊन त्यानें आपले हात वर करून सर्वांनां शांत रहाण्याची खूण केली. वाद्यध्वनि व गीतालाप बंद झाले. तो मुख्योपासक नंतर निश्चल उभा राहिला. त्याची मुखप्रभा अधिकाधिक उज्वलित दिसूं लागली व त्याच्या मुखांतून पुढील शब्द बाहेर आले.

" विश्वप्रकाशी सूर्यप्रभेला वंदन असो !"

" सूर्यप्रभेला वंदन असो !"

सर्व उद्गारले, व मस्तकें खालीं करून त्यांनीं उदित सूर्याला प्रणाम केला.

" त्याचप्रमाणें वैश्वदेवा, तुझी छायाहि तुझ्या प्रकाशाचाच अंश आहे; दुःख हें सुखाचाच अंश आहे; मृत्यु हा जीवनाचाच अंश आहे; हें आमच्या सर्वकाळ लक्षांत राहूं दे. " मुख्योपासक पुढें ह्मणालाः " सूर्य-प्रभेला वंदन असो. "

सर्वांनीं " वंदन असो !" ह्मणतांच पुनः वाद्य-ध्वनि व गीतालाप सुरूं होऊन पालखी मंदिरांत गेली. तो मुख्योपासक मात्र तेथून हालला नाहीं. तो तेथें कोणाची तरी वाट पहात, उत्कंठेनें उभा होता, हें स्पष्ट दिसत होतें. तों तरुराजींत इतका वेळ अदृश्य झालेली ती दुःखी तरुणी त्याजकडे येतांना दिसूं लागली. तिच्या नेत्रांतून अश्रुपात होत होता ! मी पहात्यें, तर ती-मीच. तो मुख्योपासक तिला पहातांच पुढें आला, तिचे दोन्ही हात त्यानें आपल्या हातीं घेतले व त्यांचे संभाषण मला स्पष्ट ऐकूं येऊं लागलें.

"तुझ्याकरितां" तो ह्मणालाः "मी सर्वस्वावर पाणी सोडीन. मान, वैभव, कीर्ति हीं सर्व मी तुझ्या पायीं वहातों. तुझ्या प्राप्तीनें मला लाभणारें सुख दुसरं कशानं तरी मिळणार आहे का? तुझ्यांत मला त्रिभुवनाचं राज्य मिळाल्याप्रमाणं वाटणार आहे. तुझ्या प्रेमसुखांत मी सर्वस्वाला मुकलों, तरी मला त्याची क्षिति नाहीं. नाहीं ह्मणूं नको. प्रेम-जागृति जीवितांत एकदांच होत असते, लवकर किंवा उशिरां-एकदांच ती होत असते. तुला ठाऊक नाहीं काय ?"

सप्रेम दृष्टीनें, सकरुणदृष्टीनें तिनें त्याच्याकडे पाहिलें. त्या दृष्टींत कृत्रिमता, गर्व किंवा क्रोध यांचा लेशहि नव्हता.

" असं काय बरं करावं ?" करुण स्वरानें तिनें उत्तर केलें; " मजसारख्या अबलेकरितां आपल्या सर्वस्वाची हानि कां बरं करून घ्यायची ? वैश्वदेवाचे आपण उपासक. आजन्म ब्रह्मचर्याचा आपण अंगिकार केलेला. स्त्रीपाश आपल्याला त्याज्य. आपल्या धर्माचं आपण उल्लंघन केलंत तर त्या पातकाचं परिमार्जन मृत्युवांचून दुसऱ्या कशानं तरी होणार आहे का ? इतर उपासकांनां आपली सध्याच शंका आलेली आहे नाहीं का ? आणि नागरिक माझ्याकडेहि तिरस्कारानें पाहूं लागले आहेत, हें आपल्याला ठाऊक आहे, नाहीं का ? तेव्हां असा आत्मघात कां बरं करून घ्यायचा ? आत्मशक्ति दाखवायला नको का ?"

" आत्मशक्ति ?" " प्रेम करण्यांत आत्मशक्ति नाहीं काय ? प्रेम ही आत्मशक्तीच नाहीं का ? स्त्रीला आपल्यावर प्रेम करायला लावणें, तिच्या-वरल्या आपल्या प्रेमाकरितां आपण सर्वस्वावर पाणी सोडायला सिद्ध होणें यापरतं आत्मशक्तीचं दुसरं कोणतं दर्शक ? अग, जिथं प्रेम आहे तिथं मृत्यु असणं शक्यच नाहीं. जीवनच रहाणार तिथें चिरंतन. प्रेम हेंच माझं जीवन. प्रेम हेंच माझं तारुण्य. प्रेम हेंच माझं पुरुषार्थसाफल्य. प्रेम हाच खरा वैश्वदेव. प्रेम हीच खरी उपासना होय. प्रत्यक्ष वैश्वदेव हा प्रेममय नाहीं का ? प्रेम हाच त्याचा खरा धर्म. त्याच्यापुढें ब्रह्मचर्य धर्माची काय किंमत ! आज तूं माझं ऐकलंच पाहिजेस. आज तूं मला धन्य केलंच पाहिजेस. नाहीं ह्मणून चालायचं नाहीं. समजलीस ? "

एकाएकीं ती स्मित करून त्याकडे पाहूं लागली. तिचें मुख आनंदानें प्रफुल्ल कां बरें झालें ? चिंता हरण करणारी कांहींतरी कल्पना तिला सुचली असावी खास.

" आपल्याला का मी नाहीं म्हणत्यें आहें ! " तिनें उत्तर केलें; " आजपासून माझं सर्वस्व आप-लंच आहे ! "

आनंदातिशयानें त्यानें तिला गाढ आलिंगन दिलें; तिनें आपलें मुख त्याच्या बाहूंत झांकिलें. त्यावेळीं तिचे मुक्तकेश त्याच्या बाहूंवर रुळत असलेले दिसूं लागले. "शेवटीं माझी झालीसना तूं ? " तो म्हणाला "माझ्या जीवनाचं तूं साफल्य केलंस ! आज-रात्रीं येशील-का ?"

"ठीक !" तिनें एकदम उत्तर केलें; " रात्रीं चंद्रोदय होतांच या वाटिकेंत भेटेन मी. ज्याची उपासना करण्याकरितां आजन्म ब्रह्मचर्याचा स्वीकार केला त्या या वैश्वदेवाच्या मंदिरासमोरच आपण स्वीकार करावा माझा !"

दृष्टि वर करून तिनें त्याकडे सप्रेम पाहिलें; त्यानें तिचें सप्रेम चुंबन घेतलें.

" येत्यें मी आतां, " ह्मणून त्याचा तिनें सखोल-सगंभीर स्वरानें निरोप घेतला; व जणूं काय आपली आतां हीच शेवटची भेट, अशा विव्हलमुद्रेनें त्याजकडे पाहून ती तेथून निघून गेली. तोहि तिज-कडे पहात पहात मंदिरांत निघून गेला.

क्षणभर माझ्या दृष्टीपुढील त्या बाष्पपटावर कांहींच चित्र दिसेना. क्षणाभरानें तीच वाटिका धवल चंद्रिकेंत प्रकाशित झाली व तींत एका लताकुंजाबाहेर तीच तरुणी मृतस्थितींत पडलेली दिसूं लागली. तिचे दोन्ही हात वक्षस्थलावर असून, डोळे मिटलेले व मुद्रा सस्मित दिसत होती; तो मुख्योपासक तिच्या शवा-जवळ बसून शोक करीत होता . हा देखावा पहातांच सर्व प्रकार चटकन् माझ्या लक्षांत आला. धर्माकरितां तिनें आत्मयज्ञ केला होता हें उघड होय. तिचें मुख मजसारखें दिसत असून, तो उपासक ह्मणजे प्रत्यक्ष सुधाकरच. पहातां पहातां हा देखावाहि अदृश्य होऊन त्या बाष्पपटावर मला कांहींच दिसेना.

* * *

क्षणभरांत मला एक विशाल नदी दिसूं लागली व तिचें घो–घो–घो ऐकूं येऊं लागलें. नदी दुथडि भरून आरक्त दिसत होती ! तिच्या प्रवाहांत गुरेंढोरें, वृक्ष, लांकडें वहात जात होतीं; एक तरुणीहि त्यांत वहात वहात जीव वांचविण्याकरितां कशाचा तरी आश्रय पहात होती. पैलतीरावर एक उंचकाय तरुण जलौ-घांत उडी मारण्याकरितां धोतर कासित होता. पळांत कास मारून त्यानें उडी घेतली व सपाट्यानें तो त्या तरुणीजवळ आला, डाव्या हातानें त्यानें तिला आपल्या स्कंधावर टाकून उजव्या हातानें तो पोहत पोहत पैलतिरीं गेला व त्या तरुणीस त्यानें खालीं ठेविलें. पहातों तों तिचें प्राणोत्क्रमण झालेलें. त्याची मुद्रा वेड्यासारखी झाली; " कालिमाते !"असें ह्मणून त्यानें ती वर केली. सुधाकरच ते. दाही दिशा शून्य झाल्या-प्रमाणें तो सभोंवार पाहूं लागला. मृत तरुणीचें मुख पहात्यें तर–ती मीच. मी डोळे झांकिले. क्षणभर मला कांहींच दिसेना.

* * *

पुन्हां दृष्टि आल्यासारखें मला झालें व एक शृंगार-लेला दिवाणखाना दिसूं लागला. त्यांत मध्यभागीं मखमाली कोचावर रत्नाभरणांनीं नटलेली एक बालिका बसलेली असून तिच्यापुढें एका साध्या आसनावर एक तरुण तिचें चित्र रेखाटित होता. ती बालिका सौंदर्यसंपन्न तर होतीच; पण त्या तरुण चितान्यास ती प्रति रंभाच वाटत असावीसें त्याच्या मुद्रेवरून स्पष्ट दिसत होतें.

'करितां ह्या हृदयांत जो प्रेमाग्नि पेटला आहे तो तिच्यावांचून दुसऱ्या कशानं तरी शमेल का ?" इतकें ह्मणून, तो थांबला. " तुझा लाभ मला होणं, जवळ जवळ अशक्य, हें जाणूनहि मी तुझ्या प्राप्तीची आकांक्षा करतों, त्याला मी तरी काय करूं ? ब्रम्ह्यानें सृष्टि केली तेव्हांपासूनच तूं माझी, असं मला वाटतं आहे, त्याला मी काय करूं ?"

तिनें कांहींच प्रत्युत्तर केलें नाहीं; तरुणाचें भाषण तिनें ऐकून घेतलें.

" तूं जर मला अंतरलीस, तर माझं सर्वस्व मला अंतरलें. जिच्या प्रभावावर माझा तुझ्याजवळ इतका काळ वास घडला, ती ही चित्रकलाहि मग मला आंचवलीच. तुझ्यावांचून मग ह्या चित्रकलेची, प्रत्यक्ष जगाचीहि मला काय किंमत ? पण मी पडलों क्षुल्लक चितारी आणि तूं ह्या राजस्थानची अर्धांअधिक स्वामिनी. पिताजी तुला मला थोडेच करूं देणार ?"

हातांतली कुंचली खालीं ठेवून तो तिजकडे पहात राहिला.

" तुझं जर माझ्या ठिकाणीं खरंच प्रेम असेल, त्या प्रेमाकरितां संकट भोगायला जर तूं सिद्ध असशील, तरच–पण तें शक्य आहे का ? तुझ्याच्यानं तें होईल का ? "

" माझ्याच्यानें नाहीं होणार तें ?" कमलकुमारीचे हे शब्द तिच्या मुखांतून बाहेर येतात न येतात, तों त्याची मुखश्री उज्वलित होऊन तो म्हणाला.

" नाहीं होणार तुझ्याच्यानं. स्त्रियांनां इतकं साहस होणं अशक्य. शिवाय तुझा त्यांत लाभ तरी कितीसा ? माझाच त्यांत सर्वस्वी लाभ, नाहीं का ? मी स्वार्था-करितां एवढं साहस करायला तुला प्रवृत्त करूं ? पण तुझ्यावांचून तरी मी काय करूं ? कुठं जाऊं ? जिवंत राहून काय करूं ? तूंच माझं जीवन ! तूंच माझी सूर्यप्रभा ! तूंच माझी चंद्रिका ! पण तूं तर आतां दुसऱ्याची-नरसिंह देवाची-पत्नी होणार नाहीं का ? "

ती एकदम उठून उभी राहिली. जवळील विशाल आरशांत तिचें प्रतिबिंब मला दिसलें. ती मी हें मला स्पष्ट कळून आलें. तिच्या नेत्रांत अश्रु चमकूं लागले.

"शिवकरण," ती सद्गदित कंठानें म्हणाली; व एकदम थांबली. शिवकरणाकडे मी पहातांच मला ते सुधाकर दिसूं लागले.

शिवकरण उठून उभा राहिला.

"शिवकरण, मी का बोलून दाखवायला हवं? तुह्माला ठाऊक नाहीं का सगळं? तुमच्याकरितां मी या राजस्थानवरहि पाणी सोडायला सिद्ध नाहीं का?"

हे शब्द तिनें उच्चारिले असतील नसतील, तोंच हातानें पडदा वर करून एक पुरुष व स्त्री पुढें आलीं. पुरुषानें त्वेषानें कमरेचा जंबिया बाहेर काढून शिवकरणाच्या तो छातींत खुपसला. क्षणांत त्याचें प्राणोत्क्रमण झालें. कमलकुमारीनें त्याच्या हृदयांतील तो जंबिया एकदम ओढून घेतला व तो आपल्या हृदयांत खुपसला. माझ्या दृष्टिवर अंधार आला. व पुढें मला कांहींहि दिसेना.

* * *

क्षणाभरानें पुन्हां दिसूं लागलें. एक प्रक्षुब्ध समुद्र आणि त्यांत एक आगबोट हीं मला दिसूं लागलीं. पर्वतप्राय लाटा त्या आगबोटीला एका क्षणीं वर आभाळांत तर दुसऱ्या क्षणीं खालीं पाताळांत नेत होत्या. ती बुडत होती हें स्पष्ट दिसत होतें. तींतले उतारू स्त्री व पुरुष–कठड्याशीं उभे राहून कोणी "देवा!" कोणी "परवरदिगार" करून परमेशाची करुणा भाकीत होते. त्यांत एक जोडपें–तरुण व तरुणी–हातांत हात घालून शांतपणें उभें होतें. त्या तरुणाशीं सुधाकरांचें, व तरुणीशीं माझें साम्य मला इतकें दिसलें कीं जणुं काय आमचें आरशांतलें प्रतिबिंबच मी पाहात्यें आहेसें मला वाटलें. त्यांचा पोशाखहि हल्लींच्या आमच्या पोशाखा सारखाच हुबेहुब होता. भेद इतकाच कीं त्या तरुणाच्या डोकींत पंजाबी साफा किंवा साहेबी टोपी नसून हल्लींच्या महाराष्ट्रिय पद्धतीचा रुमाल बांधलेला होता. प्रगाढ प्रेमदृष्टीनें त्याजकडे पहात ती उभी होती.

"आतां क्षणांत आपण या भवतापांतून मुक्त होऊन शांतिधामीं जाणार! तेव्हां आपल्याला आतां भिण्याचें कारण नाहीं समजलीस?"

"मला का भीति वाटते?" तिनें शांत स्वरानें उत्तर केलें; "आपण जवळ असल्यावर कसली मला भीति?"

त्याचा डावा हात तिच्या मानेभोंवतीं पडला. "मृत्यु ह्मणतात, तो हा बरं लाडके," तो सद्गदित होऊन ह्मणाला.

"मृत्यु कसा हा? जीवनच नाहीं का हें? शांति–जीवनच नाहीं का इतउत्तर?" सजल दृष्टीनें त्याजकडे पहात ती ह्मणाली.

देवा! परवरदिगार! असा एकच कल्होळ झाला. सहस्र पर्वतप्राय लाटा एकवटून आगबोटीवर आदळून त्यांनीं तिला क्षणांत समुद्रतळीं नेली. सुधाकरांच्या हातांत हात घालून मीहि समुद्रतळीं गेलेंसें मला वाटलें व दुसऱ्याच क्षणीं–लख्ख होऊन, मी पहात्यें–तर खरोखरच सुधाकरांच्या हातीं माझा हात असून, मी ब्रह्मारण्यांतल्या त्या पाषाणासनावर बसलेली. सुधाकरांकडे मी पहातांच—

"बघ वेळ कसा भुर्कन गेला तो! संध्याराग वितळून जाऊन चांदण्याहि चमकूं लागल्या आभाळांत" असें ह्मणत ते उठून उभे राहिले. मीहि शिळेवरून खालीं जमिनीवर उभी राहिल्यें व आह्मी दोघे मोटार ठेवलेल्या ठिकाणाकडे जलद पावलें टाकीत यायला निघालों.

## प्रकरण नववें

# विलक्षण संबंध

किती वेळपर्यंत तरी मी सुधाकरांच्या हातांत हात घालून निमूट चालल्यें होत्यें; कांहींहि बोलल्यें नाहीं. तेहि मजजवळ कांहीं बोलले नाहींत. मधून मधून मजकडे सस्मित पहात होते इतकेंच. मी खालीं पहात चालल्यें होत्यें; किती वेळपर्यंत तरी असें चालल्यावर, एकदम मी त्यांच्या हातांतील आपला हात काढून घेतला. मला कसेसेंच वाटायला लागलें. त्याक्षणीं मी खरी भानावर आल्यें ह्मटलें तरी चालेल. हातांतून मी हात काढून घेतांच त्यांनीं मजकडे एकदां पाहिलें मात्र; ते कांहींहि बोलले नाहींत.

मी इतका वेळपर्यंत पहात होत्यें, ते माझे गतजन्मच का? कीं सुधाकरांनीं मजवर ती कांहीं जादू

केली. माझे ते गत जन्म नसतीलच असें तरी मी कसें ह्मणूं? तसेंच ते तसे असतीलच असें तरी कशावरून? ते खरोखरच माझे गतजन्म असले, किंवा तसे नसेल, तरी आज मी एक विधवा नाहीं का? माझ्या आजच्या स्थितीची जाणीव मला ठेवायला हवी, नाहीं का? याप्रमाणें मी आपल्या मनाशीं विचार करीत चालत होत्यें.

"तूं आतां जे कांहीं पाहिलंस, त्याबद्दल तुला आश्चर्य वाटण्याचेंहि कारण नाहीं; किंवा लाज वाटण्याचेंहि कारण नाहीं." माझ्या मनांत चाललेले विचार जणुं काय कळूनच सुधाकर मला ह्मणाले; "तुझ्या गूढ स्मृतींतलीं चित्रेंच मी तुला आज दाखविलीं आहेत. त्यांत आश्चर्य करण्यासारखें तें काय आहे? आपल्या दोघांच्या पूर्वऋणानुबंधनांतहि तुला किंवा मला–कुणालाच–लाज वाटण्यासारखं–काय वरं आहे? तसंच आपली जी ही या महाबळेश्वरीं अशी अचानक भेट झाली, त्याचंहि नवल वाटण्याचं कारण नाहीं आतां; नाहीं का? आतां, आपला पूर्वऋणानुबंध इतःपर पुढें ठेवणं, किंवा तोडणं, हें आपल्या दोघांच्याहि मर्जीचं आहे, ही गोष्ट निराळी."

मी कांहीं उत्तर केलें नाहीं.

"विधियोजना काय असेल ती खरी." ते पुढें ह्मणाले; "तूं आणि मी गेले कित्येक जन्म परस्परांचे होतों, इतकं आपल्या दोघांच्याहि लक्षांत असलं ह्मणजे झालं. पुढें आपलं अद्वैत घडून यायचं असलं, तर त्याला आपण साहाय्य करायचं, विरोध करायचा नाहीं; इतकंच आपलं सध्या कर्तव्य आहे."

मी दृष्टि वर उचलून त्यांच्याकडे पाहिलें. त्यांनीं माझा हात पुनः आपल्या हातीं घेतला मीहि तो त्यांनां घेऊं दिला.

"पण–पण–समाज, रूढि, हीं का झुगारून देतां येण्याजोगीं आहेत?" मी अडखळत प्रश्न केला.

"खऱ्या संबंधाच्या आड येतील तर समाज, रूढि आणि अवघं जगहि झुगारून द्यायला नकोत का? आपला पूर्व संबंधच आपल्याला तेवढं सामर्थ्य दिल्यावांचून रहाणार नाहीं, समजलीस?"

मोटारीजवळ आह्मी येऊन पोंचलों. त्यांनीं मोटार नीट सडकेवर घेतांच, मला चढण्यास सांगितलें. मी चढतांच मोटार चालूं लागली.

त्यांच्याजवळ मनमोकळें करून बोलावेंसें मला वाटूं लागलें. पण माझी जिव्हा शब्दोच्चारच करीना. बहुतेक मूकस्थितींतच आह्मी अप्पासाहेबांच्या बंगल्यापुढें आलों; मोटार थांबवून मला त्यांनीं हातीं धरून खालीं उतरविली, व "आतां उद्यां भेट" ह्मणून त्यांनीं मोटार पुनः चालू केली.

माझी मनःशांति त्यांच्या बरोबरच गेलीशी मला वाटली. दूर देशांतून व कालांतून प्रवास करून आल्यासारखें,–थकल्याभागल्या सारखें माझ्या जीवाला झालें. या दूरवरच्या देशांतून व कालांतून मजबरोबर प्रवास करणारे सुधाकर मोटारीसह दृष्टिआड होतांच, मला एकटें एकटें झालें तर त्यांत आश्चर्य कसलें? माझे डोळे पाण्यानें भरून येऊन मी तशीच मोटार गेलेल्या रस्त्याकडे पहात राहिल्यें.

"काय ग!" बंगल्याच्या दरवाजांतून श्रीमंतांनीं प्रश्न केला.

मी चपापून डोळे पुसून सस्मित त्यांच्या जवळ गेल्यें.

"ब्रह्मारण्य पाहिलंस ना? वाघबिघ नाहींना दिसला एकादा? रात्र व्हायला आली, तुमचा पत्ता नाहीं; म्हणून काळजी करीत वाट पहात होतों तुमची."

"सूर्यास्ताची शोभा पहाण्यांत रमलों आम्ही तिथं थोडा वेळ." मी उत्तर केलें;

"पण उषेला ताप नाहींना आला संध्याकाळीं?"

"नाहीं, बरं वाटतं आहे तिला आतां. चला, जेवायचं तयार आहे केव्हांच, भूकहि लागली असेल तुला," म्हणून ते आंत गेले.

थोड्याच वेळांत जेवणाचीं पानें वाढलीं. मी, उषा, श्रीमंत व डॉ. भास्करराव यांचीं कालच्या प्रमाणेंच पानें वाढलेलीं होतीं.

"काय तरी त्या गोळ्यांचा चमत्कार" श्रीमंत उद्गारले; "या वेळपर्यंत कळ नाहीं आली कशी ती."

"ह्मणजे" भास्कररावांनीं साश्चर्य विचारिलें; "कुणी गोळ्या दिल्या श्रीमंत?"

"अहो सकाळीं सुधाकरांनीं दोन गोळ्या खायला दिल्या विड्यांत; तेव्हांपासून कळ नाहीं, आणि कांहीं नाहीं. कसं साफ वाटतं आहे अगदीं. माझा रोग दुस्साध्य नाहीं, असं ते तर ह्मणताहेत खात्रीनं."

डॉ. भास्कररावचा भाताचा घास हातांतल्या हातांत राहिला.

" अशीं भलत्यासलत्यांचीं औषधं नाहीं घेतां कामा श्रीमंतानीं," घुटमळत ते श्रीमंतांनां ह्मणाले.

" खरंच आप्पा." उषेनें पुष्टि दिली.

" अग पण सुधाकर का भलतेसलते आहेत मला ?" श्रीमंतांनीं उत्तर केलें; " माझे ते सहाध्यायी ना ? कॉलेजांत आमचे कितीतरी दिवस एकेठिकाणीं गेलेले आहेत, नाहीं का ?"

" पण ते सुधाकर हे ह्मणून कशावरून श्रीमंत ?" डॉ. भास्करावनीं पुनः ह्मटलें.

" तेच हो हे." श्रीमंतानीं थोडें चिडून उत्तर केलें; " सुधाकरासारखा दुसरा माणूस जगांत नाहीं मिळायचा समजलांत ?"

" पण आपल्यालाहि ते हे नसतील, ह्मणून शंका आली होती, नाहींका ?" आपल्या जाड भिंवया वर चढवून डॅाक्टर विचारतात.

" पण तिचं निरसन झाल्याचंहि तुह्माला सांगितलं ना काल ? शंका मला कुणाची नाहीं येत ? तुमच्या सद्धेतुबद्दलहि शंका येते मला कित्येकदां, समजलांत ?" श्रीमंतांनीं अति गंभीरपणानें उत्तर केलं.

डॉ. भास्करराव एकदम काळेठिक्कर पडल्यासारखे झाले.

" पण–पण–आपल्याला तशी शंका यायला कारण नाहीं दिसत मला." बळेंच हसूं आणून क्षणभरानें ते ह्मणाले.

श्रीमंतांनीं त्यांनां कांहींच उत्तर केलें नाहीं "ब्रह्मारण्याची कशी मजा आहे पाहिलीस ना ?" मजकडे पाहून श्रीमंतांनीं मला विचारिलें.

" खरोखर " मी उत्तर केलें, "फारच गेला मजेंत वेळ तिथं."

" सुधाकर होते बरोबर. मग कां नसेल मजेंत गेला वेळ." उषा कपाळाला आठ्या घालून ह्मणाली.

मला तिचें हसूं आलें. माझ्या मनांत या वेळीं चाललेल्या विचारांपुढें तिच्या टीकेची मला किंमत ती कितीशी ? मी तिला कांहींच उत्तर केलें नाहीं.

सुधाकरांनीं दाखवलेले गतजन्म माझ्या दृष्टीपुढून जात होते. त्यांतील विविध प्रसंगांचा अर्थ सूक्ष्म दृष्टीनें माझा मला कळून चुकला होता खरा. पण जड दृष्टीला तो न पटण्यासारखाच होता. माझ्या आत्मदृष्टीला कळून चुकलें होतें कीं सुधाकरांचा आणि माझा गेल्या कित्येक शतकांचा परिचय, माझ्या जड स्मृतिला त्याची जाणीव नव्हती, इतकेंच. जे प्रसंग मी पाहिले, ते असंख्य गोष्टींतील कांहीं ठळक–निवडक प्रसंगच होते. जड दृष्टीनें त्या प्रसंगदर्शनाचा अर्थ केला, तर मी वृत्तीनें विकारप्रधान असल्यामुळें सुधाकरासारख्या प्रबल इच्छेच्या माणसाची शक्ति मजवर चालून त्यांनां करमणुकीकरितां किंवा कांहीं गूढ हेतूकरितां ते विविध प्रसंग मला इतक्या सहज दाखवितां आले, असंच ह्मणावें लागेल. पण तो गूढ हेतु तरी काय बरें असेल ? एक मन सांगे, तसा दुसरा तिसरा कांहीं गूढ हेतु नसून केवळ माझे खरे खरे गतजन्मच त्यांनीं मला दाखविले; दुसरें मन सांगे तसें नाहीं. दक्ष रहा. अशी आपली फसवणूक करून घेऊं नको.

अशा प्रकारच्या गोंधळलेल्या मनःस्थितींत असल्यामुळें मी कांहींच बोलत नव्हत्यें. मुकट जेवत होत्यें. मधून मधून श्रीमंत एखादा प्रश्न विचारीत तेवढ्याचेंच उत्तर देत होत्यें.

" तुझी कळी बरीच उफललेली दिसते बरं का आज." उषेनें पुनः मला चिडविण्याकरितां ह्मटलें.

" कशी ग ती ? " मी हसून तिला विचारिलें.

" उषा खरं ह्मणते, गीते ! " श्रीमंत मजकडे पाहून ह्मणाले; " तुझी मुद्रा आज कांहीं निराळीच दिसते आहे पहा."

मला लाजल्यासारखें झालें. पण मी तें न दिसण्याचा प्रयत्न केला.

" बरं मग सुधाकराविषयीं कसं काय मत झालं आहे तुझं गीते ह्या थोड्याशा परिचयानें ? " श्रीमंतांनीं प्रश्न केला. " आतां ब्रह्मारण्य पहायला तूं त्यांच्या बरोबर गेली होतीस; त्या दोन अडीच तासांत तुला बरीच कल्पना आली असेल त्यांची, नाहीं ? "

" फार थोर आहेत ते," मी एकदम उत्तर केलें; "त्यांच्यासारखीं उच्च विचाराआचाराचीं माणसं अगदीं दुर्मिळसं वाटतं मला."

" कल्पना आहे सगळी ही. मी सुधाकरांची बरोबर परीक्षा केली आहे व उच्च आचाराविचाराचं ढोंग आहे सगळं त्याचं." डॉ. भास्करराव मध्येंच तोंड घालून म्हणाले.

" तुमचीच कल्पना आहे डॅाक्टर ही सगळी," श्रीमंतानीं एकदम उत्तर केलें " सुधाकरांनां ढोंगी

ह्मणायचं, मग तुह्मालाच कां नये ह्मणूं तसं हो ? उच्च आचारविचार कळण्याची ज्यांची पात्रता नसते, त्यांनां मत्सरानं तीं ढोंगंशीं वाटायचीच. आश्चर्य नाहीं वाटत तुमच्या उद्गारांचं मला."

असें म्हणून श्रीमंत कांहींसे तिरस्कारानें हांसले. मात्र भास्करराव ओशाळल्यासारखे होऊन मुकट जेऊं लागले.

जेवण आटपेतोंपर्यंत यावर कुणीच कांहीं बोललें नाहीं.

जेवण आटपतांच " तुझ्याशीं बोलायचं आहे ग मला थोडं. " असं श्रीमंतांनीं मला ह्मटल्यावरून मी त्यांच्याबरोबर त्यांच्या खास दिवाणखान्यांत गेल्यें.

कालच्याप्रमाणें आजहि सुधाकरांचें विद्युन्मंदिर प्रकाशित झालेलें आहे कीं, नाहीं तें पहाण्याकरितां श्रीमंतांनीं व मी–दोघांनींहि जणुं काय आह्माला न कळत–खिडकीबाहेर दृष्टी केली. पहातों तों आज त्यांत कांहीं साधे दिवे दिसत होते इतकेंच ! विद्युद्दीपावली कांहीं दिसत नव्हती.

" किती थोर पुरुष आहे सुधाकर, पाहिलंस ना ?" श्रीमंत विडा तोंडांत घालीत मला विचारतात.

" असं वाटतं खरं मला," मी घुटमळत उत्तर केलें. पण कसं सांगतां येईल तसं खात्रीनं ? माझा नि त्यांचा परिचय तो कितीसा ? कालपासूनचाच ना?

माझे हे शब्द तोंडांतून निघतात न निघतात, तोंच माझा मला पश्चात्ताप वाटूं लागला. त्यांचा आणि माझा गेल्या कित्येक जन्मांचा परिचय नाहीं का ? मग माझ्याच्यानें असें खोटें बोलवलें तरी कसें?

" खरं ह्मणतेस," श्रीमंत आरामखुर्चीवर पडत ह्मणाले, " तुझा आणि त्यांचा परिचय अगदीं कालचा हें खरं. पण, त्या थोड्याच परिचयांत तूं केलेली परीक्षा अगदीं खरी आहे. निदान ते सहवासाला गोड आहेत; नाहीं वाटत तुला असं ?"

" फार गोड. " मी उत्तर केलें; " फार गोड वाटतो त्यांचा सहवास."

नुसता गोडच का ? त्यांचा सहवास केवळ प्रेममयसा मला वाटत असतांहि मला तसं सांगतां येईना."

" तुझं आणि माझं एकमत झालं सुधाकराविषयीं, ही आनंदाची गोष्ट आहे मोठी. डॉक्टरांनां कांहीं त्यांची परीक्षा नाहीं झालेली. झाली असली, तर निदान मत्सरानं तरी बोलतात ते त्यांच्याविषयीं असं, खास."

मी कांहींच बोलल्यें नाहीं.

" सुधाकर हे असामान्य पुरुष, त्यांची परीक्षा भास्कररावांसारख्यांनां कशी होणार ? झाली तरी त्यांनां त्यांचा मत्सर हा वाटणारच. निदान ढोंगी तरी खास नाहींत सुधाकर. आतां, त्यांची विवाहविषयक मतं, तशीच पूर्वजन्मासंबंधाचीं मतं, हीं कांहींशीं चमत्कारिक आहेत, तें निराळं. पण तीं ते स्पष्ट बोलून दाखविणारे आहेत; मग तीं कुणाला रुचोत, वा न रुचोत; क्षिति नाहीं त्यांनां त्याची. यावरून ते भोंदु–ढोंगी वगैरे कोटींतले खास नाहींत, हें स्पष्ट नाहीं होत ?"

" काय आहेत त्यांचीं लग्नाविषयीं मतं ?" मला नकळत मी प्रश्न केला. " रूढ मताहून निराळीं कांहीं आहेत वाटतं. "

" रूढ मताहून कितीतरी निराळीं." श्रीमंतांनीं उत्तर दिलें. " रूढ मतें आणि सुधाकर यांच्यांत भेद पूर्वपश्चिमेचा. शेंकडा नव्याण्णव लग्नें ते ह्मणतात लग्नेंच नाहींत खरीं. पूर्वीं अनेक जन्म जीं परस्परांचीं पति-पत्नी असतील, त्यांचीं इहजन्मीं लग्नें हींच खरीं लग्नें असं त्यांचं ह्मणणं."

माझें लक्ष सुधाकरांच्या विद्युन्मन्दिराकडे गेलें, त्यावर अद्यापहि विद्युद्दीप पाजळले नव्हते.

" पण आपला इहजन्म हा जन्मपरंपरेंतलाच एक जन्म; आपले अनेक जन्म झाले, अनेक जन्म होतील हेंच मुळीं खरं नाहीं वाटत मला. श्रद्धाच नाहीं बसत या गोष्टीवर आमची, त्याला कसं करणार ?" श्रीमंत पुढें ह्मणाले; " श्रद्धा असती, तर ही कल्पना मोठी गोड होती, सुखाची वाटते ती. खरोखरच सुख वाटतं मला तिच्यांत, यांत कांहीं शंका नाहीं. आतां, माझी प्रकृति त्यांच्यासारखी नाहीं; त्याला इलाज नाहीं. पण तीहि सुधाकरांच्या ह्मणण्याप्रमाणें माझी मीच करून घेतली आहे अशी. कॉलेजांत आम्ही होतों, तेव्हांच ते ह्मणत 'वृद्ध होणं हाहि आपलाच दोष आहे' ह्मणून तेव्हां आह्मी हसूं त्यांनां या कल्पनेबद्दल. पण त्यांची कल्पना ही कल्पना नसून अगदीं खरी गोष्ट आहे, हें त्यांनीं आपल्याच उदाहरणावरून दाखविलं कीं नाहीं पहा. आपण स्वतः किंवा आपले जवळपासचे आप्त-संबंधीं मित्र हींच आपल्याला वृद्ध करतात, असं ते

तेव्हां ह्मणत. "तुमच्या वयाच्या मानानं किती चांगली आहे तुमची प्रकृति हो," तसंच 'वीस वर्षें होऊन गेलीं तुझ्या वयाला, तरी तूं आपला तसाच.' अशा प्रकारच्या वयाच्या आठवणीनें आपल्याला बळेंच वार्धक्य येऊन, आला—जवळ आला आपला अंतकाळ, अशी आपली भावना होते. तीच मुळीं वाईट." सुधाकरांकडे पाहिलं ह्मणजे आज किती खरीं वाटतात त्यांचीं हीं विधानें! बरं, झोंप येत असेल तुला आतां. जा झोंप, सुधाकरांची परवां मी तुजजवळ गोष्ट काढायला आणि त्यांची माझी ही अचानक ओळख व्हायला एकच गांठ पडली म्हणायची. असो. जा, झोंप आतां."

मी तडक आपल्या खोलींत जाऊन दाराला कडी लावून स्वस्थ पडल्यें. माझ्या मनांत या वेळीं जे विचार येऊं लागले, त्यांच्यापुढें सर्व ऐहिक गोष्टी क्षुद्रशा वाटल्या तर त्यांत नवल काय? दिक्कालातीत गोष्टींविषयींच ते विचार असल्यानें माझी तेव्हां एक प्रकारची समाधीच लागली होती, असें ह्मटलें तरी चालेल. ते विचार जर मी येथें सांगितलें, तर ते ऐकून, तसेच संध्याकाळीं मी ब्रह्मारण्यांत पाहिलेले माझे गतजन्म-माझे खरेच गतजन्म होत असें माझ्या मनानें घेतलेलें पाहून, कोणीहि मला हंसेल, व या वेड्या कल्पना होत, असें ह्मणेल—कोणीहि म्हणजे जे फक्त ऐहिकापुरतेंच पहाणारे आहेत; किंवा ऐहिका पलीकडे पहात असले, तरी ते देवपूजेच्या वेळेस अथवा दुःखांत असतील तेव्हांच. माझ्या विचारांशीं आणि श्रद्धेशीं ज्यांची सहानुभूति असेल ते नव्हत, हें मी सांगावयास नकोच.

विचारमग्न स्थितींतच मला झोंप लागली. केव्हां लागली तेंहि मला कळलें नाहीं. सकाळीं जागी झाल्यें तेव्हां कळलें, मी तशीच पडल्यें असतां मला झोंप लागली होती म्हणून.

उठून स्नानादि आटपून वाचायला बसत होत्यें, तों उषा आंत आली.

"काय बाई हें महाबळेश्वर!" जांभई देत व एका आरामखुर्चीवर अंग टाकीत ती ह्मणाली.

"अगदीं वीट आला आतां मला ह्याचा."

"कां ग तो?" मी साश्चर्य विचारिलें.

"अग करमतच नाहीं इथं कसं तें. पुण्यासहि असंच होई अलीकडे. ह्मटलं इथं तरी वाटेल बरं. पहात्यें तर इथंहि तसंच. पण अप्पा काय ऐकायचे आहेत माझं. ह्मटलं चला परत पुण्याला, तर ते मुद्दाम इथंच रहातील महिनेच्या महिने. निदान ते सुधाकर आणि त्यांचा तो तंबू—हीं तरी दृष्टीपुढं नसावीतशीं वाटतात मला गीते."

"ह्मणजे, तें ग कां?" मी हांसत तिला विचारिलें.

"बाई कां तें कसं सांगतां येईल? नको इतकं खरं."

मला भारीच हंसू आलें. सुधाकरासारख्यांच्या उच्च सहवासाची तिला कशी किंमत कळणार? हें मला पुरतें दिसत असल्यामुळें तिच्या बोलण्याचा मला राग न येतां हंसूंच आलं!

"हंसायला काय झालं तुला?" तिनें गंभीरपणानें विचारिलें. "तूं आज अगदीं एकाद्या परदेशणी सारखी कायग दिसते आहेस ही?"

"ती कशी?"

"कशी तें काय सांगूं तुला? पण दिसते आहेस, इतकं खरं."

मी कांहींच बोलल्यें नाहीं. मला तिचें हसूं आलें मात्र बरेंच.

"परदेशणीं बघ तुझ्याप्रमाणंच मजेंत असतात मोठ्या. इकडं जगाचं कांहीं का होईना, त्या आपल्या आनंदांत. तशीच तूं असतेस आपली. नि ते सुधाकरहि पहा अगदीं तसेच वाटतात, परदेशी—रजपूत—यांच्यासारखे मला. बाई भीतिच वाटते मला त्यांची!"

"कां ग ती?" मी गंभीरपणें विचारिलें; "भीति वाटायला काय झालं तुला त्यांची?"

"काय झालं, नि काय न झालं, तें कुणी सांगावं? पण त्यांचीं तीं मतं—नि विचार—नि सगळं कांहीं भयंकर वाटतं मला बघ. ह्मणे मृत्यु असा नाहींच. तसंच ह्मणे आपल्या आजारीपणाचं—दुःखाचं—सगळयाचं कारण आपणच. मग, आप्पा देवबिव नाहीं ह्मणतात, तें काय वाईट? ते एक नास्तिक, तर सुधाकर नि तूं सात नास्तिक, नाहीं? डॉक्टरहि असंच ह्मणत होते काल माझ्याशीं."

"कोण, डॉ. भास्करराव ह्मणतात आह्मी नास्तिक ह्मणून?" मी कांहींसें रागानें तिला विचारिलें. "पण डॉक्टरांच्या मताची किंमत ती कितीशी ह्मणा—"

"बघ, रागावूं नको माझ्यावर गीते. रात्रीं मी स्वप्नांत भ्यायल्यें, तशी भीति वाटते मला तुझ्या रागाची. सांगत्यें तुला माझं स्वप्न!"

मी ' सांग ' ' नको ' कांहींच बोलल्यें नाहीं.

" वाटलं कीं, एका राजविलासी दिवाणखान्यांत मी उभी आहें, नि दोघांचीं प्रेतं पडलेलीं आहेत, तीं पहात्यें आहें. दोघांतली एक स्त्री होती नि दुसरा पुरुष होता. त्या दोघांच्याहि पोटांत जंबिया खुपसून तीं मेलेलीं होतीं. त्यांतला पुरुष बघ अगदीं हुबेहूब सुधाकरांसारखा दिसत होता. प्रेतांच्या जवळ रंग, कलमें वगैरे चित्र काढण्याचीं सामुग्री असून एक अपुरं चित्रहि तिथें भिंतीला उभं केलेलं होतं. डॉ. भास्कररावहि माझ्या शेजारीं उभे राहून तीं प्रेतं पहात होते. पण चौघांचाहि पेहराव असा आजच्यासारखा नसून थेट परदेशी–रजपूत तऱ्हेचा होता अगदीं. " आपण प्राण घेतले त्यांचे " मी डॉक्टरनां ह्मणाल्यें. " ठीक झालं दुष्टांचं." डॉक्टरांनीं उत्तर केलं !–काय ग भयंकर तरी स्वप्न. जसं कांहीं खरंच वाटलं मला तें. जागी झाल्यें नि तेव्हांपासून सुधाकरांची नि तुझी आठवण झाली, कीं, अंगांत कापरं भरतं पहा माझ्या कसं तें. "

मी अगदीं स्तंभित झाल्यें. ब्रह्मारण्यांत पाहिलेल्या गतजन्मांतील एका प्रसंगाची आठवण होऊन मला क्षणभर कांहींच बोलवेना.

" नि ह्मणून गीते, हें महाबळेश्वर नकोसं झालं आहे मला आतां. बघ, भीतिच वाटते मला आतां इथं."

" मग जावं आपलं पुण्यास परत. " मी उत्तर केलें; " मीहि जात्यें आपली परत. चार दिवस घेतला तुझा पाहुणचार, पुष्कळ झाला तेवढा. हो, माझ्यामुळंच झालं आहे किनई तुला कसंसच ? मी गेल्यावर वाटेल तुला बरं."

" कुणी सांगावं ग," ह्मणून ती माझ्याकडे पाहूं लागली. " बघ, तूं अगदीं त्या स्वप्नांतल्या बाईसारखी दिसतेस. तुझी मला पहिल्यासूनच बघ–" ती घुटमळली.

" बोलना पुढें. अपुरं नको ठेवूं काय ह्मणायचं आहे तुला तें. " मी शांतपणें ह्मटलें.

" अगदीं प्रथम तुला मी पाहिली तेव्हांपासून बघ, तुझी भीति वाटते आहे मला. तुला आठवण आहे, यमुनाबाईनीं तुझी माझी ओळख करून दिली मधल्या सुटींत त्याची ? तेव्हांपासूनच तुझा मला एक प्रकारचा ओढा वाटायला लागला. नि भीतिहि वाटते आहे बघ तेव्हांपासूनच तुझी मला. "

ह्यावर मी कांहींच बोलल्यें नाहीं.

" परवा प्रथम सुधाकर इथं आले, तेव्हांहि मला असंच वाटलं, त्यांनां पहातांच. भीतिच वाटायला लागली तेव्हांपासून त्यांची मला. त्या रात्रीं मला ताप भरला, तोहि त्यांच्या भीतीनंस मला वाटतं. काल सकाळीं त्यांचा तो तंबू पहायला आल्यें नाहीं, तेंहि त्या भीतीनंच. त्यांची आठवण झाली, कीं बघ जीवांत धडकी भरल्यासारखं होतं मला. केव्हां एकदां जाईन ह्या महाबळेश्वराहूनसं झालं आहे मला. त्यामुळं तुझीहि पहा तशीच भीति वाटते गीते मला ! कां ग अशी वाटावी ती ?"

" उषे " मी सौम्यपणानें तिला म्हणाल्यें. " या वेड्या कल्पना आहेत तुझ्या सगळ्या. अग, सुधाकरांची, तशीच माझीहि भीति कां वाटावी तुला ? तूं आमचं काय घोडं मारलं आहेस, तें असं भ्यावंस आम्हाला ? सांग बरं तूंच."

" तें खरं ग, पण वाटतं एवढं खरं. " आठवल्यासारखें करून उषा पुढें म्हणाली, " आतां तुला मी ' परदेशीण ' म्हणून म्हटलं, तें किनई गीते, तुझ्या सारखीच एक रजपूत बाई मी कुठं तरी पाहिल्यासारखी मला वाटते, तिची आठवण होऊन म्हटलं समजलीस ? पण ती कुठं पाहिली, केव्हां पाहिली, कांहीं आठवत नाहीं मला. बघ, तिची माझी चांगली ओळख होती, असंहि वाटतं मला. नि तिची मला तुझ्या सारखीच भीतिहि वाटते फार, असं दिखिल वाटतं आपलं मला. परवां ते सुधाकर दिसले, तेव्हांपासून हें असं भेदरं भरल्या सारखं झालं आहे मला अगदीं. डॉक्टरांनाहि मी सांगितलं तेव्हांच तसं."

" मग डॉक्टर काय ह्मणाले तुला त्यावर ?" मी विचारिलें.

" डॉक्टर ह्मणाले, त्या सुधाकरांनींच कांहीं तरी केला असेल तुझ्यावर प्रयोग. मोहिनी विद्या वगैरे ठकवेगिरीचे प्रकार आहेतना, ते सगळे येतात ह्मणे त्यांनां."

मी एकदम उठून उभी राहिल्यें. "ठकवेगिरी करतात काय सुधाकर ?" मी जोरानें तिला विचारिलें; " डॉ. भास्करराव तुला सांगतात असं ?–चल माझ्या तोंडावर बोलूं दे त्यांनां असं. ह्मणजे सांगत्यें मी, ठकवेगिरी कुणी मांडली आहे खरीखुरी." माझे डोळे रागानें लाल झाले.

" बघ–रागावूं नको माझ्यावर अशी." ती करुण-स्वरानें ह्मणाली; " आह्मी का तुला खरीखुरी मारली, ती अशी डोळे फाडतेस माझ्यावर. स्वप्नांत मारली नाहीं का ग ?"

क्षणभर दोघीहि निःशब्द झालों. खोलींत एकदम काळोखी आल्यासारखें झालें.

"काय वेड्यासारखं बोलल्यें मी ग," उषा बळेंच हंसें आणून ह्मणाली." माझी प्रकृति बघ ताळयावर नाहीं कशी ती. नि ह्मणून सुधाकरांकडे आज जेवणालाहि जाऊं नको, ह्मणून डॉक्टर सांगताहेत मला. अग हो. पण तुला सांगायचं राहिलंच. सुधाकरांची चिठ्ठी आली आहे ही आत्तां आप्पांनां कीं तुला मला सगळयांनां घेऊन आज मेजवानीला यावं आमच्याकडे ह्मणून. आप्पांनीं मलाच सांगितलं होतं तुला कळवायला हें. नि ह्मणून तुझ्याकडे आल्यें ही आत्तां. पण बघ आंत आल्यें नि विसरूनच गेल्यें तें."

" मग तूं आज जाणार कीं नाहीं जेवणाला ?" मी विचारिलें. " तूं नसलीस जाणार, तर मी तरी कशाला जाऊं एकटीच.पुरुष मंडळीच जातील आपली."

" काय, तूं नाहीं जाणार मी नाहीं गेल्यें तर ?" तिनें साश्चर्य विचारिलें; " मला एक सुधाकरांची भीति वाटते नि त्याचा प्रकृतिवर वाईट परिणाम होतो माझ्या. पण तुझं तर तसं नाहींना ? तुला तर ते अगदीं हवेसे वाटतात ना ? मग कां नाहीं जायचीस तूं त्यांच्याकडे ?"

" हो, त्यांचा सहवास नकोसा कुणाला वाटेल !" मी अडखळत उत्तर केलें; " पण–"

" पण काय ? त्यांनांहि तूं नकोस, असं नाहीं दिसत मला तर. मग जायला कसली हरकत. मला तर वाटतं, कां वाटतं तें नाहीं सांगतां येत मला, पण वाटतं खरं तसं; कीं तुझ्यामुळंच सुधाकरांची नि आमची भेट झाली ही अशी अकल्पित रीतीनं महाबळेश्वरास."

" अग पण माझी नि त्यांची का ओळख तरी होती आधींची. ते माझ्याकरितां आले तुमच्या भेटीला ? तुझ्या आप्पाकडूनच मला त्यांची माहिती झाली ना परवां, ते इथं आले त्या दिवशीं ? "

" ह्मटलं, मला जसं वाटतं कीं त्यांची नि माझी पूर्वी कुठं तरी ओळख होती ह्मणून, तसंच तूंहि ह्मणत्येस कीं काय" ती ह्मणाली; " बरं, मग मीहि जाईन जेवणाला, ह्मणजे तर झालं. हो माझ्याकरितां तूं त्यांच्या गोड सहवासाला नको मुकायला. सांगत्यें मी जाऊन डॉक्टरनां मीहि येणार सुधाकरांच्याकडे ह्मणून."

असें ह्मणून उषा निघून गेली. ब्रह्मारण्यांत पाहिलेल्या माझ्या गतजन्माशीं तिचा आणि डॉ. भास्कररावांचा असा विलक्षण संबंध आलेला पाहून, मला काय झालं आणि काय नाहीं, तें सांगतां येणें शक्य नाहीं. आतां महाबळेश्वरचा निरोप घेण्यावांचून मला गत्यंतरच दिसेना. आज सुधाकरांच्याकडे जेवायला गेल्यावर त्यांनांच ' काय करावें ' तें विचारण्याचा बेत केला. मला त्यांचा सहवास जितका गोडसा वाटत होता, तितकाच त्यांनांहि माझा सहवास वाटत होता, याचा सानंद अभिमान मला वाटत होता, हें मी नाकबूल कशाला करूं ?

बरोबर साडेदहाला आह्मी सर्व सुधाकरांकडे जायला निघालों. माझ्या डोक्यांतलें तें आकाशफुल कोमेजून गेलेलं पाहून मला वाईट वाटलें. पण त्यानें आपलें कार्य केलें होतें, नाहीं का? त्याचा संदेश मला कळला होता, नाहीं का ? सुधाकरांनीं स्वतः खुडून कलशांत ठेविलेल्या फुलांतली निशिगंधाचीं चार फुलें मी केसांत खोंवलीं होतीं, तीं मात्र आजहि जशीच्या तशीं होतीं. तींच मी आज डोक्यांत घातलीं. मी दिवाणखान्यांत येतांच श्रीमंत मजकडे कौतुकपूर्ण दृष्टीनें पाहूं लागले.

" बरीच लहान दिसायला लागलीस ग तूं ह्या चार दिवसांत. " ते ह्मणाले, " इथं येऊन तुला चार दिवस दिखील झाले नाहींत, पण प्रकृतींत विलक्षण फरक पडलेला दिसतो तुझ्या. ह्या इथल्या हवेचा हा परिणाम, कीं सुधाकरांच्या ओळखीचा ?"

मला एकदम लाजल्यासारखें झालें. " त्यांच्या ओळखीनें प्रकृति कशी सुधरावी ? " मी विचारिलें.

" कां बरं ? ते स्वतः आहेत त्याहून लहान दिसतात. त्याप्रमाणें तुझ्यावरहि त्यांचा परिणाम झाला नसेल ह्मणून कशावरून ? सुधाकर काय करूं शकतील आणि काय नाहीं, कुणी सांगावें."

इतक्यांत उषा, भास्करराव, रामभाऊ हीं सुधाकरांकडे जायला सज्ज होऊन तेथें आलीं. त्याबरोबर "चलाच आतां, " करून श्रीमंत उठले, आणि आह्मी सर्व गाड्यांत बसून सुधाकरांकडे गेलों.

तंबूबाहेर तात्पुरत्या उभारलेल्या कमानीखालीं सुधाकर आमच्या स्वागताला उभे होतेच. ते पुढें

येऊन आह्माला तंबूंत नेऊं लागले. कमानीखालीं येतांच त्यांनीं बाजूची एक दोरी ओढली; त्या बरोबर गुलाब, शेवति, निशिगंध, सुरंगी वगैरेची सहस्र फुलें एकदम डोकीवर पडलीं. विशेष हें कीं, मीच प्रथम कमानी खालीं आल्यामुळें मजवरच ती सर्व पुष्पवृष्टि झाली. तरी ती सर्वांकरितां होती हें सांगावयास नकोच. आह्मी दिवाणखान्यांत येतांच सुधाकर उषेला तंबू दाखवावयास घेऊन गेले. मी त्यांच्याकडे पहातांच, त्यांनीं वळून स्मित केलें; व "कालची खोली ठाऊक आहेच, तिथंच जाऊन बसायचं" असं मला ते म्हणाले.

श्रीमंत, डॉक्टर व रामभाऊ दिवाणखान्यांत बसले व मी कालच्या त्या राजकन्येच्या महालांत गेल्यें. गेल्या दोन दिवसांतल्या गोष्टी तेथें एकामागून एक मनांत येऊं लागल्या. माझ्या जीवनांत त्यावेळीं कांहींतरी अत्यंत महत्त्वाची गोष्ट घडून येणार असें माझें मन मला सांगू लागलें. ती घडेल तशी घडूं द्यायची कीं, तिच्या घटनेला अवरोध करावयाचा ? माझ्या जीविताशीं संलग्न असलेल्या सुधाकरांच्या अधिक वाटेस न जातां आपल्या वाटेनें आपण गेल्यें, आल्यावाटे पुण्यास अनाथबालिकाश्रमांत गेल्यें, तर सर्वच टळेल नाहीं ? उलटपक्षीं दैवावर हवाला टाकून होईल तसें होऊं दिलें, मनाच्या ओढ्याबरोबर स्वतःला वाहूं दिलें– तर ? याप्रमाणें आपल्याशीं पूर्वपक्ष–उत्तरपक्ष करीत खोलींत मंदगतीनें चालतां चालतां एका भव्य आरशांत माझें प्रतिबिंब पडलेलें पाहून मी त्याकडे पहात राहिल्यें ! माझ्या गतजन्मांतील स्त्रीशीं त्याचें इतकें कांहीं विलक्षण साम्य माझ्या दृष्टीस आलें, कीं मी त्याकडे पहातच राहिल्यें. रूढीशीं वैर करून जी तिलाच शेवटीं बळी पडली, प्रेमाशीं वैर करून जी त्यालाच शेवटीं पारखी झाली, तीच मूर्तिमंत माझ्यापुढें उभी आहे असें मला झालें. आणि मी महाबळेश्वरीं आल्यें, त्या दिवशीं रात्रीं स्वप्नांत ऐकलेले शब्द माझ्या मनांत येऊन आदळूं लागले.

"अखिल मानवतेच्या प्रेमांतील हें प्रेम अनंत कालाला पुरून उरेल आहे. ह्याच विकसन व्हायला किती काळ लागला, किती काळ लागणार, तें सुरगणांनांच ठाऊक ! दिक्कालकाननांत असलीं पुष्पें वरचेवर फुलत नाहींत. असलें प्रेम या ब्रह्मांडमालेंत वरचेवर उद्भवलेलें दिसत नाहीं."

तसेंच त्या स्वप्नांतील शेवटचे शब्दहि मला जणुं ऐकूं येऊं लागले.

"परमात्म्याचा प्रसाद नीट जपून ठेव. बहुकाळ जें तुझें शोधन करतें आहे त्याचा स्वीकार कर. स्वेच्छेनें वा परेच्छेनें त्याचा अव्हेर करूं नको. नाहीं तर पूर्वापराधाचीच पुनरावृत्ति होईल. स्वप्नांतून जागृतींत जा ! तिमिरांतून तेजांत जा ! मृत्युभयांतून जीवनांत जा ! एकांतांतून प्रेमांत जा व हा स्वप्नसंदेश हृदयाच्या हृदयांत ठेवून दे."

हा का सगळा कल्पनेचा खेळ ? कल्पना ही सत्याची मार्गदर्शिका नव्हे का ? भविष्यत्काळीं होणारे शोध कविकल्पना आधींच सांगत नाहीं का ? आपली धांवरी कल्पनाच एकदां सत्यशोधन करीत असते नाहीं का ? जें कांहीं घडेल तें घडूं द्यायचें, त्याला अवरोध ह्मणून करावयाचा नाहीं, दैवावर हवाला टाकून रहावयाचें, असा मी शेवटीं आपल्या मनाशीं निश्चय केला. तसेंच दोनचार दिवसांत महाबळेश्वर सोडावयाचें, असेंहि मी निश्चित करून टाकिलें. इतक्यांत घंटेचा मंजुळ नाद ऐकूं आला. ही जेवणाची घंटा, असें मी तत्काळ ताडलें व खोली बाहेर आल्यें. सुधाकर मला बोलवायला खोलीकडे येतच होते. त्यांच्याबरोबर दुसरें कोणी नसल्यामुळें, त्यांनीं माझे दोन्ही हात आपल्या हातीं घेऊन मजकडे प्रेमपूर्ण दृष्टिनें ते पाहूं लागले.

"अजून कांहीं निश्चित नाहीं-नाहीं का ?" ते सौम्यपणानें ह्मणाले. "सावकाशीनं विचार कर. कांहीं हरकत नाहीं."

मी आपली दृष्टि वर केली. त्यांच्या दृष्टिशीं तिचें मीलन होतांच मनाची सर्व शंका दूर झाली. मी त्यांच्याकडे पाहून स्मित केलें. इतक्यांत श्रीमंत, डॉ. भास्करराव, उषा व रामभाऊ हीं सर्व येतांना दिसतांच आह्मी तिकडे जाऊं लागलों; व क्षणांत जेवणाच्या पाटावर जाऊन बसलों.

सुधाकर, श्रीमंत, भास्करराव व रामभाऊ यांचीं पानें एका रांगेनें मांडलीं असून त्यांच्या समोर उषा व मी आमची दोघींचीं पानें मांडलीं होतीं. कणा, रांगोळी, उदबत्त्या वगैरे सर्व असायचें तसें होतें. पाटावर ताटें मांडलीं असून जिलब्या, बासुंदी, पुरी हीं सुधाकरांच्या पंजाबी ब्राह्मणानें फार चांगलीं केलीं होती. वाढणीलाहि एक पंजाबी ब्राह्मण मुलगाच

होता. जेवणारे बोलत असतां तो पानावर कांहीं वाढीत नसे, हें करणें मला फार आवडलें. विविध विषय निघाले. सामाजिक, धार्मिक, ऐतिहासिक, वाङ्मयपर सर्व विषयांवर सुधाकर इतक्या अधिकारानें व परिणामकर वाणीनें बोलत होते कीं, त्यांच्या सुधावाणीचेंच प्राशन करीत रहावें असें मला झालें. जेवणाच्या अर्ध्यावर–भाषणौघ थांबलासा होतांच मधुर जलतरंग संगीत सुरू झालें. टवकारून आम्ही सुधाकरांकडे पाहूं लागलों.

" जलतरंग यंत्र आहे हें." सुधाकर म्हणाले, " विजेनेंच चालतं हें. इतकं साधं आहे तें, कीं तें पाहून आश्चर्य वाटेल तुह्माला. अर्थात् यांत्रिक संगीत आहे हें. मानवी कंठांतून स्रवणाऱ्या संगीतापुढें याची काय किंमत: पण भाषणाला विषय उरला नाहीं; काय बोलावं आतां, तें सुचेनासं झालं, कीं, ऐकायला चांगलं हें जेवतांना. हां, वादविवाद असेल तर कांहींच बोलतां येत नाहीं अशा प्रसंगीं ? तेव्हां नुसते घास घेत घेत रहाण्यापेक्षां हें ऐकत जेवणं चांगलं नाहीं ?"

" बरोबर सुधाकर. " श्रीमंतांनीं उत्तर केलं; " पण माणसं ह्मटलं इतकीं व्यवहारी झालीं आहेत, कीं जेवणाच्यावेळीं जेवणावांचून दुसरं कशाकडे लक्षच नाहीं जात त्यांचं !"

" असंच नाहीं ह्मणतां येत श्रीमंत. " सुधाकर ह्मणाले; " हल्लीं माणसं इतकीं व्यवहारी झालेलीं आहेत असं नाहीं ह्मणतां यायचं. पूर्वीं काय किंवा हल्लीं काय माणसं सारखींच. त्यांच्यांत फरक इतकाच झाला आहे कीं, हल्लीं माणसं आपले मनोविकार दाबून ठेवितात; दिसूं देत नाहींत ते. आणि ह्मणून पूर्वींहून हल्लीं ते भयंकर झाले आहेत. प्रेम, मत्सर हीं पूर्वीं इतकींच आजहि माणसांत आढळून येत नाहींत काय ?"

" मत्सर हल्लीं नाहीं दिसत पूर्वींइतका " डॉ. भास्करराव मध्येंच म्हणाले, "तो अगदीं रानटी स्थितींतला मनोविकार. सुधारणा जितकी अधिक, तितका तो कमी. अशी आहे त्याची स्थिति. "

सुधाकरांना या बोलण्याचं हसूं आलें.

" रानटी स्थितींतले मनोविकार काय, किंवा आजच्या सुधारलेल्या स्थितींतले मनोविकार काय, मनोविकार तिथून सारखेच. सुधारणेनें ते कमी होतील, किंवा पालटतील, हें शक्य नाहीं. मत्सर हा प्रेमाइतकाच मानवी उन्नतीला अवश्य आहे. युद्ध जसें वाईट, पण आपल्या उन्नतीला अवश्य, तसाच हा मत्सर, आहे. प्रेम हा अगदीं दैवी मनोविकार ना ? पण त्यांत सुद्धां एक प्रकारची अशाश्वति वाटणार नाहीं, एक प्रकारचा गूढपणा असणार नाहीं, तर तें अविनाशीहि होणार नाहीं असं वाटतं मला."

" अविनाशि ! " श्रीमंत उद्गारले; "ह्मणजे आमरण, असंच तुमचं ह्मणणं किनई. "

" नाहीं, अविनाशि" सुधाकर ह्मणाले; "ह्मणजे कधींहि नाश न होणारं, आमरण टिकणारं. मृत्योत्तर नाहींसं होणारं प्रेम खरं प्रेमच नव्हे."

" कल्पना आहे ही तुमची," श्रीमंत ह्मणाले.

" कबूल, सुधाकरांनीं उत्तर केलें; " पण कल्पना ह्मणजे काय ? सत्यसृष्टींत नसणाऱ्या, पण कालांतरानें अस्तित्वांत येणाऱ्या गोष्टींविषयींचा विचार नाहीं का ? आजकालची सगळी सुधारणा, सगळी संस्कृति, हीं पूर्वीं कल्पनाच होती, नाहीं का ? "

श्रीमंत किंवा डॉ. भास्करराव कोणीच यावर बोलले नाहींत. सुधाकरांच्या प्रश्नाला उत्तरच देतां येणें शक्य नव्हतें. श्रीमंत त्यांच्याकडे सकौतुक पाहूं लागले मात्र.

" तुमचं आजवरचं सगळं चरित्र सांगाहो सुधाकर आम्हाला." शेवटीं ते म्हणाले.

" माझं चरित्र ? " स्मित करून सुधाकरांनीं विचारिलें: " सांगूं आपल्याला ? पण कंटाळा येईल पहा आपल्याला त्याचा."

" येऊंद्या आला तर. " श्रीमंतांनीं म्हणतांच " कॉलेज सुटल्यापासून मी एकच गोष्ट करतों आहे, ती कोणती ? तर सृष्टिशक्तीला आपलीशी करून घ्यायची: आणि योग्य प्रसंगीं तिचा उपयोग करून घ्यायचा. कुणालाहि तसं करतां येण्याजोगं आहे. आणि हितहि करून घेतां येण्यासारखं आहे आपलं कितीतरी. " सुधाकरांनीं उत्तर केलें.

" हित तें कसं ? " डॉक्टरांनीं कपाळाला आठ्या घालून प्रश्न केला.

" निरोगी प्रकृति, दीर्घकालिन तारुण्य आणि सामर्थ्य, आत्मस्वामित्व, शरीरस्वामित्व, मनोस्वामित्व इत्यादि प्रकारांनीं माणसाला तो सृष्टीचा स्वामी आहे, तिचा दास नव्हे, हें दाखवतां येणार आहे नाहीं का ?"

सुधाकरांचे हे शब्द निघतांच माझ्या उरांत धडधडायला लागलें. ह्याप्रकारें ते माझ्या मनावरहि आपलें स्वामित्व स्थापन करीत असतील काय ? शक्य नाहीं. मी तें त्यांनां कधींहि करूं देणार नाहीं. त्यांची मी दासी झाल्यें, तर ती माझ्या स्वतःच्या इच्छेनें. त्यांच्या इच्छाबलानें नाहीं होणार. हा विचार माझ्या मनांत येऊन जातांच त्यांच्याकडे मी पाहिलें. त्यांची आणि माझी दृष्टादृष्ट होतांच त्यांनीं किंचित् स्मित केलें. माझ्या मनांत काय चाललें होतें, तें त्यांनां कळलें हें मला स्पष्ट दिसून आलें. मी खालीं पहायला लागल्यें. आणि त्यांचें भाषण ऐकत राहिल्यें.

" कॉलेजांत असतां मी दास होतों," सुधाकर म्हणाले; " रूढीचा दास, ठराविक पद्धतींच्या शिक्षणाचा दास. सुदृढ प्रकृति, उज्वल बुद्धिमत्ता, आणि आंगची धमक हीं असल्यावर स्वामी व्हायचं टाकून माणसानं दास कां व्हावं, तेंच मला कळत नसे. माणसानं आधीं स्वतःचं अध्ययन करावं; जीवन म्हणजे काय तें पहावं; जडाचा चैतन्याशीं, तसाच स्वतःचा त्या दोहोंशीं संबंध काय, तें कळून घ्यावं, हें महत्त्वाचं, कीं केवळ शब्दपंडित होणं, परीक्षेंतल्या प्रश्नांचीं उत्तरं देतां येण्याकरितां कांहीं ठराविक पुस्तकं मुखोद्गत करणं, हें महत्त्वाचं ? असे प्रश्न तेव्हांच माझ्या मनांत येत असत. आणि मी तेव्हांच माझ्या कल्पनेप्रमाणें योग्य त्या अध्ययनाला लागलों. ' मी कोण,' ' माझ्या जिण्याचा अर्थ काय' तें पाहायचेंच, असा मी निश्चय केला. अगदीं क्षुद्र अणुपरमाणुला सुद्धां इतिहास आहे, कार्य आहे, निश्चितस्थान आहे. सहस्र अणुपरमाणूंचा समुदाय जो मी, त्यालाहि इतिहास कां नसावा—कार्य कां नसावें ? विश्रांत स्थान कां नसावें ? असलेंच पाहिजे. तें शोधून काढण्याच्या मी प्रयत्नाला लागलों. तें शोधून काढण्याचा मी उद्योग चालविला."

" अझून चालला आहेच वाटतं आपला तो उद्योग ? " डॉ. भास्कररावनीं साशंक मुद्रेनें प्रश्न केला.

" अझून आहेच तो चालू. " सुधाकर म्हणाले; " अनंताला अंत कसा असेल ? जो उद्योग संपणारच नव्हे कधीं, तो कसा संपेल इतक्यांत ? "

क्षणभर कोणीच कांहीं बोललें नाहीं !

"बरं ! मग पुढं सांगा तुमचं चरित्र. " औत्सुक्यपूर्ण स्वरांनीं श्रीमंत म्हणाले; "मुख्यतः तुमचं तारुण्य कसं राहिलं आजवर, तें कळू द्या आम्हाला नीट. "

" तारुण्य राखणं कठीण नाहीं आप्पासाहेब. सृष्टीचे कांहीं साधे नियम पाळले, म्हणजे वृद्ध होणंच कठीण जाईल पहा. " असें म्हणून सुधाकरांनीं सर्वांच्या पानाकडे नजर टाकली; तों आमचीं जेवणें आटोपलीं असून आम्ही सर्व उठण्याची वाट पहातों आहों, असें त्यांनां दिसून आलें.

उठायचं आतां श्रीमंत " ते म्हणाले; मी सांगतोंच काय सांगायचं आहे तें मुखप्रक्षालनानंतर. "

"ठीक" करून श्रीमंत उठले; त्याबरोबर आम्ही सर्वहि उठून हात तोंड धुवून बैठकीच्या दिवाणखन्यांत जाऊन बसलों. पानसुपारी वगैरे झाल्यावर सुधाकर पुनः बोलूं लागले. त्यांचें भाषण इतकें शांत इतके मोहक होतें, कीं सांगतां पुरवत नाहीं. ती सुधावाणी मी पूर्वी ऐकली होतीच, नाहीं का ? कितीदां तरी मी ती ऐकली होती. माझ्या जीवनक्रमांत, स्वप्नस्थितींत मी ती ऐकली होती, इतकेंच नाहीं, तर जागृतींतहि कामधाम करीत असतां किंवा लिहितां वाचतां मी ती ऐकली नव्हती का ? पण मला तेव्हां वाटे, ही माझी कल्पना आहे सगळी. पण आज ? मी ती खरोखरच ऐकत नव्हत्यें का ? आज तिचा प्रत्येक स्वर माझ्या अंतरात्म्याला ऐकूं येत होता असें मला वाटलें. अंतरात्म्याला विस्मृति होणें शक्य नाहीं, हेंहि आज माझ्या पुरें अनुभवास आलें !

---

## प्रकरण दहावें

# अमंगल रत्न

" हं—होऊं द्या पुढं चरित्र-कथन, " श्रीमंतांनीं म्हणतांच सुधाकर बोलूं लागले.

" आतांच आपल्याला सांगितल्याप्रमाणं, कॉलेज सुटतांच माझी शिक्षणविषयक गुलामगिरी सुटली म्हटली तरी चालेल. कॉलेजच्या अभ्यासक्रमांत जें ज्ञान मिळणं शक्य तें मला मिळालं. परीक्षेंत चांगला मान मिळाला. वर्षाचं वीस पंचवीस हजारांचं उत्पन्न वडिलांनीं मला ठेविलेलं होतं; तेव्हां मी आतां

सामान्य सुशिक्षित श्रीमंतांप्रमाणं हातावर हात, पाया-वर पाय टाकून स्वस्थ पडून सुखांत दिवस घालवीन असं साहजिकच जगाला वाटलं. पण मी तसं कांहीं न करतां युरोप अमेरिकेच्या प्रवासांत चार वर्षे घाल-विलीं. आणि प्रवास आटोपून हिंदुस्थानांत परत येतांच एका महंताच्या शोधाला लागलों. त्याचं नांव ब्रह्मानंद स्वामी. मी सुरू केलेल्या अध्ययनांत त्यांनां गुरु करावेत हाच माझा त्यांचा तपास करण्याचा हेतु होता. त्यांची त्यावेळीं पंजाबांत फार कीर्ति होती व त्यांच्या साधुवृत्तीमुळें, योगसामर्थ्यामुळें आणि वेदांत ज्ञानामुळें त्यांच्यावर खरीखुरी भक्ति बसलेले असे शेंकडों लोक मला पंजाबांत आढळले. पण स्वामींचं वास्तव्य कुठं आहे, तें कांहीं कोणाला ठाऊक नव्हतें. मी त्यांचा शोध पुष्कळ केला; शेवटीं त्यांचं स्थित्यंतर झाल्याचं कळलं; त्यामुळं थोडं वाईट वाटलं मला."

"ह्मणजे मृत्यु पावले, असंच किनई?" श्रीमंतांनीं विचारिलें.

"नाहीं. मुळींच नाहीं." सुधाकरांनीं उत्तर दिलें. "मृत्यु असा आहे कुठं? ते होते त्या स्थितींतलं अत्युच्च स्थान मिळवून वरच्या स्थितींत निघून गेले, असाच खरा प्रकार. त्यांचे शिष्य योगानंदस्वामी यांनीं हिमालयांत गुरूंच्या नांवाचा आश्रम स्थापून तेथेंच वास केलेला आहे. त्यांच्याकडेच नंतर मी गेलों. आणि त्यांच्यापाशीं दोन वर्षं अध्ययन केलं. तें दोन वर्षांचं अध्ययन ह्मणजे एक प्रकारचं दिव्यच मी काढलं, ह्मटलं तरी चालेल."

इतकें ह्मणून सुधाकर थांबले व विचारमग्न झालेले दिसले.

"ह्मणजे कडकडीत आचारशिक्षा? कीं ग्रंथाध्ययन होतं तें?" श्रीमंतांनीं विचारिलें.

"त्याचा एक प्रकार आचारशिक्षा. दुसरा ग्रंथा-ध्ययन. आणि तिसरा योगशिक्षण. ही योगशिक्षाच मला फार तापदायक झाली आप्पासाहेब. ती मिळत असतां आत्मिक आणि शारीरिक शक्तींचं युद्ध होई ह्मणायचं. शेवटीं जेव्हां शारीरिक शक्ति आत्मवश झाली, तेव्हां संपली ती शिक्षा. आणि दिव्याला उतरलों मी तेव्हां."

"पण त्या दिव्यानें लाभलं काय तुह्माला शेवटीं?" डॉ. भास्कररावांनीं चिरूट फुंकीत प्रश्न केला.

सुधाकर त्यांच्याकडे सारखे पहात राहिले. त्यांच्या तीक्ष्ण दृष्टींतून जणूं काय आत्मतेज प्रगट होऊन ती अगदीं प्रज्वलित झालेली दिसूं लागली.

"पहिला लाभ शक्तीचा." सुधाकरांनीं उत्तर दिलें; "ती शक्ति ह्मणजे स्वतःवरच चालविण्यापुरती नाहीं. तर माझ्या जीवनाशीं संबंध येणाऱ्या लहान मोठ्या सर्व बाह्य गोष्टींवरहि चालविण्याइतकी. कोण-त्याहि कार्याला हात घालण्यापूर्वीं त्याची बारीकसारिक माहिती करून घ्यावी लागते नाहीं? जीवन हेंच माझं कार्य. त्याचं ज्ञान कुणी फारसं करून घेत नाहीं. आणि ह्मणून कळतहि नाहीं कुणाला, तें मनासारखं कसं करायचं तें."

श्रीमंत टवकारून पाहूं लागले. "जीवनाचं गूढ कसं उकलणार?" ते ह्मणाले. "आपली जीवनधारणा आपण कशाकरितां करितों तें आपण कसं सांगणार? तें गूढ आजपर्यंत तर कोणाला उकललं नाहीं. आपण इथं स्वेच्छेनं कां आलेलों आहों? ते कशाकरितां आलों, हें तरी सांगूं शकूं?"

"बरोबर!" सुधाकरांनीं उत्तर केलें; "पण त्याचा उद्भव प्रेमांत, हें आधीं कळलं पाहिजे; तेव्हां त्याचा अर्थ कळणार. प्रेम हेंच जीवनाचं आदिकारण. प्रेम हेंच जीवन उत्पन्न करतं. कारण तो प्रेमाचा धर्मच आहे. अगदीं अज्ञेयवादीसुद्धां निरुत्तर झाले ह्मणजे कबूल करतात, कीं सृष्टीच्या मुळाशीं कांहीं-तरी गूढ, सर्वसमर्थ, सबुद्ध, हितकर शक्ति आहे. ती शक्ति, प्रेमाचा देव आणि प्रेम हीं एकच होत. ह्या प्रेमाला आत्मप्रगटीकरणाची इच्छा झाली कीं विश्वमाला, सूर्यमाला, ब्रह्मांडमाला झाल्या. इच्छेंतून कर्म उद्भवतं, कर्मांतून जीवन उद्भवतं. ह्या सृष्टि-धर्माशीं स्वत्वाची एकतानता करून घेणं इतकाच व्यक्तीचा धर्म. हा सृष्टिधर्म कोणता, तर प्रेमाचं आत्मप्रकटीकरण आणि त्यानं उद्भवणारं कर्म. ह्या प्रेमाचा पाया द्वैतावर आहे हें सांगावयास नकोच."

"ह्मणजे?" श्रीमंतांनीं प्रश्न केला.

"ह्मणजे विश्वांत एकटं असं कांहीं नाहीं, हें आपल्याला ठाऊकच आहे." सुधाकर ह्मणाला, "तेज आणि तिमिर, वर आणि खालीं, उजवं आणि डावं चांचल्य आणि स्थैर्य, स्त्री आणि पुरुष. सर्वांत द्वैत आहे. सर्वांचीं युग्मं आहेत. मानवी दुःखाचा बहु-तांश भलत्या युग्माधींच्या लग्नांचा परिणाम. पुरुषां-

कडेच याचा दोष अधिक येतो. आपलं खरं अर्धांग पुरुष बहुधा पहात नसतात. बाह्यावरच बहुतकरून ते निवड करितात व खऱ्या सुखास आंचवतात."

"आपल्या स्वतःवर आपण शक्ति चालवितां, म्हणून म्हणालांत आतां; तशी दुसऱ्यावरहि चालवितां येते आपल्याला?" उषेनें विचारिलें. इतका वेळ ती मूकस्तंभाप्रमाणें बसलेली होती; पण आतां तिचें सुधाकरांच्या बोलण्याकडे लक्ष वेधलेसें दिसलें.

"तें दुसरें जर माझ्या कर्मकक्षेंत आलें, तर चालवावी लागते त्याच्यावर आपली शक्ति. एरव्ही काय प्रयोजन?" सुधाकरांनीं उत्तर केलें; "माझ्याशीं ज्यांचा संबंधच नाहीं, त्यांच्यावर कशाला शक्ति खर्च करायची? आत्मसंरक्षणापुरताच मी तिचा उपयोग करीत असतों; आणि तो अगदीं सहज-लीलेनें."

मजवांचून सर्वजण सुधाकरांकडे टकमक पहायला लागलीं. पण त्यांनीं त्याकडे लक्ष न देतां आपलें बोलणें पुढें चालविलें.

"मी आतांच आपल्याला सांगितल्याप्रमाणं योगानंदस्वामीजवळचं माझं अध्ययन मी आटोपलं, आणि मग घरीं लाहोरास येऊन तिथं पुढील अध्ययन केलं. शहराबाहेर वडिलांनीं एक बाग आणि बंगला विकत घेतलेला होता, तिथं मी राहूं लागलों, आणि तिथंच आत्म्याचं गूढ काय आहे, तें पहाण्याचा प्रयत्न मी पुढें चालविला. आत्म्याचा सृष्टीशीं संबंध कसा घडवून आणिला तर सृष्टिरहस्य ज्ञान होईल, तिचं सर्वस्व मला लाभेल, तसंच वेळ आली असतां आत्मत्यागहि कसा करतां येईल तें मी पाहूं लागलों.

"म्हणजे" श्रीमंतांनीं विचारिलें, "आत्मत्याग करायचा मग सृष्टीचं सर्वस्व मिळवण्याचा काय हेतु?"

"आत्मत्यागाची तयारी असल्यावांचून सृष्टि कांहींच हातीं लागूं देत नाहीं श्रीमंत, आपल्या" सुधाकरांनीं उत्तर केलें. "आणि हा आत्मत्याग करायचा तो केवळ प्रेमाकरतां! त्याची वेळ आली कीं, सर्वस्वावर पाणी सोडायची तयारी हवी. कारण प्रेमच जीवनाची पूर्ति करतं आणि अविनाशी सुखाचा आपल्याला लाभ करून देत असतं. पण मी सांगतों आहे ती खऱ्या प्रेमाची गोष्ट. दैहिक विकाराची गोष्ट नव्हे. खरं प्रेम आणि दैहिक विकार यांत भेद तेज आणि तिमिर यांच्याइतकाच."

"या प्रेमाच्या कल्पनेमुळंच आजवर आपण लग्न पाशांत सांपडलां नाहींस दिसतं." डॉ. भास्कररावनी चिरूट फेंकित प्रश्न केला.

"होय" सुधाकर म्हणाले; "त्यामुळंच मी लग्नाच्या भानगडींत सांपडलों नाहीं आजपर्यंत."

क्षणभर कोणीहि कांहीं बोललें नाहीं. उषा सुधाकरांकडे मीतमीत चोरून पहायला लागली.

"तुमच्या कल्पनासृष्टींतलं अर्धांग मिळेलसं वाटतं का कधीं तुम्हाला?" डॉक्टरांनीं दुसरा चिरूट पेटवीत प्रश्न केला.

सुधाकरांनीं स्मित केलें. क्षणभर त्यांनीं कांहींच उत्तर केलें नाहीं.

"होय." शेवटीं ते म्हणाले; "मिळेलसं वाटतं मला माझं अर्धांग. न मिळणंच अशक्य. माझं जर तें अर्धांगच तर मला तें मिळालंच पाहिजे, नाहीं?"

"आणि मग पुढं?" डॉक्टरनीं प्रश्न केला.

"पुढं काय? विधिनियोजित दोन जीव संलग्न झाल्यावर सुखाला काय कमी? तुम्हाला ही सगळी कल्पनासृष्टीशीं वाटते; पण या मायामय संसारांत स्थिर-अनश्वर-असं जर कांहीं असेल तर तें हेंच. प्रेमबद्ध दांपत्याचं सुख, याविषयीं शंका नको मुळीं."

त्यांची वाणी सकंप झाली. मी ती ऐकत असतां माझी मला लाज वाटली तर त्यांत नवल काय? माझ्या मनाच्या ओढ्याबरोबर मी कां बरं स्वतःला वाहूं देऊं नये? माझ्या सुखशांतीला विरोधक असें जें मला करूं देत नव्हतें, तें इतकें का प्रबल आहे? त्याचें इतकें कां बरें माझ्या मनावर दडपण हें?

"कल्पनासृष्टीच्यावर भराऱ्या मारतां सुधाकर हल्लीं आपण." श्रीमंत मोठ्यानें उद्गारले. "खरं पाहतां प्रेम म्हणजे स्त्रीपुरुषांमधील दैहिक विकार. दुसरं कांहीं नाहीं तें. तें अनश्वर, अविनाशी असूं शकेल असं नाहीं वाटत. जीवनच जर अविनाशी नाहीं तर प्रेम तरी तसं कसं असेल?"

"तें तसं नसतं, तर या मानवतेची धडगत नसती आप्पासाहेब!" सुधाकरांनीं सस्मित उत्तर केलें. "आपण म्हणतां तसं असतं तर मानवता आणि पशुस्थिति सारखीच नसती का? मला तर वाटतं. दोहोंत भेद उरता ना मग."

श्रीमंतांच्या मुद्रेवर आत्यंतिक गांभीर्य आलें. डोळे क्षणैक मिटून घेऊन, बळेंच स्मित करून त्यांनीं ते

पुनः उघडले व " वादग्रस्त विषय आहे तो. जाऊं द्या तो. आणि तुमच्या या शारीरिक सुस्थितीची सांगा आह्माला गुरुकिल्ली. हो निदान बाह्यतः तरी तुह्मी जे असे तरुण दिसतां आहां, तें कशामुळं ?" अशी त्यांनीं पृच्छा केली.

" बाह्यतः तरी ! " सुधाकर उद्गारले व मोठ्यानें हंसू लागले. " ह्मणजे वस्तुतः कांहीं मी तरुण नाहीं आप्पासाहेब, असंच ना ? पण आपल्याप्रमाणं ज्यांनां माझ्या पूर्वचरित्राची माहिती नाहीं त्यांनां मी खुराखरा तरुण वाटतो आहे त्याची वाट ? ज्यांनां माझं खरं वय ठाऊक नाहीं, त्यांनां मी खरोखर विशी पंच-विशीचा वाटतो हें खरं नाहीं का ? आपल्याला सुद्धां माझ्याप्रमाणं आजवर तरुण राहतां आलं असतं, आप्पासाहेब. पण–"

" पण काय ? " श्रीमंतांनीं सोत्सुक प्रश्न केला.

" पण त्याला आपणा स्वतःसंबंधीं ज्ञान आणि सृष्टिज्ञान यांची जोड व्हायला हवी. पण आपण का यातायातींत पडतां ? मरणाकरितांच जगायचं, असाच जिथं आपला समज, तिथं तारुण्य रक्षण करून तरी काय करायचं ? आज नाहीं उद्यां मृत्युमुखीं पडायचंच, मग तें आजच पडलं तर काय बिघडलं ? मग कुणी सांगितली आहे आपल्याला ही तारुण्यसंरक्षणाची खटाटोप असंच ना आप्पासाहेब ? "

" नाहीं, अशी नाहीं माझी समजूत." श्रीमंत शांतपणें ह्मणाले. " जगण्यांत हशील नाहीं, असं नाहीं मी समजत. जगायला मिळेल तितकं हवंच, नकोसं कसं वाटेल ?–"

" असं खरं ना ?" सुधाकरांनीं श्रीमंतांचें भाषण संपण्यापूर्वीच विचारिलें. " जगायला मिळेल तितकं हवंच, नाहींका ? आपण आजवर सुखाबरोबर दुःखहि चाखलींत, तीं कशाकरितां ? सिंहासनस्थ राजापासून पर्णकुटींतल्या रंकापर्यंत सर्व प्रकारच्या अवस्थेंतलीं माणसं जन्मभर जीं खटाटोप करतात, तीं मृत्यु हेंच जीवनाचं अंतिम असतं तर करतीं का ? सर्वस्व विनाश हीच जर जीवनाची शेवटची पायरी असती, तर महत्त्वाकांक्षा कोण धरतं ? अर्थसंचयाकरितां कोण धडपडतं ? कीर्तिकरितां कोण प्राण देतं ? प्रेमा-करितां कोण सर्वस्वाचा यज्ञ करतं ? करतं का ? जीवन हें मृत्यूकरितां असं असतं, तर अनंत ब्रह्मांडमालांची उत्पत्ति हें केवढं महत्पातक ठरतं."

कोणीहि कांहीं बोललं नाहीं. सुधाकरांची दृष्टि विजेप्रमाणें सर्वांवरून फिरली.

यावर उत्तरच येणें शक्य नाहीं. आणि माझ्या तारुण्याचं रहस्य तें यांतच आहे. मृत्यु असा कुठंच नाहीं. जें कांहीं विश्रांत दिसतं तें स्थित्यंतर. या गोष्टीचीं चिरंतन जाणीव हीच तारुण्यसंरक्षणाची गुरुकिल्ली. ज्या अणूपरमाणूंनीं आपला देह घडलेला आहे, त्याचं स्थित्यंतर अखंड चाललेलंच असतं. त्या स्थित्यंतराचं जनन आपल्या जन्माबरोबर किंवा आपल्या जन्मापूर्वीच. आतां तारुण्यरक्षण हें ज्याचं इष्ट, त्यानं करायचं काय ? तर आपल्या मनाच्या आणि इच्छाशक्तीच्या साहाय्यानेंहि स्थित्यंतरक्रिया अशा रीतीनं चालवायची कीं ती आपल्याला हितकर होईल म्हणजे आपलं इष्ट पुरवील. माझंच उदाहरण घेऊं. मी हें जाणून आहे कीं प्रत्येक क्षणीं माझ्यामध्यें कांहीं विशिष्ट कार्याकरितां स्थित्यंतर होतं आहे. तेव्हां मी करायचं इतकंच, कीं तें स्थित्यंतर माझ्या शारीरिक आरोग्याला वर्धक असं होईल, तें पहायचं. त्या आरोग्याला विघातक, असं तें न होईसं करायचं. तें स्थित्यंतर माझ्या तारुण्याला वर्धक असं कसं होईल तें पहायचं. वार्धक्याला पोषक असं तें न होईलसं करायचं. ह्मणजे त्याचा अर्थ काय तर माझी शारी-रिक उन्नति वा अवनति ही माझ्याच हातीं आहे. मी आजारी पडलों, तर त्याबद्दल माझा मीच जबाबदार. मी वृद्ध झालों तर माझा मीच जबाबदार. ह्मणजे माझी इच्छा, तसा मी. मीच स्वतःला हवं तसं बनवितों. आणि ज्या सृष्टिनियमांनीं मी अस्तित्वांत आलों, तेच नियम मला या कामीं साहाय्यक होत असतात."

" आपली जशी इच्छा, तसे आपण होऊं असं जर असेल तर आपल्यापैकीं कोण सहस्रायु होऊं पहाणार नाहीं ?" डॉ. भास्कररावनीं विचारिलें.

" खात्री आहे आपली अशी ?" सुधाकरांनीं प्रश्न केला. " प्रत्येक जण सहस्रायु होईलसं खरंच वाटतं आपल्याला ? कोण काय होऊं पाहील, तें त्याच्या परिस्थितीवर स्वतःच्या निवडीवरच अवलंबून राहील. तुमचीच गोष्ट घ्या. तुह्माला सहस्रायुच होऊन रहा-वंसं नाहीं वाटत, खचित–त्याहून दुसरंच कांहीं व्हावंसं वाटतं आहे डॉक्टर तुह्माला, नाहीं ?"

" दुसऱ्याच्या मनांतले विचारहि कळतात वाटतं सुधाकर तुह्मांला ?" श्रीमंतांनीं अकल्पित प्रश्न केला.

सुधाकर सस्मित त्यांच्याकडे पाहूं लागले.

"बरीच मंडळी अलीकडे त्या विद्येच्या नादीं लागली आहे." सिगारेट पेटवीत डॉक्टरनीं उद्गार काढले. "त्या विद्येंत कठीण असं कांहीं नाहीं ह्मणा."

"कठीण कठीण तें काय आहे कशांत ?" सुधाकर ह्मणाले. "तर मग तेवढी ती आंगठी काढा बरं डॉक्टर तुमच्या खिशांतली. तुह्मी ती मुद्दाम मला दाखविण्याकरितां आणली आहे, बरोबर नाहीं ? किती किंमतीची होईल तें विचारावयाचं आहे आपल्याला मला, नाहीं का ?" डॉक्टरांच्या तोंडची सिगारेट खालीं पडली व ते टकमक पहात राहिले. 'आश्चर्यातिरेक' ज्याला ह्मणतात, तो मला त्यांच्या ठिकाणीं चांगला पहायला मिळाला. श्रीमंतहि आरामखुर्चीवर उठून बसले व सुधाकरांकडे टकमक पाहूं लागले.

"पण-पण आपल्याला कळलं कसं-मी खिशांत आणली आहे ह्मणून ?" डॉक्टरानीं संकप स्वरांनीं विचारिलें.

सुधाकर हंसू लागले.

"विचारवाचनविद्येनं. तिच्यांत कठीण असं कांहीं नाहीं. तुम्हीच आतां ह्मणालांत डॉक्टर. मग त्यांत विशेष तें काय ? बरं काढा ती आंगठी बाहेर आतां."

सुधाकरांनीं असें ह्मणतांच डॉक्टर अगदीं गोंधळून गेले.

"आंगठी आणली आहे खरी मी बरोबर." डॉक्टरांनीं स्थिर होऊन सिगारेट उचलून घेत उत्तर दिलें. "ह्मटलं, ती आपल्याला दाखवून तिची आदमासिक किंमत विचारावी; तसंच ती किती वर्षांची जुनी आहे तेंहि आपल्याला सांगतां आल्यास विचारून घ्यावं." असें ह्मणून धूर सोडीत त्यांनीं आपल्या जॅकिटाच्या खिशांतून एक चांदीची डबी बाहेर काढली व ती उघडून तिच्यांतील आंगठी सुधाकरांच्या हातीं दिली. आंगठीचा हिरा लखकन लकाकला. त्या सरशीं सुधाकरांनीं ब्रह्मारण्यांत दाखविलेल्या दृश्यांपैकीं एकाची आठवण झाली. चितारी शिवकरण याचा वध ज्या हातानें केला, त्या हातीं अशीच दैदीप्यमान् हिऱ्याची आंगठी लकाकल्याचें मला एकदम आठवलें. सुधाकर त्या आंगठीचें निरीक्षण करीत असतां मी तिकडे एकाग्रतेनें पहात राहिलें.

"फार जुनी आंगठी आहे ही" सुधाकरांनीं तिजकडे पहात उद्गार काढिले, व आपली दृष्टि डॉक्टरांकडे वळवून ते ह्मणाले "निदान चारशें वर्षांची जुनी आहे. रजपूत घडण आहे ही. रजपूत राजाची असावी ही मूळची. हा हिरा जर बोलूं शकेल, तर काय अद्भुत गोष्ट सांगेल हा. अमंगल रत्न आहे हें."

"अमंगल तें कसं ?" उषा जी इतका वेळ मुकट ऐकत होती, तिनें विचारलें.

"अमंगल ह्मणजे, याचा दुरुपयोग झालेला आहे, जें अमंगळ कामीं लागलेलं आहे असं. अशा रत्नांपैकीं आहे हा हिरा. मौल्यवान् रत्नांत एक प्रकारचं चैतन्य असतं. त्या चैतन्याच्या योगानं त्यांच्यांत परिस्थितीचीं चित्रें ग्रहण करण्याची शक्ति असते. ह्या हिऱ्यांत कित्येक अमंगल प्रकारचीं चित्रें उमटलेलीं दिसताहेत. फार दुःखाचे प्रकार दिसतात ते."

सुधाकरांचे हे उद्गार डॉ. भास्करराव निमूट ऐकत होते. ते थांबल्यावर सिगारेट फेंकून डॉक्टर घुटमळत बोलूं लागले—

"या आंगठीचा पूर्वेतिहास कांहीं मला माहीत नाहीं. आमचे वडील उत्तर हिंदुस्थानांत संस्थानचे कारभारी असतां तेथल्या महाराजांकडून त्यांनां ती देणगी ह्मणून मिळाली. त्यांच्या पश्चात् ती मजजवळ आहे. मी इंग्लंडांत असतां एका रत्नपारख्याला ती दाखविली होती. त्यांनीं मला ती विकून टाकायला सांगितली. पण ती कल्पनासुद्धां मला सहन होत नाहीं. इतकी ती मला आवडते."

"स्वाभाविकच." असें म्हणून सुधाकरांनीं ती उषेकडे केली. उषेनें ती हातीं घेतांच तिची मुद्रा भीतिग्रस्तशी मला दिसली. तिनें ती लागलीच श्रीमंतांच्या हातीं दिली. श्रीमंतांनीं ती क्षणभर पाहून मजजवळ दिली. मी ती घेऊन रामभाऊंकडे करतांच डॉक्टरांनीं त्यांच्या जवळून घेतली व डबींत घातली.

"पण अशा तऱ्हेच्या अमंगळ रत्नांचा तीं ज्याजवळ असतील त्याच्यावर कांहीं अनिष्ट असा परिणाम होतो का ?" श्रीमंतांनीं विचारिलें.

"अर्थात्. झालाच पाहिजे. त्याच्या उलट चांगले संस्कार झालेल्या, म्हणजे मंगळ रत्नाचा अत्यंत हितकर परिणाम होत असतो." असें म्हणून सुधाकरांनीं आपल्या बोटांतील आंगठी काढली. "उदाहरणार्थ, ही आंगठी पहा, हिजवर कसलेहि अमंगळ संस्कार झालेले नाहींत. अगदीं शुद्ध आहे हिचा हिरा. त्यामुळं याचं तेज पहा कसं चंद्रप्रभेप्रमाणें आहे

आनंददायक. आणि ही जुनीहि फार आहे. हजार वर्षांची जुनी आहे ही."

आह्मी सगळ्यांनीं तीं हातांत घेऊन पाहिली. चंद्रप्रभेप्रमाणें त्या हिऱ्याचें तेज खरोखरच आनंद-दायक आहे असें मला वाटलें.

"रत्नं मंगल करण्याचं काम स्त्रियांचं." मजकडे सस्मित पहात सुधाकर ह्मणाले; "तें त्यांनीं केलं, ह्मणजे त्यांच्या प्रमाणं रत्नंहि सर्वांना आनंद व सुख देऊन मंगलदायक होतात."

"सोपंच काम आहे स्त्रीवर्गाकडे सुधाकरांच्या ह्मणण्याप्रमाणं." श्रीमंतांनीं विनोद केला.

"स्त्रियांनां ते खरोखरच सोपं आहे." सुधाकर ह्मणाले; "आपली पुरुषांची मात्र गोष्ट निराळी. आपल्याला त्या कामाइतकं कठीण दुसरं कामच नाहीं. आपल्याला ह्मणजे सामान्य पुरुषांनां. अपवादरूप पुरुषांची गोष्ट नाहीं बोलत मीः पण आपण जांभया द्यायला लागलां आप्पासाहेब. आपली वामकुक्षि मी पळवितों आहे, नाहीं? गादी टाकून द्यायला सांगूं का गड्याला?"

"नको–नको," श्रीमंत जांभई देत ह्मणाले. "घरींच घेईन ती अंमळशानं. इथं पळवितों तिला जराशी, चला हिंडूं थोडा वेळ इकडे तिकडे." असें ह्मणून ते उठले, त्याबरोबर सुधाकरहि उठले व ते दोघे बोलत बोलत तेथून निघून गेले. डॉक्टर व रामभाऊ हेहि त्यांच्या पाठोपाठ निघून गेले: तेव्हां मी आणि उषा दोघीच तेथें राहिलों.

"हीं मतं तुला पसंत असणारच गीते. नाहीं?" उषेनें विचारिलें.

"कोणतीं मतं?" मी उलट विचारिलें.

"हीं–मृत्यु असा नाहींच; तसंच आपलीं फक्त स्थित्यंतरं होत असतात. आतां सुधाकरांनीं सांगित-लेल्या गोष्टींवर तुझी श्रद्धा असणारच ह्मणा. ह्या गोष्टी जर खऱ्या असतील, तर काय ग तरी भयंकर. मग मृत्यूच्या सुखाला आपण आंचवलोंच, नाहीं? निदान माझ्यासारख्या, जीवाला कंटाळलेल्या स्त्रियांनां तरी मृत्यु हें सुख नाहीं का ग?"

"खरंच ह्मणतेस उषे," मी संकप स्वरानें तिला ह्मटलें. "आपणासारख्या स्त्रियांनां मृत्यु हा पुष्कळ वेळां खरोखरच सुखाचा होतो. आपणावर ममता करणारं कोणी नसलं, जग शून्यसं वाटायला लागलं, ज्यांनां आपण आपलंसं ह्मटलं, तींच आपल्याला परक्यासारखीं लेखूं लागलीं, ह्मणजे मरण हें सुखाचं कां नाहीं वाटणार? प्रेमावांचून जिणं, अनंतकाळचं जिणं कोणाला हवंसं वाटेल? अशा स्थितींत खरा मृत्यु–खरा विनाश–किती सुखाचा?"

मला पुढें बोलवेना; डोळे पाण्यानें भरून आले. उषेनें तें पाहिलें व ह्मटलें, "गीते, तुला वाईट वाटायला काय झालं ग? तूं सदाची आनंदी, तुला दुःख कसलं?"

आलेला गहिंवर दाबून मी ह्मणाल्यें, "नाहींग, मला आपलं वाईट वाटलं कीं माझं आजपर्यंतचं जिणं कसं वेड्यासारखं झालं, इतकंच. दुसरं कांहीं नाहीं उषे."

उषेला माझ्या बोलण्याचा अर्थ कसा कळणार? ती मुकट मजकडे पहात राहिली. तिच्या तो लक्षांत येऊं नये, ह्मणून मी विषयच पालटला.

"पण हो," मी ह्मटलें, "मी जाईन ह्मणत्ये एक दोन दिवसांत इथून. पुष्कळच राहिल्यें मी तुझ्याकडे. जावंच आतां. हो–तुलाहि माझ्या सह-वासापासून मोठंसं सुख वाटतं आहे असं नाहीं. नि मलाहि—"

उषा गांभिर्यानें माझ्याकडे पाहूं लागली.

"गीते, मलाहि असंच वाटायला लागलं आहे काल-पासून. तुलाहि असंच वाटावं यांत नवल नाहीं?"

"नवल नाहीं उषे." मी उत्तर केलें. "दोघींनां एकमेकींकडे ओढणारं असं कांही तरी दोघींत आहे, त्याचप्रमाणं दोघींनां एकमेकींपासून ओढणारं असंहि कांहींतरी दोघींत आहे, त्याचा हा परिणाम. तें काय आहे, तें तुलाहि सांगतां यायचं नाहीं, मलाहि सांगतां यायचं नाहीं. पण तसं कांहीं तरी आहे खास. असे प्रकार पुष्कळांमध्यें झालेले मी पाहिले आहेत; पण असं कां व्हावं तें कोण सांगणार? तें गूढच नाहीं का?"

"पण—" उषेनें ह्मटलें. "पण हे–तुझे–सुधाकर इथं येईपर्यंत असं नव्हतं ग कधीं वाटलं मला नि तुलाहि खास."

ती पुढें कांहीं बोलणार, तों सुधाकर आणि श्रीमंत घाईघाईनें आंत आले.

"ब्रह्मारण्याकडे जायचं ह्मणताहेत आप्पासाहेब, रोजची वामकुक्षि टाकून. तुह्मी दोघीहि येतांना?" सुधाकरांनीं प्रश्न केला.

मला नकळत मी 'होय' ह्मटलं. उषा घुटमळली.

" आतां चहा घेऊं, नी जाऊं. मग तुझी काय हरकत आहे ?" श्रीमंतांनीं उषेला विचारलें.

"पण तुम्ही येणार आतां !" उषा साश्चर्य उद्गारली.

" होय ग, सुधाकरांनीं सुचवलं, ब्रह्मारण्याकडे जाऊं ह्मणून. ह्मटलं, जाऊं ते ह्मणताहेत तर, ही गीता येते आहे. मग तुलाच मागं राहून काय करायचं ?"

उषेचा निरुपाय झाला. " चला तर " करून ती उठली.

तों चहा, बिस्किटें, फळें टेबलावर येऊन थडकलीं.

"सारा बेत कसा घड्याळासारखा सुधाकर तुमचा," श्रीमंत उद्गारले.

" तसा तो व्हावा असा प्रयत्न करतों झालं. प्रत्येक बाबतींत आणि प्रत्येक खेपेला, तो तसा जमतोच, असं थोडंच आहे ? बरं मग उशीर का ? उचलायचा चहा." असें ह्मणून सुधाकरांनीं आपला दुधाचा कप उचलला.

सर्वांनीं चहाला आरंभ केला. डॉक्टर भास्करराव विशेष गंभीर दिसले. बरोबर येण्याचें त्यांच्या मनांत नसतां 'सेवाधर्म' ह्मणून त्यांनां येणें भाग पडलें असा ह्या गांभीर्याचा मी अर्थ केला.

चहा आटोपतांच मंडळी जायला सज्ज झाली. " चलायचं. " असें सुधाकर म्हणतांच केवळ कर्णमनोहर असे संगीत स्वर ऐकूं येऊं लागले. सुधाकरांच्या यांत्रिक जलतरंगाच्या लहरी होत हें सांगावयास नकोच. सुधाकर, श्रीमंत, उषा, मी, डॉक्टर व रामभाऊ हीं सर्व मोटारींत चढतांच ते स्वर थांबले व सुधाकरांचा 'साइस' मागें उडी मारून चढतांच मोटार सुरू झाली.

---

## प्रकरण अकरावें

## ' प्रेमपथ '

' जलतरंग ' थांबलें पण त्यानें माझ्या हृदयांत उत्पन्न केलेले तरंग कांहीं थांबले नाहींत. मला जखडून टाकणारी शृंखला खरोखरच का अभेद्य आहे ? या विचारानें माझें हृदय धडधडूं लागलें; डोळे भरून आले. ज्या विकार--विचारांबरोबर माझें मन वहात होतें, ते मला बोलूं देईनात. अशा स्थितींत–माझ्या या निःशब्द स्थितींत, मोटार एकदम थांबली. तेव्हां कोठें मी भानावर आल्यें व पहात्यें, तर ब्रह्मारण्याच्या कांठावरील कालचेंच मोटार थांबण्याचें ठिकाण.

" उतरायचं आप्पासाहेब," म्हणून सुधाकर उतरले. त्याबरोबर श्रीमंत, उषा, मी, डॉक्टर आदि आम्ही सर्व उतरून अरण्यांत प्रवेश केला. सुधाकरांचा नोकर मोटारीजवळ राहिला, हें सांगावयास नकोच.

" हें पहा आप्पासाहेब," सुधाकरांनीं डोकीवरील वृक्षशाखांकडे हात करून ह्मटलें; " हे वृक्ष पहा. यांतील बहुतेक, फांद्यांत फांद्या अडकवून, लवून वांकून परस्परांच्या उन्नतीला अवरोध करीत आहेत. एखादाच तसं न करितां सडक वर जाऊन नभोदर्शन घेतो आहे. बहुजन समूहहि त्या वृक्षाप्रमाणें गतानुगतिक होऊन, परंपरेस बिलगून खऱ्या उन्नतीस अवरोध करीत असतो. त्यांतला एखादाच तसं न करितां–गतानुगतिक न होतां–सडक वर जातो व सत्यदर्शन घेतो, नाहीं ?"

" खरं आहे सुधाकर," श्रीमंतांनीं उत्तर केलें. " समाजबंधनं वाढलीं, व्यक्तिस्वातंत्र्याला वाव नाहींसा झाला, म्हणजे व्यक्तिवाद–व्यक्तिस्वातंत्र्यहि प्रचारांत आणण्याकरितां समाजाला धाब्यावर बसवावं लागतं. पण तें धैर्य फार थोडक्यांतच सांपडतं. म्हणूनच अशांनां महात्मे समजतात व त्यांचे गोडवे गातात."

" पण–पण–" डॉक्टर अडखळत बोलूं लागले. " पण–पाश्चात्यदेशांत तर आज व्यक्तिवाद ढांसळून पडतो आहे व त्याच्या जागीं समाजशास्त्राची ध्वजा उभारली जात आहे. मग त्या व्यक्तिवादाची आपल्याकडे प्रस्थापना करून कसं चालेल ?"

" कां बरं ?" सुधाकरांनीं उत्तर केलें, "कां नाहीं चालणार ? पाश्चात्य देशांत व्यक्तिवादाचा कळस झाला; व्यक्ति कोणतीहि सामाजिक बंधनं ओळखीनाशी झाली व त्यामुळं समाजाला 'समाजपण' उरतं कीं नाहीं, अशी वेळ आली; म्हणून आज तिकडे व्यक्तिस्वातंत्र्याच्या जागीं समाजवादाची, सामाजिक कर्तव्याची स्थापना होत आहे. पण आपल्या इकडे तसं आहे का ? आपल्या इकडे त्याच्या उलट प्रकार नाहीं का ? आपल्या इकडे समाजानं व्यक्तित्व खाऊन टाकलं आहे; व्यक्तीला अस्तित्वच उरलेलं नाहींसं झालं आहे, व त्यामुळं समाज ज्या अनिष्ट परंपरेस बिलगून राहिला आहे, ती

मोडणं अशक्यसं झालेलं आहे. म्हणूनच इकडे आजकाल कशाची गरज असेल, तर व्यक्तिवादाची. समाजवाद आपल्याला आज नको आहे. समाजाकरितां व्यक्तीनं आत्मयज्ञ करण्यापेक्षां व्यक्तीकरितां समाजानें आज आत्मयज्ञ केला पाहिजे. व्यक्तीच्या वाढीकरितां समाजानं आपलीं बंधनं आज ढिलीं केलीं पाहिजेत, तरच तरणोपाय आहे. समाज आपण होऊन तीं बंधनं ढिलीं करणार नाहीं, तर व्यक्तीनं तीं ढिलीं केलीं पाहिजेत. धार्मिक, सामाजिक व औद्योगिक सर्वच बाबतींत व्यक्तिस्वातंत्र्याचा परिपोष व्हायला हवा. तरच आपला समाज या बाबतींत पूर्वींचें उच्चपद मिळवील असं नाहीं वाटत आपल्याला श्रीमंत ?"

श्रीमंत घुटमळले. एक सामजिक सुधारणेची बाब कायती त्यांनां ठाऊक. इतर बाबींविषयीं ते काय बोलणार ?

" आहे-आहे-बरोबर आहे तुमचं ह्मणणं," ते शेवटीं ह्मणाले. तितक्यांत उषेनें त्यांनां कायसें विचारिलें; तेव्हां तिच्याशीं ते बोलूं लागले.

एव्हांना आह्मी ब्रह्मारण्याच्या मध्यावर आलों. श्रीमंत व उषा, डॉक्टर व रामभाऊ, आणि सुधाकर व मी अशा इतउत्तर जोड्या होऊन आह्मीं बोलत बोलत जाऊं लागलों. पहिल्या दोन जोड्या पुढें असून आमची जोडी सर्वांच्या मागें होती.

" तुला मजजवळ बोलायचं आहे एकट्याशीं नाहीं ?" सुधाकरांनीं मला विचारलें. तूं काय बोलणार आहेस तें मला ठाऊक आहेच ह्मणा."

" मग मी बोलायला नकोच तें." मी उत्तर केलें.

"नकोच, खरंच नको. पण "तूं तें बोलून टाकल्यानं समाधान वाटेल, तुला आणि मला-दोघांनांहि-पण तुला संकोच तरी कां वाटावा आतां माझ्याशीं बोलायला ?"

" संकोच," मला कसेंसेंच वाटून मी उद्गारल्यें. " संकोच कां वाटेल ?"

" नाहींना. पण खरंच का हें ?"

मी दृष्टी वर करून त्यांच्याकडे पाहिलें; ते सस्मित दिसले. माझ्या हृदयांतील धडधड क्षणांत बंद झाली.

" मला काय होतं आहे नि काय नाहीं, सांगायला का हवं मी ?" मी हलकेंच ह्मटलें. " हा सगळा प्रकार किती अकल्पित घडून आला आहे बरं ? नि ही-ही मंडळी अशा प्रकारची. तेव्हां कांहींसा संकोच कां नाहीं वाटणार ? एरव्हीं बोलत्यें, तितकं मोकळेपणानं कसं बोलवेल अशा स्थितींत ? आपली गोष्ट निराळी. पुरुषांची गोष्टच निराळी नि शिवाय आपल्याला का ह्या असल्या माणसांचा संकोच वाटणार ? पण माझी गोष्ट निराळी. लवकरच आतां मी इथून गेल्यावर कदाचित् मला या सगळ्या प्रकाराचा शांतपणानं विचार करतां येईल; नि मग थोडा फार धीर येईल बोलायला."

" काय. तूं जाणार लवकरच ?" सुधाकरांनीं शांतपणें विचारिलें.

" ह्मणत्यें-तसं. वरं नाहीं का आतां जाणं ?"

सुधाकर कांहींच बोलले नाहींत. मी पुढें ह्मटलें " अशा स्थितींत काय करावं, तेंच मला कळत नाहीं. आपणच साहाय्य करायला हवं मला अशा प्रसंगीं."

"मी ? मी साहाय्य करूं ?" सुधाकरांनीं विचारिलें. "पण तूं इथून गेल्यावर मी साहाय्य तें कसं करणार ?"

सुधाकरांचे हे सखेद स्वर ऐकून आतां काय करावें, तेंच मला कळेना.

" मी जात्यें आहे, ती इकडच्या सहवासाला मी पात्र आहें असं मला वाटतं, तर जात्यें का मी ?"

मला पुढें बोलवेना असें पाहून त्यांनीं माझा एक हात आपल्या हातीं घेतला; " मी ही अशी विक्षिप्त, दुराग्रही, आपल्या सहवासाला सर्वथैव अपात्र. नाहीं का ? किती बोलायचं आहे मला पण-पण. या मंडळीला काय वाटेल ?"

" कांहीं नाहीं वाटत त्यांनां," माझा हात आपल्या हातीं ठेवून सुधाकर ह्मणाले; " त्यांनां आपलं संभाषण ऐकूंच जाणार नाहीं, किंवा आपलं कांहीं संभाषण चाललं आहे, हेंहि त्यांच्या लक्षांत येणार नाहीं, इतके त्या सगळ्यांनां मी दूर-त्यांनां नकळत दूर ठेवतों. ह्मणजे तर झालं ?-बघ. ते बघ. सगळेच जलद चालूं लागले. हं. आतां बोल, तुला काय बोलायचं आहे तें ?"

मी दृष्टि वर केली. त्यांची दृष्टि मजवर प्रेमाचा वर्षाव करीत आहेशी मला वाटली.

" आपल्या पूर्वसंबंधाविषयीं, आपल्या पूर्व ऋणानुबंधाविषयीं तुला कांहीं कळायचं राहिलं आहे का ?" त्यांनीं सौम्यपणें विचारलें.

" आपल्याला त्याचं ज्ञान जितकं आहे, तितकं मला आहे का ? मी फार तर काळोखांत चांचपडत्यें आहे, आपल्या हाताच्या आश्रयानं चांचपडत चालत्यें

आहे, असंच नाहीं का ? आपण प्रकाशांत चालत आहां. त्याप्रमाणं मला प्रकाशांत नको का चालतां यायला ? त्याप्रमाणं मला चालतां यायला आपलं साहाय्य व्हायला हवं मला. आपण ज्याप्रमाणं योगानंद स्वामींजवळ अध्ययन केलं, त्याप्रमाणं मला नाहीं करतां येणार? कोणाशीं मी अध्ययन केलं तर आपल्याप्रमाणें मला सर्व गोष्टींचं प्रत्यक्ष ज्ञान होईल, सांगावं कसं मला.''

सुधाकर आश्चर्यानें स्तंभित झाले.

" तूं योगाभ्यास करणार ? माफ कर. तुझ्यासारख्या अबलेच्यानं योगासारखी कठीण विद्या होईल? शिवाय, तुला ती विद्या शिकून तरी काय करायचं ? मी सांगतों, त्यावर तुझा विश्वास आहे ना ?''

" मी स्वतः काय तें पाहिलं तर कुठं बिघडलं ? आपले व माझे पूर्वसंबंध कसे आहेत, त्याचं मला प्रत्यक्ष ज्ञान झालं तर अधिक बरं नाहीं का ? ''

" अविश्वास ! पूर्वचरित्राची पुनरावृत्ति. प्रेम आणि अविश्वास ! ही पुनरावृत्ति, हा त्रास, टाळतां येणं शक्य नाहीं का ? ''

" नाहीं '' मी निश्चयानें म्हटलें, ''मला तरी शक्य नाहीं. माझ्यासारख्या अभागिणीनं-विधवेनं आपल्या पूर्वबंधनाचं प्रत्यक्ष ज्ञान करून घेतल्यावांचून, माझं तरी कसं साहस होईल, या बंधनानं बांधून घ्यायचं?''

माझा कंठ सकंप झाला. सुधाकर क्षणभर कांहींच बोलले नाहींत.

" तुझ्या मनस्थितीची कल्पना आहे मला, '' ते ह्मणाले, " तूं आणि मी अनंत कालापासून ज्या बंधनानं बांधलेलीं आहोंत, तें बंधन केवळ अभंग आहे, विश्वांतल्या कोणत्याहि शक्तीला तें तोडतां यायचं नाहीं. ही जाणीव तुला पूर्णपणें आहे. पण केवळ व्यवहारी अशा माणसांशीं तुझा निकट संबंध आलेला असल्यामुळं अध्यात्मिक जीवनाचा पायाच अशीं जीं त्रिकालाबाधित तत्त्वें, त्यांवरचा तुझा विश्वास डळमळीत आहे. मला हें दिसतंच आहे. तूं योगाभ्यास कां करूं पाहतेस, तेंहि मला कळतं आहे. ठीक, तुझ्या आड नाहीं येत मी.''

माझा जीव खालीं पडल्यासारखा झाला. अर्धोन्मीलित नेत्रांनीं-पूर्ण गांभीर्यानें ते मजकडे पहात राहिले.

''तुला आनंद झाला आहे. पण पुढच्या अडचणींची कांहीं कल्पना आहे तुला ?'' ते शांतपणानें बोलूं लागले, ''योगानंद स्वामींकडे जर तूं गेलीस, आणि जाणार, हें ठरलंच आतां. तर काय होईल याची कल्पना आहे तुला ? एक सुखशैलावर तरी बसशील, नाहीं तर दुःखाच्या खोल तळाशीं तरी पडशील हें लक्षांत ठेव. तरी पण तुझ्या मनोदयाप्रमाणं तूं करावंस हें मलाहि ठीक दिसतं. सध्यांच्या अनिश्चयाच्या स्थितींत राहण्यापेक्षां, जें मिळविलं आहेस तें गमाविण्याच्या मनःस्थितींत रहाण्यापेक्षां योगाभ्यास करून, सोक्षमोक्ष लावून घेतलेला काय वाईट ?''

" मिळवलं आहे तें गमविणार ?'' मी दीनासारखी सुधाकरांकडे पहात राहिल्यें: ''कद्धीं नाहीं. मिळविलेलं मी कद्धीं गमाविणार नाहीं.'' कांहींसें त्वेषानें मी म्हटलें, ''इकडचे पाय मला मुकतील, हें त्रिकालीं शक्य नाहीं.''

''आणि असं असून तुला मजविषयीं अविश्वास वाटतो.'' सौम्य, मधुर स्वरांनीं त्यांनीं उत्तर केलें.

''मला प्रत्यक्ष ज्ञान हवं आहे. म्हणून तर-'' त्यांच्या मुद्रेवरील सौम्य मधुर छटा एकदम मावळून, त्या जागीं गंभीर स्वाभिमान झळकूं लागला.

''एकूण तुझा तो पूर्वीचा बाणा नाहींच गेला. ती पूर्वीची अजिंक्य स्वेच्छाशक्ति, ती पूर्वीची विषमात्राचा मध्यबिंदु शोधून काढण्याची वृत्ति नाहींच लोपली. पण हें लक्षांत ठेव, कीं प्रेम-खरं प्रेम या कशालाच जुमानीत नाहीं. प्रेम-खरं प्रेम हेंच या अखिल विश्वाचं एकटं बंधन आहे. तें स्वयंसिद्ध असतं. तें ठराविक नियमांनीं स्पष्ट होत नसतं. त्याच्याहून प्रचंडतर अशी शक्ति त्रैलोक्यांत नाहीं. हें बघ, ही शक्ति तुला, एक तर नत करील वा नष्ट करील. तुला ठाऊक नाहीं का ?''

मी उत्तरच केलें नाहीं. माझा हात त्यांच्या हातींच होता. आम्ही दोघेंहि समोरच्या सावित्री खोऱ्यांत दूर दूर पहावेल तितकें दूर पाहूं लागलों.

''तूं आजवर बराच ताप सोसलेला आहेस. तुझ्या आचारविचाराचं क्षेत्र बरंच विस्तृत झालेलं आहे. तुझ्या वयाच्या बहुतेक स्त्रियांत दिसून येणारा बालिशपणा तुझ्यांतून गेलेला आहे. क्षुद्र गोष्टींनां महत्त्व देण्याची तुझ्या वयाच्या स्त्रियांची वृत्ति तुझ्यांत राहिली नाहीं. तुझं हिताहित तुला चांगलं कळतं आहे. तेव्हां हिमालयांत योगानंद स्वामींकडे जाऊन योगाभ्यास

करण्याच्या तुझ्या विचाराआड मी कसा येऊं? ठीक! तुझ्या विचाराला माझी पूर्ण संमति आहे." असें म्हणून त्यांनीं माझा हात सावकाश सोडून दिला. त्याबरोबर मला कसें–एकदम एकटें वाटूं लागलें.

"राग तर नाहीं ना होत मजवर" मी म्हटलें.

"राग? लाडके, गतकाळीं तुझे मी इतके अपराध केले आहेत व त्यामुळं मला तूं इतके वेळा मुकली आहेस, कीं पुनः मी तसं करीन हें स्वप्नांतहि आणूं नकोस."

असें म्हणून त्यांनीं स्मित केलें. मला क्षणभर असें झालें, कीं सारा संकोच झुगारून देऊन हृदयाच्या हृदयांत मला वाटत होतें तें सगळें बोलावें. पण माझा हट्टी स्वभाव मला तसें करूं देईना. मी गप्प राहिल्यें. तरी मन खाऊं लागलें. योगाभ्यासावांचून ज्यांनां मी पूर्णपणें जाणीत होत्यें, जे माझे अनंत काळचे सहचर, माझें जीवनसर्वस्व, त्यांनां मी कारणावांचून सोडून जात्यें आहे नाहीं का?

"पहा, मंडळी परत फिरली." ते एकदम ह्मणाले, तेव्हां मी भानावर आल्यें. "ठीक, तर तूं जाणार. मीहि उद्यां इथून जाणार."

"काय, ह्मणजे!" मी उद्गारल्यें.

"खरंच उद्यां जाणार. तूंहि नाहीं का जात? मग इथं रहायचं कशाला?"

माझ्या दृष्टीपुढें काळोखी आल्यासारखें झालें व "काय करूं देवा!" करून मी त्यांच्याकडे पहात राहिल्यें.

तूं ठरविलेला विचारच ठीक आहे." ते गंभीरपणानें ह्मणाले; "विधियोजनाच तशी दिसते. तेव्हां ती मंगलकर नव्हे, असं कसं होईल? तेव्हां–आलीच मंडळी जवळ, उद्यां कांहीं मी भेटणार नाहीं. हिमालयांत योगानंद स्वामींच्या आश्रमीं जायला अवश्य ती माहिती मी जाण्यापूर्वीं तुजकडे पाठवून देतों."

श्रीमंत, उषा वगैरे सर्व मंडळी आमच्या पुढ्यांत येऊन थडकली. तेव्हां अधिक कांहीं बोलतां येणें शक्यच राहिलें नाहीं.

"काय बहारीचं स्थान तरी" ह्मणत श्रीमंतांनीं सुधाकरांच्या हातांत हात घातला, व त्यांच्याबरोबर आम्ही पावलें वळवून, मोटार ठेविलेल्या ठिकाणाकडे यायला निघालों.

"आजवर महाबळेश्वरास माझ्या इतक्या खेपा झाल्या; तरी या ब्रह्मारण्यांत कांहीं मी कधीं आलों नव्हतों." श्रीमंत पुढें म्हणाले.

"पण बाई भीति वाटते इथें–भारी." उषा उद्गारली.

"वाघाचंच ठिकाण हें." डॉक्टर धूर सोडीत ह्मणाले. "ब्रह्मारण्यापेक्षां ह्याला 'व्याघ्रारण्य' हें नांव अधिक शोभेल, नाहीं?"

"पण आपल्याला तर नाहींना वाघाचं दर्शन घडलं या वेळेपर्यंत?" सुधाकरांनीं उत्तर दिलें.

सुधाकरांवरून माझी दृष्टी हलेचना. पुनः कधीं बरें हे पाय दिसतील? माझ्या गत जन्माविषयींचें त्यांनां असलेलें ज्ञान मला प्रत्यक्ष करून घेतां यावें, म्हणून हिमालयांत जाऊन योगाभ्यास करण्याची बुद्धि मला कशी बरें झाली? सुधाकरांनीं जेव्हां आपल्या स्वतःच्या योगाभ्यासाविषयीं सांगितलें, तेव्हांच प्रथम माझ्या मनांत योगाभ्यासाचा विचार उदित झाला, नाहीं? त्यांच्याप्रमाणें आपण त्या विद्येंत प्रवीण होऊं कीं नाहीं, ती गोष्ट निराळी. पण त्या विद्येचें अल्पांश तरी ज्ञान आपल्याला व्हावें असें मला तेव्हांच वाटूं लागलें नाहीं का? तदनंतर त्यांच्या मोहनीजालांत मी गुरफटूं लागलें. पण त्यांत पुरी गुरफटून न जाण्याची सावधगिरी मी घेतलेली होती. कारण त्या मोहिनीच्या कार्यकारणसंबंधाविषयीं मी तेव्हां पूर्ण अज्ञानी. पण आतां? आतां त्याविषयीं शंका उरली होती? मुळींच नव्हती. तरी ह्या योगाभ्यासाचा विचार कां बरें निश्चित केला. मी विधवा, लग्नमंत्रांनीं कांहीं कालपर्यंत तरी मला दुसऱ्यांनां वाहिलेली, लोकदृष्टीनें मी दुसऱ्यांची दासी. व इकडे सुधाकरांनीं काल ब्रह्मारण्यांत दाखविलेल्या गतजन्माच्या दृष्टीनें मी–तर सुधाकरांच्या पायाची जन्मजन्मींची दासी. तेव्हां लोकदृष्टि खोटी, हें मला योग दृष्टीनें प्रत्यक्ष पहायला नको का? असे विचारतरंग माझ्या मनांत एकसारखे चालले होते, तों आह्मी मोटारीजवळ आलों व आंत बसून वायुवेगानें बिन्हाडीं येऊन पोंचलों.

बंगल्यासमोर मोटारींतून उतरतांच मी सुधाकरांकडे दृष्टि टाकली, त्यांनीं प्रगाढ गांभीर्यानें मजकडे दृष्टिक्षेप करून "येतों, श्रीमंत." केलें व मोटार हांकली.

"उद्यां जाणार सुधाकर." श्रीमंत बंगल्यांत शिरतांना मजकडे पहात ह्मणाले. "चार दिवस रहाण्याचा मी आग्रह केला, पण काय? जाणारच ह्मणतात सकाळीं."

" सकाळीं," मी आश्चर्यानें विचारलें

" हो, सकाळीं उजडत जाणार इथून. बरं चला भुका लागल्या असतील आतां सगळ्यांनांच. असें ह्मणून त्यांनीं आरामखुर्चीवर अंग टाकलें, व मी आपल्या खोलींत गेल्यें. सुधाकर–सुधाकर–सुधाकर ह्यावांचून मला आतां कांहीं दिसेनासें झालें, ह्यांत नवल काय ?

---

## प्रकरण बारावें

## पत्रिका

आपल्या जीवनाचें अंतिम साध्य काय ? हा प्रश्न आहारनिद्रादि गोष्टी जीवनसर्वस्व मानणाऱ्यांनां हंसूं आणील यांत आश्चर्य नाहीं. एखाद्या व्यक्तीनें जर बहुजन समुदायाच्या प्रवाहाबरोबर आपल्याला वाहूं न देतां 'या अशाश्वताच्या गोंधळांत मी कां पडावें ? माझें वैयक्तिक जीवन हें विश्वजीवनाचा अवश्यक असा घटक कां बरें झालें आहे ? असा प्रश्न केला तर त्या व्यक्तीचें हंसें साहजीकच होईल. विशेषतः विवाहबंधनाच्या बाबतींत असें कोणी करावयाचें मनांत आणील, तर त्याची वेड्याच्या कोटींतच गणना व्हायची. शेंकडा नव्याण्णव विवाह ह्मणजे विषमार्धांचा एकजीव करण्याचा प्रयत्न. तो सफळ व्हावा कसा ? या प्रयत्नापायीं मानवतेंत किती आपत्ति नांदते आहे, याची थोड्यांनांच कल्पना असेल. तुम्ही कांहीं करा, एका जीवाचे दोन अर्ध केव्हांतरी व कोठेंतरी एकत्र होणारच होणार. ते तसे रहावयाचे नाहींत. विषमार्धांचा एकजीव करण्याचा प्रयत्न, समार्धांचें परस्परांसाठीं शोधन, यांनींच कित्येकांचें जीवन दुःखमय झालें आहे; व कित्येकांचें सुखमय झालें आहे. प्रेमापरती समर्थ शक्ति भूतलावर नाहीं वा स्वर्गांतहि नाहीं. त्या शक्तीचा संबंध शरीरापेक्षां आत्म्याशींच अधिक आहे; तसेंच कोणाहि व्यक्तीला तिच्या अन्यार्धाशीं संलग्न होतां आल्यावांचून, आपलें जीवन सफल करतां येणें शक्य नाहीं. हें तत्त्व मानवता शिकेपर्यंत, ती कांहींच शिकली नाहीं, ह्मटलें तरी चालेल.

रात्रौ जेवणानंतर मी खोलीच्या खिडकींत एकटीच बसल्यें असतां, या प्रकारचे विचार माझ्या मनांत चालले होते. काय तरी हा विलक्षण योग, कीं ज्यानें सुधाकरांची व माझी अकल्पित भेट व्हावी ? अनंत काळाचा ज्यांचा माझा परिचय, अनंत काळचें ज्यांच्यावर माझें प्रेम, त्यांची भेट स्वप्नींहि नसतां अशी अचानक व्हावी, हा दैवयोगच नव्हे तर काय ? अध्यात्मविद्याप्रवीणाला या गोष्टीचें आश्चर्य वाटणार नाहीं; पण त्या बाबतींत अनभिज्ञ असणारांनां, जडातीत असें कांहीं असेल अशी ज्यांनां कल्पनाहि नाहीं, अशांनां, याचें सहाजिकच आश्चर्य वाटेल. पण अशांनांसुद्धां असा अनुभव येतो कीं एखादी नवपरिचित व्यक्ति आपण कोठेंतरी पूर्वीं पाहिलेली, कोठेंतरी पूर्ण परिचित असावी, असें वाटूं लागतें. मला प्रश्न पडला तो फक्त सुधाकरांविषयीं नाहीं, तर उषा व डॉक्टर भास्करराव यांविषयींहि. श्रीमंत आप्पासाहेब हे फक्त साखळीचे सुटलेले जुवे एकत्र होण्याला कारण झालेले. त्यांच्याविषयीं प्रश्नच नव्हता. आतां उषेच्या सहवासांत आणखी राहीन, तर तिचा दीर्घकाळचा माझ्याविषयींचा वैराग्नि पुनरुद्भूत नाहीं का होणार ? खात्रीनें होईल. मला याविषयीं शंकाच उरली नव्हती. डॉक्टर भास्कररावांचें तर तो वैराग्नि पेटविण्याचें कर्तव्यच होतें. कारण ते व उषा, ह्मणजे उषेच्या वडिलांची संपत्ति, यांमध्यें मी होत्यें हें त्यांनां पुरें ठाऊक. या कारणाकरितां, मी आतां या मंडळींचा निरोप घ्यावा, असें निश्चित ठरविलें होतें. शिवाय सुधाकरांनीं योगानंदस्वामींजवळ जसा योगाभ्यास केला, तसा आपणहि करून सुधाकर व आपण एका भूमिकेवर यायचें, हें माझ्या मनानें पक्कें घेतलें होतें. तें हातून व्हायला 'शुभस्य शीघ्रं' असें मी कां करूं नये ?

त्या एकांत शांत रात्रीच्या वेळीं बागेकडील खिडकींत मी बसल्यें असतां याप्रमाणें एकामागून एक विचार माझ्या मनांत येत होते. बंगल्यांतील सर्व मंडळी दिवसाच्या दगदगीनें एव्हांना गाढ झोपीं गेली होती. बंगल्याबाहेर हमरस्त्यावरील गाड्यामोटारींची ये, जाहि बंद झाली होती. त्यामुळें त्यावेळची एकांत शांतता अगदीं पूर्ण होती म्हटलें तरी चालेल. चंद्र अस्तास जायला आला होता. त्याचें तें धवल बिंब दुःखी कष्टी मुखश्रीप्रमाणें दिसत होतें. तों समोरून बागेच्या फाटकांतून एकदम एक सायकल आंत आली. सायकलवरील व्यक्ति सुधाकर होत. हें पहातांच मी

खिडकींतून सटकन् मागें झाल्यें. सायकल आली ती थेट खिडकीखालीं थांबली. सुधाकर सस्मित खालीं उतरले.

"सर्व मंडळी झोंपली आणि तूं एकटीच जागी आहेस?" खिडकीचा गज हातीं धरून ते म्हणाले; या चंद्रानं लक्ष वेधलं होतं वाटतं? कीं त्याच्याचसारख्या दुसऱ्या एखाद्या गूढांत रमलं होतं तें?"

"नाहीं" करीत मी पुढें खिडकीजवळ गेल्यें व पुढें काय बोलावें तें न कळून घुटमळल्यें.

"तुझा निरोप घेतल्यावांचून इथून जातांच येणं शक्य नव्हतं मला" ते पुढें म्हणाले: "आणि हें आणलं आहे तुला. त्याच्या साहाय्यानं योगानंदाचा आश्रम सांपडायला पंचाईत नाहीं पडयाची तुला."

असें म्हणून बंद केलेला लखोटा त्यांनीं माझ्या हातीं दिला. मी तो मुकट घेतला.

"मी योगानंदांनां लिहिणार आहेच पत्र, तुझ्या संबंधानें. योगविद्या किती तापदायक आहे, हें तुला प्रत्यक्ष अनुभवानंच कळेल आतां. पण तो ताप शक्य तितका हलका व्हावा हें पाहिलं पाहिजे मला."

"तें का?" मी एकदम उसळून म्हणाल्यें. "आपल्याला जितका ताप सोसावा लागला, तितका मी सोशीन, आपल्यायोग्य व्हायला मला–मला पुढें बोलवेना. त्यांच्याकडे मी पहात राहिलें, ते स्मित करूं लागले.

"एकूण—" ते म्हणाले "आपल्या गतबंधनाची स्मृति तुला होऊं लागली आहे तर?"

मी यावर काय बोलणार? खिडकीचा गज धरलेल्या त्यांच्या हातावर मी आपला हात ठेवला. त्या स्निग्ध-धवल चंद्रिकेंत सर्व दृश्य स्वप्नवत्–उच्च–दिसूं लागलें. क्षणभर माझें अस्तित्वहि मी विसरून गेल्यासारखी झाल्यें. इतकी दुसऱ्या कोणत्या तरी शक्तीनें मजहून बलवत्तर अशा शक्तीनें मी जिंकून गेल्याप्रमाणें झालें.

"पहा," ते सौम्यपणें पुढें म्हणाले. "या रात्रीच्या शांत एकांत काळीं आपण दोघंच एकत्र आहोंत. पूर्ण जागृतीच्या कांठावर आपण उभीं आहोंत, तरी जागं व्हावयाचंच नाहीं, असा आपला निश्चय झाल्यासारखा दिसतो. असं कित्येकांचं तरी होत असतं, प्रत्येक क्षणीं, प्रत्येक ठिकाणीं, आत्मदास्यांत कुजत पडलेले जीव, स्वेच्छेनें स्वातंत्र्याला मुकलेले जीव आढळून येत असतात."

त्यांनीं आपली दृष्टि वर मजकडे केली. त्यावेळीं मला झालें कीं सर्व शंका, सर्व संकोच झुगारून द्यावा, योग विद्या शिकून प्रत्यक्ष ज्ञान करून घेण्याचा विचार फुंकून टाकावा, आणि सुदैवानें पुढें केलेलें सौख्य, सुदैवानें पुढें केलेला तो प्रेमनिधि आपलासा करावा. पण कांहीं तरी मला मागें ओढितच होतें. नुसतें मागेंच ओढून राहात नव्हतें, तर ओढून दूर–दूर नेत होतें. 'तूं अद्याप या सौख्यनिधीला–या प्रेमनिधीला अपात्र आहेस. पात्र करून घे.' असें हृदयाच्या हृदयांत कांहीं तरी मला सांगत होतें, तरी माझी या वेळची स्वाभाविक मनोवृत्ति वाणींत उतरलीच.

"सुधाकर—" मी पटकन् म्हटलें व माझी मलाच लाज वाटून गप्प झाल्यें.

"बोल–बोल. लाजूं नको!" ते सकंप स्वरानं म्हणाले, "माझं नांव मला इतकं गोड कधींच वाटलं नव्हतं. काय बोलणार होतीस तूं, तें बोलून टाक कशी."

"कांहीं नाहीं गडे," झालेली चुकी सुधारून घेण्याच्या हेतूनें मी म्हटलें. "विशेषसं कांहीं नाहीं. पण एक गोष्ट मात्र विसरायची नाहीं कशी."

"ती कोणती?" उत्सुकतेनें त्यांनीं प्रश्न केला.

"हीच, कीं हिमालयांत जाऊन योगाभ्यास करण्याचं मी जें योजिलं आहे, तें केवळ दुराग्रहानं किंवा आपल्याविषयींच्या अविश्वासानं नव्हे. तसंच दुसरंहि एक लक्षांत बाळगायचं, कीं आपण जर अनंत काळाचे सहचर आहोंत, तर आपला हा वियोग फारतर अल्पकाळचाच, तेव्हां जड नाहीं तितका. शिवाय त्या अल्प वियोगानं मला आपले गतजन्म प्रत्यक्ष पाहतां येऊन, केवढातरी आत्मविश्वास मजमध्यें येईल, तें पहावं गडे."

"आत्मविश्वास!" ते उद्गारले; "तो तुझ्यामध्यें आज नाहीं? त्रिकालाबाधित सत्याविषयीं अमर आत्म्याविषयीं जितका आत्मविश्वास असायचा, तितका आपल्या गतबंधनाविषयीं तुला आहे, नाहीं का? दुसरं कसं, कीं आपला हा चालू वियोग आधींच केवढा दीर्घकाळाचा आहे, याची कल्पना आहे तुला?"

स्मित करून मी मान हलविली.

"पण तें मी तुला नाहीं सांगत. तें ऐकून तूं घाबरून जाशील. मात्र इतकं लक्षांत ठेव, कीं हा आपला शेवटचाच दीर्घकालीन वियोग होय. निदान तसा व्हावा असा मी आटोकाट प्रयत्न करणार."

"आपल्या हातचं आहे तें?" मी कांहींसें कौतुकानें विचारिलें.

"अर्थात्, प्रयत्नाला काय अशक्य आहे? मी तुजहून बलवत्तर नाहीं का? बलवंत लोक विजयी ह्यांत आश्चर्य वाटण्यासारखं तें काय आहे? तुझी दृष्टि आश्चर्यचकीत झालेली दिसते आहे. पण तिच्यांत प्रेमचंद्रिकाच चमकते आहे. आरक्त क्रोधछटा नाहीं दिसत. गतजन्मीं मला ती कितीदातरी क्रोधपूर्ण अशी दिसलेली आहे. कितीदातरी माझं अंतरंग तिनं होरपळून सोडलं आहे. पण तेव्हां तूं मजहून बलवत्तर होतीस. आज मी तुजहून बलवत्तर झालेलों आहे, नाहीं?"

"नाहीं." मी ठांसून उत्तर केलें, व आपला हात त्यांच्या हातांतून ओढून घेतला: "मी हार नाहीं खायची. आपल्या गतजन्माचं माझं मला प्रत्यक्ष ज्ञान होईतोंपर्यंत मी प्रत्यक्ष स्वर्गसुख सुद्धां तुच्छ समजत्यें."

सुधाकरांच्या मुखचंद्रावर क्षणभर कृष्णछटा आलेली दिसली.

"परमात्म्याविषयींहि अज्ञ जग नेहमीं असंच म्हणत असतं. "त्याच्या अस्तित्वाचं प्रत्यक्ष ज्ञान झाल्याविना मी तें कबूल करणार नाहीं.' पण वस्तुतः त्याच्या सहस्रकरांत हें बापडं जग ओल्या मातीच्या गोळ्यासारखं रुळतं आहे, हें त्या बापड्याला कुठं कळत असतं!"

मी निरुत्तर झालें. क्षणभर दोघेंहि निःशब्द राहिलों. नंतर "ठीक, येतों आतां" सुधाकर गंभीरपणें म्हणाले.

मला शब्दच उमटेना. खिडकीच्या गजावर असलेल्या त्यांच्या हाताला मी स्पर्श करून मागें सरलें.

सुधाकरांचे नेत्र सतेज झाले. ते मजकडे सस्मित पाहूं लागले.

"हा मी कृपाप्रसाद समजतों. सध्यां एवढ्यानंच धन्य झालों मी. मार्गप्रतीक्षेत मी इतका काळ कंठला आहे, कीं आणखी कांहीं काळ म्हणजे कांहींच नाहींसं समजतों मी."

असें म्हणून ते सायकलवर चढले; व दुसऱ्याच क्षणीं दृष्टिआड झाले. चंद्रहि त्याच वेळीं अस्तंगत झाला.

त्यापुढें मी तशीच खिडकीशीं किती वेळ उभी होत्यें, माझें मला ठाऊक नाहीं. भानावर आल्यें तेव्हां डोळे पुसले व खिडकी बंद करून, दिव्याशीं बसल्यें; व सुधाकरांनीं दिलेलें पत्र फोडून वाचूं लागल्यें. तें पत्र असें:—

प्रियतमे—

या नांवानें तुला संबोधितों आहे, तो नव्यानें नाहीं. अनंत काळांतून याच नांवानें मी तुला संबोधित आलों आहे. ध्वनीला प्रतिध्वनि जितका परिचित, तितकें तुला हें नांव परिचितसें असलें पाहिजे. तूं व मी एकरूप आहोंत व एकरूप असलोंच पाहिजे; मात्र आपण विधिघटनेशीं व्यर्थ झगडत राहून परस्परांपासून विमुक्त होण्याचा अविचार करीत आलों आहों. या गोष्टीचें तुझ्या अंतरात्म्यानें तुला ब्रह्मारण्यांत दिलेलें प्रत्यंतर तूं खरें मानीत नाहींस. आपली प्रथम दृष्टादृष्ट झाली, तेव्हांच आपले जीव एका जीवाचे दोन अर्ध एकामेकांकडे ओढले गेले, या गोष्टीला तर तूं किंमत देत नाहींस. तूं पुण्याहून निघालीस, त्या दिवसाच्या आदल्या रात्रीं तुजमध्यें जो अननुभूत आनंदसंचार झाला, तेथपासून स्वप्नांतून, या घटकेपर्यंत मी तुझा सहचर आहें, यावर तुझा विश्वास बसत नाहीं. या सर्व गोष्टींचें तुला प्रत्यक्ष ज्ञान व्हायला हवें म्हणतेस. ठीक आहे. विधियोजनेवर माझी पूर्ण श्रद्धा आहे. त्या योजनेनेंच तूं योगाभ्यासाच्या खडतर तपश्चर्येतून मजकडे येशील याविषयीं मला शंका नाहीं. पण तुला याविषयीं शंका आहे. ती फेडून घे. 'माझं तुजवर प्रेम आहे' हें म्हणण्याइतका मी मूर्ख नाहीं. कारण तूं माझी आहेस. माझी झालीच पाहिजेस, हें निश्चित. मग ती आज होवोस, वा कालांतरानें होवोस. तूं मजप्रमाणेंच अमर आहेस. चिरयौवनसंपन्न आहेस आणि ज्या परमात्मशक्तीनें आपणास जीवन व प्रेम दिलें आहे, ती अविनाशी आहे. तेव्हां आपलें लग्न झाल्यानंतर आपणास लाभणाऱ्या सौख्यास अंत नाहीं, हें खास. अधिक काय लिहूं? योगानंद स्वामींच्या आश्रमांत तुला जें ज्ञान प्राप्त होईल, त्यानें तुला व मला हितकर काय, तें तुला कळेलच. तो मंगलधाम प्रभु तुझें मंगल करो. तुझा,

**सुधाकर**

पत्रांतून एक घडी घातलेला कागद खालीं पडला. त्यांत हिमालयांतील योगानंदांच्या आश्रमाचा मार्ग सविस्तर रेखाटलेला होता. प्रवास जितक्या लांबवरचा व दगदगीचा असेलसें मला वाटलें होतें तितका तो नाहीं, हें या टांचणावरून मला दिसून आलें. मी

लागलीच महाबळेश्वर सोडण्याच्या तयारीलाहि लागल्यें. पण ट्रंक भरतां भरतांच झोपेनें मला असें कांहीं घेरलें, कीं अंथरुणावर जाऊन पडण्यावांचून गत्यंतर राहिलें नाहीं. आपण करतों आहों, तें यथायोग्य करतों आहों, आपल्या बऱ्याकरतांच करतों आहों, खरा विधिसंकल्प काय आहे, तो कळवून घेण्याकरितांच करतों आहों, याविषयीं माझें मन निःशंक होतें. या बाबतींत आपल्याला कोणीं दूषणें दिलीं, तर काय करावयाचें. मी हा आपला जीवनवृत्तांत सांगत्यें आहे, याबद्दलहि मला कोणीं दूषणें देणार नाहीं ह्मणून कशावरून? तरीपण मी तो सांगण्याचें ठरविलें आहे, नाहीं का? त्याचप्रमाणें मी करावयाचें योजिलें, तें करावयाचेंच. कोणी कांहींहि ह्मणो. अशा निःशंक वृत्तींत मी झोपीं गेल्यें.

सकाळीं उठल्यें, तेव्हां सुधाकर रात्रींच निघून गेले, हें मला कोणी कळविण्याचें कारणच उरलें नव्हतें. एक प्रकारची शून्यता मला पावलोपावलीं जाणवूं लागली. खिडकींतून बाहेर पहातां, येरव्हीं मनोहर अशी वाटणारी सृष्टिशोभा नीरस–शुष्क–दिसूं लागली. हें महाबळेश्वर आतां केव्हां सोडीनसें मला होऊन गेलें. आप्पासाहेबांनां मी असें म्हटलें तेव्हां डॉक्टर जवळ होते.

" महाबळेश्वराची शोभा सुधाकरांबरोबर निघून गेली. अर्थात् तुमच्या एकट्यांच्याच दृष्टीनं," असें आंतल्याआंत आनंद वाटून ते उद्गारले. " आतां, सुधाकर ह्मणजे एक विलक्षण व्यक्ति आहे, यांत कांहीं शंका नाहीं. पण आपल्याला नाहीं वाटत कौतुक करावं अशा व्यक्तीचं असं." कपाळाला आठ्या घालून सिगारेट पेटवीत ते पुढें म्हणाले.

श्रीमंत इतका वेळ निमूट एकत होते.

" अहो, कारण उघडच आहे त्याचं," ते एकदम म्हणाले; " त्यांच्या आणि तुमच्या मतांत अंतर उत्तर दक्षिण ध्रुवाइतकं. माझीं मतेंहि त्यांच्याशीं थोडीच जुळताहेत? पण म्हटलं जुना स्नेह माझा आणि त्यांचा. नि शिवाय, 'तीन महिन्यांत तुमची प्रकृति साफ करतों मी' असं मला म्हणाले ते. तेव्हां–"

" मग करूं द्यायची होती किनई?" डॉक्टरनीं धूर सोडीत मध्येंच प्रश्न केला. "पाश्चात्य वैद्यकानं असाध्य ठरविलेला रोग जर त्यांनीं साध्य केला तर मग ते जादूगारच म्हणायचे. आणि अशांनां आपली जादू चालवायला वाव देण्याकरितां मी आपली रजा घ्यायलाहि माघार घेणार नाहीं, आपण म्हणाल त्यावेळीं."

" खरंच कीं काय?" श्रीमंतांनीं स्मित करून विचारिलें; "पण मी रजा घेऊं देईन असं वाटतं तुम्हाला? असल्या जादूगारांच्या जादूवर माझी नाहीं श्रद्धा बसायची कांहीं–कांहीं केल्या. नि सुधाकरांचं मी एवढं कौतुक केलं, तें त्यांच्या ठिकाणीं हें असलं सामर्थ्य आहे, असं समजून नव्हेच मुळीं. त्यांच्या शरीरसंपत्तीचं मात्र मला कौतुक वाटून राहिलं आहे मोठं. कौतुकच का? गूढ प्रमेयच वाटतं आहे मला तें एक. पण तें प्रमेय सुटणार कशानं?"

" विशी पंचविशीचे दिसतात ते–खरे." डॉक्टर ह्मणाले: " आणि तितकंच वय असावं त्यांचं खास."

" ह्मणतां काय डॉक्टर?" श्रीमंतानीं तिरस्कारार्थी हांसून विचारलें. " अहो त्यांचं वय पंचेचाळिसाहून कमी असेल तर बोलायलाच नको. हें तर गूढ मी ह्मणतों तें. इतक्या वयाचं चिन्ह दिसतं आहे का कांहीं त्यांच्या चर्येवर?"

" आपले सहाध्यायी सुधाकर ते दुसरेच असावेत. मी परवां सुचवलंच होतं असं आपल्याला." डॉक्टरांनीं उत्तर केलें: " हे त्यांचे धाकटे बंधु वा असेच कोणी जवळचे नातेवाईक असावेत. आणि आपल्याला फसवीत असावेत. दुसरा कांहीं नाहीं ह्या गूढाचा उलगडा."

" तें संभवनीयच नाहीं मुळीं," श्रीमंतांनीं उत्तर केलें; " लहान तीन चार वर्षांचे असतांना सुधाकरांनां जिन्यावरून पडून हनुवटीला खोक पडली होती तिची खूण-आडवी रेषा कॉलेजांत असतांना मी पाहिली होती, तशीच परवां पाहिली. आतां आहे कांहीं बोलणं ह्यावर उरलेलं? तसंच कॉलेजांत असतां, त्यांनां योग, समाधि आदि गूढ विद्यांचा नाद होता, हें मला चांगलं ठाऊक होतं; ह्मणूनच काल त्यांनीं तुह्माला आपल्या खिशांतून ती आंगठी बाहेर काढायला लावली त्याचं मला आश्चर्य वाटलं नाहीं. ती आंगठी शेकडों वर्षांपूर्वींहि तुमचीच होती. तेव्हां तुह्मी आजच्याहून अगदीं भिन्न व ऊंच अशी व्यक्ति होतां, असंहि त्यांनीं मला सांगितलं."

डॉक्टरनां हास्यवायूचा झटका आला, कीं काय असें मला झालें, इतके ते खिदळूं लागले.

"कादंबऱ्यांचे शौकी असावेत हे सुधाकर. एरव्हीं नाहीं अशी कल्पना सुचायची. आंगठीचा हा पूर्वेतिहास रोजनिशींत तरी लिहून ठेवायला हवा मला–ठेवलाच पाहिजे लिहून हा."

"ठेवणारच असलां–" श्रीमंत म्हणाले, "तर असं लिहून ठेवा त्यांत, कीं सोळाव्या शतकाच्या आरंभीं सुधाकरांच्या म्हणण्याप्रमाणं तुह्मी एक रजपूत राजे होतां व एका तरुणाला तुम्ही जंबियानं ठार केलंत, त्या प्रसंगीं ती आंगठी तुमच्या हातीं होती, तेव्हां-पासून ती तशीच पडून होती, ती आतां पुनः तुमच्या जवळ आली आहे."

"कोण–कोण ह्मणतं असं आप्पा?"

हे तारस्वर ऐकून आम्ही दिवाणखान्याच्या आंतल्या दरवाजाकडे पहावयाला लागलों. तों उषा रागानें लाल झालेली व थरथर कांपत असलेली दरवाजांत दिसून आली, तिचे डोळे कावऱ्याबावऱ्यासारखे दिसत होते.

डॉ. भास्करराव तात्काळ उठून तिजजवळ गेले. "तुम्ही पडून असा, म्हणून सांगितलें होतं नाहीं का मी?—"

"काय—झालं काय ग उषे." श्रीमंतांनीं विचारलें. "सुधाकरांनीं सांगितलेली ती आंगठीची कल्पित कथा सांगत होतों ह्यांनां."

"कल्पित नाहीं बरं ती आप्पा." उषा ओरडून म्हणाली; "शब्द नि शब्द खरी आहे ती. सगळा आठवतो आहे प्रकार मला तो. त्या शिवकरणला जगांतून नाहींसा करावयाचा बेत आम्ही दोघांनीं मिळून केला. यांनीं व मी"—असें म्हणत तिनें डॉक्टरकडे बोट केलें. "तो आणि ती—कमल—प्रेमबद्ध असल्याचं मी यांनां सांगितलं.—ती माझ्या डोळ्यांत सलत असे. कारण, तुमचं लक्ष तिनं वेधलं आहे, असं मला वाटत होतं." हे शब्द तिनें डॉक्टरांस उद्देशून उच्चारले. "होच! तुमचं मन तिच्यावर बसतं आहे असं मला वाटतं. पण तिचं चित्त जडलं होतं त्या शिवकरणावर!" उषा एकदम थांबली. तिच्या सर्वांगांत तीव्रतर कंप संचार झाल्याचें दिसून आलें. "एकूण सुधाकर गेले इथून. आतां तो सारा प्रकार विसरून जाऊं आपण छे ग बाई! तो प्रकार कसा विसरेन मी आतां. मध्यंतरीं विसरल्यें होत्यें खरी. पण आतां! आतां त्याची आठवण कांपरं भरविते आहे मला सारखी!" असें म्हणत ती धाडकन् जमिनीवर मूर्छित पडली. आम्ही तिजजवळ धांवत गेलों, तों तिनें डोळे पांढरे केले. एकच हलकल्लोळ झाला उषेला उचलून खोलींत पलंगावर निजविली व डॉक्टर तिच्या शुश्रूषेस लागले. थोड्या वेळानें श्रीमंत मला एकीकडे दिवाणखान्यांत नेऊन विचारतात, "गीते, या सगळ्या प्रकारचा अर्थ काय?"

"हा साधा हिस्टिरिआ आहे. उषेच्या प्रकृतीची काळजी नको करायला. असं डॉक्टर ह्मणताहेत. पण हा शिवकरण कोण? ही कमल कोण? ही आहे तरी काय कादंबरी?"

मी शून्य दृष्टीनें दूर पाहूं लागल्यें. "काय बाई गौंडबंगाल आहे, देव जाणे. कदाचित् सुधाकरांनीं सांगितलेल्या त्या आंगठीच्या पूर्वेतिहासाचा तिच्या मनावर असा परिणाम झाला असेल. शिवाय," इथें मी थोडी घुटमळल्यें. "ह्या महाबळेश्वरचा इतक्यांतच वीट आल्याचंहि ती ह्मणत होती. एकूण हा सगळा नाजुक प्रकृतिमानाचा आणि चित्तवृत्तीचा परिणाम आहे. दुसरं काय?"

काय, एखाद्याचा आपण वध करायच ठरविलं, नि तेंहि शेंकडों वर्षांपूर्वीं अशी स्वतःची समजूत होण्याइतका—नाजुक प्रकृतीवर वा चित्तवृत्तिवर–दुसऱ्यांनीं सांगितलेल्या गोष्टीचा परिणाम होईल? असा परिणाम होत असल्याचं मी तरी नाहीं कुठं वाचलेलं अथवा ऐकलेलं."

मी यावर कांहींच बोललें नाहीं.

"उद्यां माथेरानला बंगला मिळतो का पहायला रामभाऊला कळवीन म्हणतों. एकदम माथेरानला जावसं वाटतं आतां. या इथं कसंसंच वाटायला लागलं आहे मलाहि. बरं नाहीं वाटत रहाणं इथं, इतउत्तर."

"तें कां?" मी विचारलं. "कां तें नाहीं सांगतां येत. पण असं उदासवाणं वाटायला लागलं आहे आतां इथं."

आपलाहि जाण्याचा बेत श्रीमंतांनां आतां कळवावा, असें वाटून ती गोष्ट मी त्यांच्याजवळ काढली.

"ठीक." ते म्हणाले; "पण तिकडून महाडाकडून बोटीनं जायचं कां योजलं आहेस? आम्ही माथेरानला जाणार म्हणतों, तेव्हां आमच्याबरोबरच वाईकडून पुण्यास चल ना? मग पुढें आम्ही माथेरानला जाऊं आपले."

यावर काय उत्तर यावें मला कांहीं कळेना.

"त्याचं कारण असं आप्पासाहेब, कीं आपला माथेरानचा बेत कांहीं निश्चित झालेला नाहीं. तो होईल, न होईल कसं सांगवेल ? तेव्हां, तेथपर्यंत कांहीं मला रहावत नाहीं आतां इथं. महाडमार्गानं जायचं म्हणत्यें, याचं कारण दुसरं कांहीं नाहीं; तो प्रदेश कधीं पाहिलेला नाहीं, तो अनायासें पाहिलासा होईल. तेव्हां उद्यां इथून निघायचं म्हणत्यें. मी इथून गेल्यें, कीं उषेला बरं वाटूं लागेल खास त्यानं–"

"म्हणजे !" श्रीमंत उद्गारले: "तुझ्या जाण्याचा नि उषेच्या दुखण्याचा काय संबंध? तिचा आग्रह म्हणून तर तूं इथं आलीस, नाहीं का ?"

"तिला तेव्हां वाटलं, माझा सहवास सुखाचा होईल म्हणून. पण–पण तिचा समज चुकीचा ठरला आतां." मी स्मित करून म्हटलें; "माझ्यामुळं आपणा सर्वांनांच कससंच वाटायला लागलं आहे हें माझं दुर्दैव. दुसरं काय ? याहून अधिक न होतां, मी जावं तेंच बरं."

"अधिक तें काय ?" श्रीमंतांनीं साश्चर्य विचारलें.

"उषेचं नि माझं भांडण," मी हांसत हांसत उत्तर केलें. "तसंहि नाहीं होणारसं कुणी म्हणावं ? डॉक्टरसाहेबांचं तर म्हणणं, सुधाकरांचा सहवास उषेला जितका अनिष्ट, तितकाच माझाहि. माझ्या सहवासानं तिला अपाय होतो, असा त्यांचा कटाक्ष. त्यांनां मात्र माझ्या सहवासानं अपाय होत असावा, हें खचित."

श्रीमंत क्षणभर विचारमग्न झालेले दिसले.

"मोकळेपणानं सांग मला गीते. डॉक्टरांच्या कोणत्या अवगुणामुळं तुला त्यांच्याबद्दल हें असं विपरीत वाटायला लागलं आहे ? नीट कळूं दे मला सारं."

"स्पष्ट बोलल्यें मी, तर राग नाहींना येणार आपल्याला ?" मी विचारलें.

"मुळींच नाहीं." त्यांनीं उत्तर केलें: "तुला डॉक्टरांविषयीं काय वाटतं, तें सर्व सांग मला. मी तें लक्षांत ठेवीन आणि खरं कितपत तें अनुभवानं ठरवीन."

"खरं बोलायचं म्हणजे व्यवहारांत दिसणाऱ्या कोट्यावधि स्वार्थसाधूंहून डॉक्टर कांहीं निराळे आहेत, असं मला वाटत नाहीं. आपल्या धंद्यांतहि ते चोख नाहीं दिसत; कारण आपल्याला बरे करण्याचा प्रयत्नच नाहीं करीत ते काडीचा, आणि उषेच्या तर नखांत रोग नसतां, आहे असा भासविताहेत ते. तिच्या नाजुक चित्तवृत्तीवर परिणाम घडवून त्यांनीं तिची प्रकृतीहि अशी नाजूक करून ठेविली आहे. यांत त्यांचा हेतु उघडच दिसतो आहे. आपण लवकरच तिला अंतरावेत, नि मग त्यांनीं तिला आपली अर्धांगी करून आपल्या दौलतीचं धनी व्हावं, याहून दुसरा काय हेतु असणार त्यांचा ? आपल्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत कांहीं उषेला एकाद्या जहागीरदारावांचून कोणाला देणार नाहीं, हें डॉक्टरांनां कां कळत नाहीं ? तेव्हां त्यांनीं टाकलेला डाव खेळण्यावांचून गत्यंतर आहे त्यांनां ? हें आपल्या लक्षांत कसं येत नाहीं, आश्चर्य वाटतं मला. डॉक्टरांबद्दल माझं प्रतिकूल मत होण्याचं हें एक कारण. दुसरं कारण याहून खोल आहे; आध्यात्मिक आहे तें. माझ्या–माझ्या–गतजन्माशीं त्यांचा संबंध असावा, असं वाटतं मला. इतका त्यांच्या-विषयीं मला एक प्रकारें–माझा मला नकळत–दीर्घद्वेष वाटतो आहे त्यांनां प्रथम इथं पाहिलं तेव्हांपासून."

श्रीमंत हें सर्व निमूटपणें ऐकत होते.

"ठीक," कांहीं वेळ थांबून ते ह्मणाले; "डॉक्ट-रांच्यावर इतउत्तर मी विशेष लक्ष ठेवीन, तूं म्हणतेस तें खरंहि असण्याचा संभव आहे; नाहीं ह्मणून कसं म्हणतां येईल ? पण सध्यां तरी तें असंभवनीय, असं मला वाटतं आहे. माझा रोग असाध्य आहे हें मला कळून चुकलेलें आहे; आणि डॉक्टर त्या कामीं शक्य तितकं करताहेत. त्याहून अधिक कांहीं करतां येणं शक्य आहे, असं मला तर नाहीं वाटत. तुझ्या संबं-धानं एक गोष्ट बोलावीशी वाटते ती इतकीच कीं वैधव्याच्या आगींतून तूं सुटून पुनः संसारांत पडावीस असं मला कां नाहीं वाटणार ? पण या—या सुधाक-रांच्या पाशांत मात्र तूं सांपडणं, म्हणजे थोडं फार धोक्याचंच, असं मला बुद्धिपुरसर वाटतं आहे. काय विचित्र यांच्या कल्पना ! काय चमत्कारिक त्याचे विचार ! पूर्वजन्म–पूर्वजन्म असल्या कल्पना आतां या सुधारलेल्या विचारयुगांत कोणाचंहि हांसू केल्या-वांचून राहतील ? आपल्या दृष्टीच्या पलीकडे, आपल्या पंचेंद्रियांनां अगोचर असं कांहीं असणं शक्य तरी आहे का ? एकच गोष्ट निश्चित कीं आपण जन्ममृत्यु-बद्ध आहों, पण तें कां ? हें का कधीं कळणं शक्य आहे ? तेव्हां जन्म आणि मृत्यु यांच्या मध्यंतरीचा काळ जें हें आपलं जीवन तें शक्य तितक्या सुखानं

घालविणं इतकंच आपलं कर्तव्य. दुसरं कांहीं नाहीं. तुझ्या मनांत ही गोष्ट बिंबेल तर किती बरं होईल ?"

"माझ्या मनांत ही गोष्ट बिंबली, तर मी या बॉम्बे-पॉइंटवरून खालीं उडी घेऊन इथंच मुक्तिलाभ करून घेईन. कारण आपलं ह्मणणं खरं धरलं, तर मग जीवनाचा उपयोग तो काय ?"

श्रीमंत घुटमळले. "तें खरं पण–पण वस्तुस्थिति ही अशी आहे. ती स्वीकारणं केव्हांहि चांगलं. ज्याचं प्रत्यक्ष ज्ञान नाहीं, त्याच्या पाठी लागण्यापेक्षां, आहे त्या वस्तुस्थितीला मान वाकविणं हेंच शहाणपणाचं. इथें श्रीमंतांचें लक्ष रामभाऊ अंगावरून गेले, त्यांच्याकडे गेले, व ते दोघे बोलत बोलत आंत निघून गेले. मी मग तडक आपल्या खोलींत जाऊन प्रयाणाच्या तयारीला लागलें, हें सांगायला नकोच.

दोन प्रहरच्या जेवणानंतर मी उषेजवळ जाऊन बसल्यें. तिची दृष्टि अद्याप निवळली नव्हती; मला पाहतांच तिच्यांत एक प्रकारची चमक आलेली दिसली.

"तूं उद्या खरंच जाणार काय ग ? " तिनें विचारलें; "माझ्यावर रागावून तर नाहींना जात तूं गीते ? "

"रागावून नाहीं ग. तुझ्यावर रागवायला तूं काय केलं आहेस माझं . "

"आप्पांनां कसंच वाटतं आहे ग, तूं जाते आहेस हें पाहून.—ते ह्मणतात माझ्यामुळेंच तूं जात असावीस. पण मी काय बरं केलं आहे गीते तुझं ?"

"कांहीं नाहीं ग !—उलटे उपकारच झाले आहेत मजवर तुझे. तुला कल्पना होणार नाहीं, इतके माझ्यावर तुझे उपकार झालेले आहेत हो उषे."

माझा हात तिनें आपल्या दोन हातांत घेतला व प्रेमानें ती मजकडे पाहूं लागली.

"तूं आतां जाणार, नि केव्हां भेटशील ग मला आतां ? मला तर वाटतं, कीं आपली भेट आतां नाहींच होत. कां वाटतं, नाहीं सांगतां येत. पण असं वाटतं खरं गीते मला. ढीग भेटायचं ह्मटलं तरी भेटी होत नाहींत, अशीं उदाहरणं आपण पहात नाहीं का ? कांहीं कार्य व्हायचं असतं, तिथवर सहवास टिकतो; तें झालं कीं सहवास तुटतो. असंच नाहीं का ह्मणायचं? शिवाय, तुझे विचार निराळे, वृत्ति निराळी. मला कल्पनातीत अशा गोष्टीवर तुझी श्रद्धा, पुनर्जन्मावर तुझी श्रद्धा, पूर्वजन्मावर तुझी श्रद्धा."

"आणि तुझी नाहींसं वाटतं तुला ?" मी विचारलें. थोडा वेळ ती विचारांत पडली; आणि ह्मणाली.

"असल्या गोष्टींवर मला श्रद्धा ठेवायचीच नाहीं. विचारच मुळीं करायचा नाही मला असल्या गोष्टींचा. माणसाला जर पूर्वजन्म असेल तर-किती भयंकर ग."

"का बरं, भयंकर का उषे ?"

"मला नाहीं सांगतां येत तें. पण वाटतं खरं असं पण तें राहो. तूं आतां जाणारच ह्मणत्येस उद्यां. तूं कुठं तरी दूर–दूर–फार दूर जाते आहेस, असं वाटतं आहे मला. तसंच कुठल्यातरी उच्च—उच्च—अशा वातावरणांत तूं जाणार असं वाटतं आहे मला. पण तूं अशी उच्च कोटींत जाणार ह्याचं वाईट नाहीं वाटत मला हो गीते ! कारण मला नाहीं जावसं वाटत तिथं. आहे त्या स्थितींत सुखाचे दिवस गेले कीं मिळवलं; ह्याहून उंच नाहीं माझी उडी."

"बहुतेकांची इतकीच उडी असते नाहीं का?"

"खरंच, पण त्याचाहि कंटाळा येतो. ते सुधाकर," मला नकळत मी लाजल्यासारखी झाल्यें.

"हो काय त्यांचं ?" मी तिला विचारिलें. "

"ते सुधाकर मात्र चिरंजीव असं वाटतात मला–खरे चिरंजीव. या नश्वरावरहि त्यांचं स्वामित्व चालतसं दिसतं अगदीं. मला त्यांची फार भीति वाटते बघ गीते. त्यांचा तो विजेचा बंगला गेल्याचं पाहून किती बरं वाटायला लागलं आहे मला आज. पण तुला वाईट वाटत असेल नाहीं गीते ?"

"खरंच वाटतं आहे वाईट मला," मी शांतपणें उत्तर केलें; "किती सभ्य, किती प्रेमळ आहेत ते, त्यांची भीति ती कां करावी? डॉक्टरांच्या आंगठीचा त्यांनीं पूर्वेतिहास सांगितला तसा सांगणारे कितीतरी विचार–वाचक आहेत जगांत. त्यांनींहि तशीच ती डॉक्टरांच्या खिशांतून बाहेर काढली असती, नि तिचा सर्व इतिहास सांगितला असता असाच."

"नको त्या गोष्टी बोलूं. " दीन मुद्रेनें उषा ह्मणाली; "मला कसंसंच होतं, जिवांत कालवायला लागतं, त्या गोष्टींची आठवण झाली कीं, जाऊं दे तें.—पण ते—सुधाकर तुला भेटणार असतील तूं इथून गेल्यावर–नाहीं ? "

काय उत्तर द्यावें तें मला कळेना.

"कांहीं सांगवत नाहीं तें उषे' " मी शेवटीं ह्मणाल्यें. "तुमचा ओढा दिसतो परस्परांकडे. तुमचे विचारहि

जुळतात पुष्कळ अंशीं. मला मात्र ते चमत्कारिक वाटतात विचार–अगदीं खुळचट वाटतात."

" का ग ?" मी विचारलें; " देव प्रेममय आहे, दयासिंधु आहे, न्यायपर आहे, असं वाटतं आह्मांला ह्मणून? मृत्यूकरितां त्यानं जीवन निर्माण केलं नाहीं, असं आम्ही मानतों ह्मणून ? विनाश हा कशालाच नाहीं, मनांत येणाऱ्या कल्पनातरंगाला दिखील विनाश नाहीं, असं आह्मी समजतों ह्मणून ? प्रत्येक कर्माचा-सत्कर्माचा तसाच असत्कर्माचा–मोबदला हा मिळालाच पाहिजे, असं आम्ही लेखतों ह्मणून ? हे विचार खुळचट वाटतात तुला उषे ? खरंच वाटतात का ग ?"

उषा बावरल्यासारखी झाली.

" उषे ! खरंच वाटतात हे विचार तुला खुळेसे ?" मी तिच्या तोंडावर हात फिरवून ह्मटलें.

" तुझ्यासारखं मला वाटतं तर किती बरं होतं ग." तिनं करुण स्वरानं उत्तर केलं. " तुझ्या या श्रद्धेनं तुला किती तरी सुख वाटत असेल जग तुझ्या दृष्टीला किती सुंदर, किती आनंदमय दिसत असेल? नि प्रत्यक्ष मरणसुद्धां अशा मनःस्थितींत केवळ संक्रमण असं कां नाहीं वाटणार ? पण तुझे हे विचार किती जणांनां पटतील आजकाल? तुला वेड्यांत काढणारेच बहुतेक सांपडतील आजकालच्या सुशिक्षित लोकांत. "

" त्याला काय करायचं? माझ्या विचारांवर माझी श्रद्धा असल्यावर मला त्यांच्या मताशीं काय करायचं ?"

यावर ती कांहीं बोलली नाहीं. विचारांत मग्न झालेली दिसली. अशा स्थितींतच हिचा निरोप घ्यावा असें योजून मग मी औपचारिकापलीकडे दुसरें कांहीं न बोलतां तिचा निरोप घेतला.

बाकीचा तो सारा दिवस श्रीमंतांशीं गप्पागोष्टी करण्यांत गेला. सर्वसाधारण विषयांपलीकडे मी संभाषण जाऊं दिलें नाहीं मी अशी लागलीच जाणार, याचें त्यांनां मनापासून वाईट वाटत होतें; त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें मी आणखी कांहीं दिवस त्यांच्यांत घालविले असते तर त्यांनां फार आनंद होता, यांत शंका नाहीं.

" एकूण तूं सकाळींच जाणार !" ते ह्मणाले, " कांहीं दिवस तरी आह्मांला चुकल्यासारखं होईल बघ तुझ्यावांचून. कित्येक बाबतींत आपलीं मतं जुळत नाहींत, तरी तूं असावीसशी वाटते गीते आमच्यांत."

" सगळ्यांचींच मतं जुळून कसं चालेल ?" मी हंसत उत्तर केलं.

" सुधाकर तुला भेटणार असतील थोड्या दिवसांनीं, नाहीं का ?"

उषेनें हाच प्रश्न केला होता. आणि मी याला उत्तरहि जें उषेला दिलें होतें, तेंच दिलें.

"कांहीं सांगतां नाहीं येत तें."

" पण तुला तरी भेटावसं वाटतं किं नाहीं त्यांनीं तुला ?"

मी घुटमळल्यें व लाजून खालीं पाहूं लागल्यें.

" वाटणारच." मी बोलत नाहींसें पाहून श्रीमंत ह्मणाले; " तुमच्या परस्परांच्या ओळखीचं श्रेय मला मिळालं, हें माझं भाग्य समजतों मी. तुमची आध्यात्मिक मतं इतकीं सारखीं आहेत कीं इतर बाबतींतहि तुमचं एकमत होण्याचा फार संभव आहे. वीस वर्षांनीं ही सुधाकरांची नि आमची भेट झाली; मी विसरूनहि गेलों होतों त्यांनां ह्मणायचा. त्या दिवशीं रात्रीं स्वारी दत्त ह्मणून उभी आपल्यापुढं. "

"विलक्षण योगायोग हा, दुसरं काय?" मी उत्तर केलें; " असा अनुभव पुष्कळदां येतो. समान गुणधर्माचीं माणसं परस्परांनां आपणाकडे ओढीत असतात; त्याचाच हा दाखला."

" खरंच." श्रीमंत ह्मणाले; " समान गुणधर्मांचं परस्परांवर आकर्षण चालत असावं, असं दिसतं स्पष्ट; आणि तें जर खरं असेल, तर–"

वाक्य अपुरें ठेवून ते विचारांत मग्न झाले. मीहि मग अधिक कांहीं न बोलतां तेथून उठल्यें व आपल्या खोलींत जाऊं लागल्यें. तों डॉक्टर भास्कररावांची स्वारी समोरून येतांना दिसली.

" उद्यां जाणार ना आपण ?" मजजवळ येतांच स्मित आणून त्यांनीं विचारलें.

" होय, म्हणत्यें असं." मी उत्तर केलें व पुढं जाऊं लागल्यें, डॉक्टरहि वळून मजबरोबर येऊं लागले; मला गत्यंतर उरलें नाहीं. खोलींत जातांच त्यांनां " बसावं " असं ह्मणणं भाग पडलं.

" बरा केला विचार उद्यां जाण्याचा." खुर्चीवर बसतांच डॉक्टर ह्मणाले.

" तो कसा ?" मी साश्चर्य विचारलें.

" तुमचा माझ्यावर फार परिणाम होतो पहा." खिशांतील सिगारेट काढून पेटवीत ते म्हणाले; "मला कल्पना नव्हती, एका व्यक्तीचा दुसरीवर इतका परिणाम होईल अशी. पण अगदीं पहिल्या दिवसापासून असं होतं आहे. प्रथम वाटलं, तुम्हांला कुठंतरी मी पाहिल्या असाव्यात. आणि तुमच्याविषयीं एक प्रकारचा ओढा व एकप्रकारचा त्याच्या उलट मनोविकार असा कांहीं परस्परविरुद्ध भाव वाटूं लागला. त्या दिवशीं–सुधाकर इथं आले त्यावेळीं–तर तुम्हावरून दृष्टीच हलवूं नयेसं वाटत होतं मला. तुमचा माझा पूर्वीचा कुठला तरी चांगला परिचय असावा अशी भावना दृढ होऊन तुम्हाविषयीं एक प्रकारचं प्रेमहि वाटूं लागलं मला. म्हणजे—ते हंसत पुढं म्हणाले, तसं क्षणभरच वाटलं. लागलंच गेलं ते वाटणं. आणि त्याच्या जागीं दीर्घ द्वेष वाटूं लागला मला त्या क्षणापासून. तो आजवरहि वाटतो आहे तसाच. असा कां वाटावा, तें नाहीं सांगतां येत मला. पण वाटतो आहे खरा. आणि म्हणूनच तुम्ही एकदांच्या उद्यां जाणार, हें बरं वाटतं आहे मला ! "

" नि मलाहि फार बरं वाटतं आहे त्याचं." मी उत्तर केलें; " जिथं आपल्याविषयीं गोड भाव नाहीं, तिथं कसं रहावसं वाटेल !"

" असंच नाहीं ह्मणतां येत." डॉक्टर ह्मणाले; " पण–पण आपल्या मनोवृत्ति भिन्न, इतकाच त्याचा अर्थ. आह्मी या जडाच्या भूमिकेवर विहार करणार, तर तुह्मी जडातीताच्या कल्पनामय सृष्टींत उड्डाण करूं पहाणाऱ्या. आतां त्या उड्डाणांतून तुह्मी कशा काय निभावून येतां तें निराळं. पण एवढा भेद आहे आपणा दोघांमध्यें. तुमच्या सहवासांत मोकळेपणानं श्वासोच्छ्वाससुद्धां करतां येणं कठीण. उंच डोंगरावरच्या वातावरणांत ज्याप्रमाणं निःशक्त फुप्फुस जोरानं धडधड करतं, त्याप्रमाणं होतं हें. उषेवर तुमच्या सहवासाचा हा परिणाम स्पष्ट दिसतो; मजवरहि तसा होतो आहे पहा. श्रीमंतांवरहि थोडाबहुत झालेला आहे. समान भूमिकेवर असणाऱ्या व्यक्तीलाच केवळ तुमचा सहवास सुखकर. इतरांनां तो नेहमीं दुःखकरच व्हायचा."

" तुह्मालां होतो तसा." मी हंसत हंसत मध्येंच ह्मटलें.

" असंच नाहीं ह्मणतां येत. कारण केव्हांतरी पूर्वी आपण एकाच भूमिकेवर होतों, असं मला वाटतं !" भिंतीवरील घड्याळांत ' एक ' 'दोन' असे ठोके पडूं लागले. त्यासरशीं डॉक्टर धांवून सभोंवार पाहूं लागले.

" ठीक, बसा आतां." करून ते उठले; " कांहीं चुकी झाली असल्यास क्षमा करा, राग ठेवूं नका."

त्यांचे स्वर करुणपूर्णसे मला वाटले, व दीर्घ कालापूर्वीच्या त्यांनीं केलेल्या, व मी ब्रह्मारण्यांत पाहिलेल्या वधाबद्दलच ते माझी क्षमा मागत आहेत असें मला वाटलें. त्यासरशी मी अननुभूत क्रोधानें तापून गेल्यासारखें मला झालें.

" डॉक्टर साहेब !" मी ह्मणाल्यें; " मी रागावल्यें काय, न रागावल्यें काय, आपल्याला त्याचं काय ? आपले मार्ग भिन्न, कदाचित् यापुढें आपली भेटहि होण्याचा संभव नाहीं. माझ्या रागाचा आपल्या हितानहितावर काडीचा तरी परिणाम होणार आहे का ?"

" एकूण आपण क्षमा नाहीं करीत मला !" डॉक्टर पुनः करुण स्वरानें ह्मणाले.

मी क्षणभर घुटमळल्ये, नंतर स्पष्ट उत्तर केलें;

" नाहीं " मी ह्मणाल्यें; "कारण क्षमा करवतच नाहीं मला !"

क्षणभर आमच्या दृष्टीचें मीलन झालें; एकदम मध्यें कांहींतरी झालें.

" नाहीं अझून !" डॉक्टर पुटपुटले. " अद्याप नाहीं क्षमा होत मला." असें ह्मणून तडक खोलींतून बाहेर पडले. माझा जीव खालीं पडल्यासारखा झाला. माझ्या आत्म्याची जागी झालेली स्मृति,–पूर्वजन्माची माझी जागी झालेली स्मृति–आतां पुनरपि निद्रा घेण्याचा संभव नाहीं, या जाणिवेनें मी अगदीं गोंधळून गेलेली होतें; त्यामुळें डॉक्टरांबद्दल माझ्या रोमरोमीं भरलेला द्वेष मला स्पष्ट शब्दांनीं त्यांच्याशीं व्यक्त करतां आला, याचा मला आनंद झाला. त्या रात्रीं मला गाढ झोंप लागली. संकल्पाप्रमाणें पहाटे चाराला मी जागी झाल्यें. श्रीमंत माझ्या आधींच जागे झालेले होते. महाडजवळील दासगावांपासून मुंबईपर्यंतच्या आगबोटीच्या तापकारक प्रवासाच्या मी भरीस पडल्याबद्दल त्यांनीं मला थोडा दोष दिला. पण माझा बेत पालटला नाहीं, हें सांगायला नकोच.

" असो, आम्ही आतां दोनतीन दिवसांत माथेरानला जाऊं ह्मणतों. तेव्हां मुंबईस राहिलीस, तर तेथून पत्र टाक खुशालीचं माथेरानला. बघ, विसरशील ?"

काय उत्तर द्यावें मला कळेना.

" नाहीं विसरणार. पण मुंबईस मी फार वेळ नाहीं रहाणार ह्मणत्यें."

" असं का ! बरं ठीक. जपून ये. " असें त्यांनीं ह्मणतांच मी त्यांच्या व्हिक्टोरियांत चढलें. त्यांनां 'येत्यें' ह्मणतांना डोळयाला पाणी आलें.

शेवटीं मी महाबळेश्वर सोडलें. त्या केवळ स्वर्गीय वनश्रीचा व पर्वतश्रीचा निरोप घेऊन मी हिमालयाचा मार्ग धरला. ह्मणजे जिज्ञासेचा–अतृप्त जिज्ञासेचा– किंवा अनद्यानंत प्रीतीचाच मार्ग मी धरला, असें ह्मटल्यास काय प्रत्यवाय ?

---

## प्रकरण तेरावें

# योगानंदस्वामींचा आश्रम

महाबळेश्वर सोडल्यापासून पुढील पंधरवड्यांत मी जो प्रवास केला, तो वर्णन करण्याचें कारण नाहीं; मुंबईहून माझी मैत्रीण यमुनाबाई हिला व पुण्यास अनाथबालिकाश्रमाचे संस्थापक ह्यांनां, अशीं दोन पत्रें टाकिलीं; व आगगाडींत बसल्यें. त्यापुढें चौथ्या दिवशीं रावळपिंडीस, तदनंतर तीन दिवसांनीं काश्मिरांत श्रीनगर येथें व पुढें चार दिवसांनीं काश्मिरच्या ईशान्य कोनांतील एका खेडेगांवीं पोहोंचल्यें. तेथून पायीं कित्येक शैल चढून तिसऱ्या दिवशीं एका शिवालयांत आल्यें, तेव्हां माझ्या जिवांत जीव आला. कारण, सुधाकरांच्या टांचणाबरहुकूम मला येथून एका उंच–उंच शिखरावर योगानंदांचा आश्रम दिसूं लागला.

" तो दिसतो आहे, तो कुणा योग्याचा आश्रम का ?" असें मी तेथील दोन तपस्व्यांत, जो अधिक वृद्ध दिसला, त्याला कांहींसें खुणांनीं व कांहीं मोडक्या तोडक्या हिंदुस्थानींत विचारलें.

" होय. " त्यानें उत्तर केलें. " आश्रम आहे तो. पण तेथें नाहीं घेणार तुह्माला. ह्मणून तुम्ही नका भरीस पडूं तिकडे जाण्याच्या."

" पण मजजवळ पत्र आहे तें पहातांच मला नाहीं हरकत होणार." असें मी म्हणतांच ते दोघे आश्चर्यचकित होऊन पहात राहिले.

एकूण तोच योगानंदस्वामींचा आश्रम. कारण सुधाकरांच्या टांचणांत प्रतिबंधाचीहि गोष्ट नमूद केलेली होती. आतां तेथें जायला हरकत नाहीं, असें ठरवून माझें गाठोडें घेऊन मी तें गगनचुंबी शिखर चढूं लागल्यें.

सूर्यास्ताला चांगला एक प्रहर अवधी होता. तेव्हां, एवढ्या अवधींत आश्रम गांठीन, अशी मला खात्री होती; म्हणून मी सभोंवार वर-वर पसरलेलें तें हिमालयाचें धवलयश पहात चढत होत्यें. एकांत, पूर्ण एकांत म्हणतात तो हा. असें माझ्या अनुभवास आलें. कोठें–कोठेंहि, वर आकाशांत वा खालीं भूपटलावर मानवाचें तर राहोच, पण पशुपक्षाचें वारेंहि दृष्टीला पडलें नाहीं. ह्या निस्सीम एकांतसागरांत, ह्या अमर्याद मूकतेंत मी एकटी क्षुद्र व्यक्ति. मानवी आशा, मानवी आकांक्षा, ह्यांनीं भरलेली मी क्षुद्र व्यक्ति त्या निश्चल समाधींत पडलेली पाहून, माझी मला लाज वाटूं लागली.

माझ्या कल्पनेप्रमाणें सूर्यास्तास मी आश्रमाच्या महाद्वारापुढें येऊन पोंचल्यें पण महाद्वार बंद. तें मज करितां उघडणार कोण ? मी बाहेरून हांका मारल्या, तरी त्या आंत ऐकूं जाणार कशा ? अभेद्य असा दुर्गच तो. त्यांत माझा प्रवेश होणार कसा ? ह्या विवंचनेंत मी पडल्यें. आतां करणार कसें ? रात्र पडण्याआंत मला कोणी आंत घेईल का ? न घेतल्यास सर्व रात्र येथेंच बसून काढूं कीं काय ? परत त्या शिवालयांत जाणें आतां तितकेंच अशक्य. काळोखांतून, मी परत तरी कशी जाणार ? देवा, आतां मी कसें करावें ? हा शेंकडों कोसांचा प्रवास मी केला, हा वेडेपणा तर नाहींना केला ? सुधाकरांनीं मला फसविलें तर नाहीं ना ? हो—त्यांचा आणि माझा परिचय तो कितीसा ? फार तर एका आठवड्याचाच. खरंच, त्यांनीं मला फसविली तर नाहीं ? ब्रह्मारण्यांत माझ्या पूर्वजन्माचे ह्मणून दाखविलेले देखावे मोहिनी विद्यापंडित दाखवूं शकेल, नाहीं का ? मन मानेल तसे देखावे तो

दाखवूं शकेल, नाहीं का? तीं पूर्वजन्माचींच दृश्यें, असें खात्रीनें कसें ह्मणतां येईल? देवा, सुधाकरांनीं अशीच तर नाहींना मला फसविली? आणि फसवणुकीनें मी शेंकडों कोसांच्या प्रवासाचा ताप सोसण्याइतकी खुळी झाल्यें ना?

अशा प्रकारचे विचार एकामागून एक माझ्या मनांत येत होते; व माझ्या अविचाराबद्दल मला ताडन करीत होते; तों काय चमत्कार. माझ्या दृष्टीपुढें चटकन् एक तेजोकिरण चमकला. माझ्या संशयग्रस्त मनावर त्यानें प्रहार केला व मला कृतीला उद्युक्त केलें. मी महाद्वाराच्या अगदीं जवळ गेल्यें व इतका वेळ लक्षांत न आलेली दिंडी दाबली, त्याबरोबर ती उघडली गेली. वरवर पहातां अनिवार्य अशा अडचणीहि त्यांचें निवारण करण्याचा प्रयत्न केला असतां नाहींशा होतात याचा मला चांगलाच अनुभव आला. मी दिंडीआंत शिरतांच, दिंडी चटकन् लागली गेली. आतां बाहेर जाणें अशक्य. तेव्हां तेथें अधिक न थांबतां, पुढ्यांत दिसणारा तो विशाळ पाषाणसोपान चढूं लागल्यें. रात्र पडल्यामुळें तेथें काळोख किर्र होता तरी तो सोपान मी जसजशी चढूं लागल्यें, तसतशी मला हुशारी वाटूं लागली. क्षणाभरानें दूर–दूर त्या सोपानाच्या दुसऱ्या टोंकाला अंधुक प्रकाश चमकूं लागला. मी जसजशी वर, त्याजवळ जाऊं लागल्यें, तसतसा तो प्रकाश स्पष्ट दिसूं लागला. सोपान चढून वर पाऊल ठेवतांच एक सुंदर उद्यान माझ्यापुढें पसरलेलें दिसलें. त्याच्या बरोबर मध्यभागीं, चारहि बाजूनें उघडें असलेलें शुभ्र धवल संगमरवरी मंदिर. त्या मंदिरांत मध्यभागीं एक कारंजें. कारंज्यावर उंच मंदिराच्या डंबरींतून स्निग्ध, शांत, आल्हादकारक असा विद्युत्प्रकाश पडलेला. कारंज्याभोंवतीं सुंदर चिमुकलीं संगमरवरी सुखासनें ठेविलेलीं. माझी सर्व तहानभूक विसरून मी या मनोहर, केवळ काव्य कादंबरींत दिसणाऱ्या देखाव्यांत तल्लीन होऊन गेल्यें. योगानंद स्वामींचा आश्रम तो हाच का? खडतर तपश्चरणाचें पीठ, अशी ज्याविषयीं माझी समजूत, तें हेंच का रमणीय स्थान? डंबरींतून खालीं पडणाऱ्या त्या, सूर्यप्रकाशाहून सौम्य, चंद्रप्रकाशाहून मधुर, अशा प्रकाशांत तें मंदिर व त्याच्याभोंवतालचें उद्यान हीं मला केवळ स्वर्गीयशीं दिसूं लागलीं.

भोंवतालच्या या शांत रमणीयतेनें मोहून मी कारंजाभोंवतालच्या शुभ्रासनांपैकीं एकावर बसल्यें व कारंजाच्या त्या विविधवर्णी तुषारांकडे, मोहकतेंत व विविधतेंत इंद्रधनुष्याशीं स्पर्धा करणाऱ्या त्या तुषारांकडे, मी पहात राहिल्यें. जागृतींत मी हा एक प्रकारचा स्वप्नानुभवच घेऊं लागल्यें, आणि ह्मणून समोरून, मंदिराच्या एका टोंकाकडून मजकडे कुणी शुभ्रवस्त्राच्छादित व्यक्ति येत असलेली पहातांच मी एकदम दचकून गेल्यें. सभय चित्तानें मी टकमक त्या व्यक्तीकडे पहात राहिल्यें. ती जसजशी जवळ येऊं लागली, तसतशी माझी भीति जाऊं लागून, त्या व्यक्तीचें सस्मित मुख, प्रेमपूर्ण दृष्टि व धवल केश हीं मला दिसूं लागलीं. अंगावर शुभ्र हिंदुस्थानी चादर घेतलेली असून, धोतर बंगाली पद्धतीचें नेसलेलें; पायांत किंवा डोकींत कांहीं नसून, लांब शुभ्र केश पाठीवर रुळत होते.

"माई," ती व्यक्ति मजजवळ येऊन ह्मणाली; "स्वामीजींनीं मला पाठविला आहे. थोडी विश्रांति घेऊन आपण मजबरोबर चलावं."

"माई" हा शब्द उच्चारतांच मी उठून उभी राहिल्यें! ते शांत मधुर हिंदी स्वर ऐकतांच माझी सर्व भीति नाहींशी झाली.

"पण विश्रांति नको आहे मला महाराज." मी उत्तर केलें; "मला थकवा मुळींच नाहीं आलेला. न्यावं मला स्वामीजींच्या दर्शनाला असंच."

"पण तें शक्य नाहीं माई." स्मित करून त्या व्यक्तीनें उत्तर केलें; "स्वामीजी सिद्ध नाहींत या क्षणाला. तुमच्याकरितां योजिलेल्या जागीं तोंवर थोडी विश्रांति घ्या, ह्मणजे बरं वाटेल तुह्माला. येतां ना मग?"

या प्रत्येक शब्दांत सभ्यपणाबरोबर अधिकारहि भरलेला होता. त्यामुळें यावर कांहीं न बोलतां निमुट त्या वंदनीय वृद्ध व्यक्तीच्या मागोमाग चालूं लागल्यें. कारंज्याच्या मंदिरांतून बाहेर पडून, उद्यानाच्या दुसऱ्या टोंकाला आह्मी आलों व आश्रमाच्या मुख्य मंदिराचा भव्य शिलासोपान चढूं लागलों. तो अर्धा चढलों न चढलों, तों त्याला तेथें फुटलेला उपसोपान आम्हीं चढूं लागलों. तो चढून होतांच तेथें रांगेनें असलेल्या दरवाजांपैकीं एक दरवाजा वृद्धानें उघडला व मला आंत जाण्यास खूण केली. मी आंत

जातांच सभोंवार पाहिलें; तों रहाण्याच्या सर्व सोई तेथें मला दिसून आल्या. कारंज्याच्या मंदिरांतील डंबरीप्रमाणें येथें विद्युद्दीप असून त्याचा मनोहर प्रकाश खालीं पडला होता. एका कोपऱ्यांत एक टेबल, त्याजवळ दोन खुर्च्या, दुसऱ्या कोंपऱ्यांत एक माच्या व त्याजवळ कपडे टेवण्यास दोन खुंट्या; त्यांच्या मध्यंतरीं एक खिडकी. मी लागलीच खिडकीशीं गेल्यें, तों ज्या शिखरावर तो आश्रम होता, तें सर्व शिखर मला तेथून माझ्या पायाशीं दिसलें. मी मागें दृष्टि वळवून त्या वृद्धाशीं बोलणार तों–तों काय? वृद्ध तेथें नाहीं. मी तडक दाराशीं आल्यें तों दार बाहेरून बंद, व मी बंदिवान. आश्चर्यानें मी केवळ स्तंभित होऊन गेल्यें. भीति व क्रोध हींहि जागृत होऊन, मला कंप भरला. बाहेर पडण्याला दुसरा कोणता मार्ग आहे का, ह्मणून सभोंवार पाहिलें तों तीहि आशा नाहीं. पुनः त्या खिडकीशीं गेल्यें, खालीं सर्वत्र घनदाट काळोख, वर सर्वत्र स्वर्गीय तारका–ज्योति, त्यांनीं मात्र माझें चित्त वेधून तें शांत केलें; मी इतकी भयग्रस्त कां बरें झाल्यें? ह्या आश्रमांत मी आपण होऊन आल्यें, नाहीं का? आणि स्वामिमहाराजहि मला दर्शन देणार आहेत आतां इतक्यांत, नाहीं का? असे विचार येतांच माझें मला हसूं येऊं लागल्यें. मी ह्या क्षणीं बंदिवानशीं असल्यें, तरी त्यांत काय गेलें? त्यानें माझें काय नुकसान झालें आहे? कांहीं नाहीं. मग मी घाबरावें–रागवावें का ह्मणून? क्षणांत मला स्वस्थ वाटूं लागलें व कोपऱ्यांतील माच्यावर मी बसल्यें; तों पलीकडे एका कोंपऱ्यांत नळ आहेसा मला दिसून आला. तडक जवळ जाऊन तो फिरविला, तों खराच पाण्याचा नळ; त्यानें मी स्नान केलें व टेबलाजवळील एका खुर्चीवर येऊन बसल्यें. टेबलावर एक मोठा आरसा ठेवलेला, तो इतका वेळ माझ्या लक्षांत आला नव्हता, आतां तो पहातांच ह्या आश्रमांतील गोड रहाणीचें मला कौतुक वाटूं लागलें. आरशांत मी पाहिलें, तों गेल्या पंधरवड्याच्या प्रवासानें मी क्षीण न होतां उलटी चांगली झाल्यें होतें, ह्याचें मला आश्चर्य वाटलें.

पुनः मी खिडकीशीं गेल्यें व डोकावून बाहेर पहाण्याकरितां दांडीवर हात टेकले, तों हाताला मऊ–मऊसें कांहीं लागलें. पहात्यें, तर विविधवर्णी फुलांची डहाळी. व खालीं झाडाची कुंडी. खिडकीच्या खालील गजांबाहेर ही कुंडी होती पण ती मी या क्षणापर्यंत कशी पाहिली नव्हती देव जाणे. डहाळीला पांचसात अर्धविकसित फुलें असून, त्यांचा परिमल अतिशय मधुर. 'नंदन वनांतील अगण्य पुष्पांतील हीं पुष्पें.' कोठें बरें हे शब्द मी ऐकिले होते. त्यांचा अर्थ काय बरें, लागलेंच मला आठवलें. प्रेमानें मी त्या सौंदर्यनिधान पुष्पांनां स्पर्श केला व स्वप्नानुभव घेत असलेल्या माझ्या कल्पनेबरोबर वहात चालल्यें. "मी तुह्माला खुडणार नाहीं." मी त्यांनां ह्मटलें; "तुह्मी संदेशरूप आहांत. तुमचा संदेश मला कळूंद्या बरें, बोला."

पुष्पांनीं आपला संदेश मला कळविलासें मला वाटलें; निदान माझ्या ठिकाणीं त्यांनीं अत्यंत तरल, सूक्ष्म चैतन्याचा संचार केला, हें निश्चित. त्यानें मी परक्या ठिकाणीं परक्या माणसांत आहे, हें मी विसरून गेल्यें. मी सर्वस्वीं बंदिवान आहें, हें मी विसरून गेल्यें. जीवन ह्मणजे सच्चिदानंद, त्यावांचून सर्व सर्व कांहीं मी विसरून गेल्यें.

अशा या मनःस्थितींत किती काळ गेला, माझें मला सांगतां येत नाहीं. एकदम संगीतध्वनि ऐकूं येऊं लागला, त्यानें मी शुद्धीवर आल्यें व मागें बघत्यें तों स्वामिजींचा तो मघाचा वृद्ध शिष्य दार उघडून आंत येत आहे. मला अशा प्रकारें बंदिवान केल्याबद्दल मी एरव्हीं त्याला बोललें असतें. पण माझ्या सध्याच्या मनःस्थितीमुळें व त्याच्या गांभिर्यामुळें मजकडून तसें कांहीं झालें नाहीं. मी मुकाट त्याजकडे पहात राहिल्यें. तो वृद्धहि जिज्ञासादृष्टीनें मजकडे पहात राहिला. मी कांहीं बोलत नाहींसें पाहून त्यानें स्मित केलें.

"माई, फार शांत वृत्तीच्या आहांत!" तो शांतपणें म्हणाला; "फारच चांगलं हें. स्वामिजी सिद्ध झाले आहेत तुम्हाला दर्शन द्यायला. चला तर आतां."

मी नखशिखांत सकंप झाल्यें, हृदय धडधडूं लागलें. शेवटीं माझी स्वच्छंदी जिज्ञासा तृप्त होणार ना? ज्यांच्या कृपाप्रसादानें सुधाकरांनां दीर्घ तारुण्य व अलौकिक सामर्थ्य हीं लाभलीं; ज्यांच्या शिक्षेनें त्यांनां जीवनरहस्यज्ञान देणारें दिव्य उतरतां आलें त्या महात्म्याचें मला आतां खरोखरच दर्शन घडणार ना? माझी दीर्घकालची मनीषा, ही अशी

फळाला आलेली पाहून माझ्या मुखावाटे शब्दहि फुटेना. मी निमूट त्या शिष्याच्या मागोमाग चालल्यें. माझ्या त्या आनंदातिशयांत, मी एके ठिकाणीं त्या शिलासोपानांत अडखळून पडणार दिखील! पण त्या वृद्धानें मला चटकन् सांभाळली. त्याच्या दयाशील दक्षतेनें मजमध्यें नवीन शक्ति संचार झालीसें मला झालें.

" भिऊं नका माई." तो सौम्य स्वरानें ह्मणाला; " भिण्याचं खरोखर कांहीं कारण नाहीं."

आम्ही उपसोपान उतरून मुख्य सोपान चढलों: व क्षणांत एका बंद दरवाजाशीं आलों. शिष्य तेथें थांबला, मींहि थांबल्यें, माझें सर्व भवितव्य त्या दरवाज्या आंत आहेसें मला वाटलें. एकदम दरवाजा सताड उघडा झाला. आंत एक सुंदर दिवाणखाना व त्यांत कित्येक खुर्च्या, टेबलें आणि चारहि बाजूला भिंतीस लागून पुस्तकांनीं भरलेलीं कपाटें. टेबलांवर सुंदर चिमुकले पुष्पकलश, हें सर्व मला दरवाजांतून एका दृष्टिक्षेपाबरोबर दिसून आलें.

शिष्यांनीं आंत शिरतांच मला आंत येण्यास खुणाविलें. मी आंत जातांच, " स्वामिजी आतां इतक्यांत इथं येतील. तुम्ही तोंवर ह्या खुर्चीवर बसा!" असें त्यानें स्मित करून ह्मटलें.

मला कसेंसेंच वाटूं लागलें. मी तशीच उभी राहिल्यें.

शिष्य आल्या दारानें तसाच निघून गेला; तो जातांच दार आपोआप बंद होऊन मी एकटीच आंत राहिल्यें. हें पहातांच मी मुकट एका खुर्चीवर बसल्यें व बाह्यतः तरी चित्तस्थैर्य आणूं लागल्यें. पण तें आणून काय बरें उपयोग? ज्या महात्म्याचें मला आतां दर्शन घडणार, त्याला क्षणांत माझ्या खऱ्या मनःस्थितीची कल्पना येणार नाहीं का? नकळत मी माझ्या पोलक्याच्या खिशांत असलेलें सुधाकरांचें पत्र चांचपून पाहिलें; तों तें जिथल्या तिथें होतें.

समोरील खिडकींतून मी बाहेर दृष्टि टाकिली; तों चंद्रोदयाचीं चिन्हें दिसून आलीं. उठून खिडकीशीं जावें व बाहेरील देखावा पहावासें मनांत आलें; त्याप्रमाणें मी उठल्येंहि, पण कोणत्या तरी गूढ शक्तीनें मला ओढून धरून, जेथल्या तेथें उभी ठेविली. बघल्यें तर स्वामिमहाराजांची भव्य उदात्त मूर्ति माझ्यासमोर उभी! अंगांत पायघोळ आरक्त कौपिन, मुखश्री प्रतिभावंत दैवी सादर्यमंडित; मुक्त धवल केशभार पाठीवर रुळत असलेला, अशी ती मूर्ति पाहतांच स्वामिमहाराज ते हें, हें मला कोणी सांगावें लागलें नाहीं. मी साश्चर्य पहात राहिल्यें. जिव्हेंतून शब्द उमटेना. त्यांचे ते तेजोमय नेत्र मजकडे लागलेले असून, माझ्या अंतरात्म्याचें ते सूक्ष्म निरीक्षण करिताहेतसें मला वाटलें. क्षणांत मी सलज्ज होऊन खालीं पाहूं लागल्यें. पुनः क्षणांत निश्चयानें दृष्टि वर करून त्यांच्याकडे पाहूं लागल्यें व दुसऱ्या क्षणीं धांवत जाऊन त्यांच्या पायीं लागल्यें.

" शतायु भव!" करून महाराजांनीं हात वर केले. त्यांचे स्वर ह्मणजे मानवी कंठाचें अत्यंत मधुर संगीत, तें ऐकतांच मला चित्तस्वास्थ्य आलें.

" वेड्या मुली," सौम्य स्वरानें ते म्हणाले; " तूं ही किती लांब आलीस. सच्चिदानंद प्रभु तुझं इष्ट पूर्ण करो."

असें म्हणून त्यांनीं आपल्या हातानें मला वर उचलली व आपण खुर्चीवर बसून मला समोरील खुर्चीवर बसविलें. मध्यंतरीं असलेल्या टेबलावर कित्येक कागद कांहीं व्यवस्थित रीतीनें जुळून ठेविलेले व कांहीं इतस्ततः पडलेले होते. वरून पडणाऱ्या विद्युद्दीप प्रकाशानें सर्व दिवाणखाना केवळ प्रकाशमयसा दिसत होता.

" शिष्य सुधाकरांनीं तुझ्या येण्याची मला आगाऊ सूचना केलेली होती, तुला ठाऊकच आहे." स्वामि महाराज ह्मणाले. " सुधाकर तुझें शोधन किती दीर्घकाळ करतो आहे; तेव्हां कुठं हा आतां तुझा शोध त्याला लागला. पण काय? तूं पूर्ववत् दुराग्रही! तुला त्याची ओळख पटते आहे कुठं? पटते आहे का?"

मला आतां धीर आला होता; मी एकदम ह्मटलें; " पण मला जर ती पटत नाहीं, तर मी आपली फसवणूक करून घेऊं का महाराज?"

स्वामिमहाराजांनीं स्मित केलें.

" पण आजवर, अज्ञानांतून ज्ञानांत तुझी उत्क्रांति होऊं लागली, तेव्हांपासून तूं आपली फसवणूक केव्हांच करून घेतलेली नाहींस, अशी खात्री आहे तुझी? निसर्ग हा कधींच ठकवीत नाहीं बघ. त्याचा मार्ग त्रिकालाबाधित सत्याचा आहे! पण तूं–तूं आपल्या जीवनाच्या विविधावस्थेंत त्या निसर्गाला ठकविण्याचा प्रयत्न केलेला आहेस. तें नाहीं ह्मणून कसं चालेल? आणि तुला याचं आश्चर्यहि वाटण्याचं कारण नाहीं. विचारशीलत्वाची प्रौढी मिरविणारा मानव

आजवर तेंच करीत आलेला आहे. पण आतां, तुझ्या सांप्रतच्या उन्नतावस्थेंत तुझं ज्ञानक्षेत्र विस्तृत होत चाललं आहे; तशीच तुझी निरहंकारिता सखोल होते आहे; तेव्हां तुजविषयीं मला मोठी आशा वाटते आहे."

मी दृष्टि उचलून त्यांच्याकडे पाहिलें. महाराजांनीं दयामय दृष्टीनें मला धीर दिला.

गुरुमहाराज मजजवळ अस्सल मराठींत–माझ्या मातृभाषेंत बोलत होते. तरी ती त्यांची मातृभाषा खास नव्हे, मजवरील त्यांच्या दयाशीलतेमुळेंच ते मराठींत बोलत होते, हें मला लागलेंच दिसून आलें.

" आतां पहिली गोष्ट, " महाराज पुढें ह्मणाले; "ती ही कीं स्त्रीशिष्यांनां आम्ही येथें कधींच घेत नाहीं. आमच्या आश्रमाच्या नियमाविरुद्ध आहे तें. त्यांनां येथें घेण्याची आमची तयारी नाहीं. त्या आह्माला नको आहेत. स्त्रिया या फार तर जीवार्ध, अधिक काय ?"

मला त्वेषाची उसळी आली; पण मी ती तशीच दाबली. स्वामिजी मजकडे अचल दृष्टीनें पाहूं लागले.

" कां ? बोलत कां नाहींस ? उत्तर कां नाहीं देत या प्रश्नाचं ? योग्य उत्तर द्यायला काय हरकत ? स्त्रिया जर जीवार्ध तर पुरुषहि जीवार्धच होत असं कां नाहीं उत्तर देत तूं ? त्या दोन अर्धांच्या मीलनानेंच एक पूर्ण जीव होतो, नाहीं का ? वेडे, गीते, स्त्रीजातीची निंदा नाहीं करीत मी. तुह्मी आहांच जीवार्ध. तुह्मांला हें दिसून यायला हवं, दोघांनांहि–स्त्रियांनां व पुरुषांनां, दोन जीवार्धांचं पूर्ण व अभेद्य ऐक्य घडवून आणणं हें पवित्र कार्य दोघांचेंहि आहे. योग्यार्धांचा संयोग करण्याचा निसर्ग सारखा प्रयत्न करीत आहे. पण मानव त्यांचा वियोग करीत असतो. जरी शेवटीं त्यांचा संयोग होतोच होतो, तरी तो व्हायला दीर्घ काल गेलाच पाहिजे, असं नाहीं कांहीं. खरं पहातां, तुम्ही स्त्रिया ह्मणजे मोक्षाच्या दूतिकाच व्हाव्यात. पुरुषांहून ही जबाबदारी स्त्रियांवरच अधिक येते. मग तुम्ही तशा कां नये होऊंत ?"

गुरुमहाराजांच्या प्रश्नाला मी काय उत्तर देणार ? मी मुकट राहिल्यें.

" मी आतां सांगितलंच, इथं स्त्रियांनां स्थान नाहीं !" ते पुढें ह्मणाले, " येथील शिष्यत्वाचं दिव्य उतरण्याचं तुह्मा अबलांनां सामर्थ्य असेल, ही कल्पनाच आम्हाला इथं अविश्वसनीय वाटते. केवळ सुधाकराकरितांच मी तुला इथं भेटण्याचं आणि ही वस्तुस्थिति समजावून सांगण्याचं कबूल केलं !—"

" पण मी आतां इथून नाहीं जायची महाराज !" मी ठांसून ह्मणाल्यें; " माझं काय वाटेल तें करा. कोंडून ठेवा, उपास घाला. वाटेल तें दिव्य मला द्या. पण सुधाकरांनां प्राप्त झालेली मनःशांति आणि सामर्थ्य हीं मला लाभल्यावांचून, आणि त्यांनां अनुरूप अशी सहचारिणी मी झाल्यावांचून, मला इथून दूर लोटूं नका.'

गुरुमहाराज मजकडे सारखे पाहूं लागले.

" सुधाकराला अनुरूप अशी सहचारिणी होणं, हें तुझं इष्ट ना ? मग तें यापूर्वींच तूं कां नाहीं साधून घेतलंस ? आजहि–थोड्या घटकांपूर्वीं तूं त्याच्याविषयीं आपलं मन संशयग्रस्त कां बरं होऊं दिलंस ? तोच तुझा खरा सहचर असं तुझं मन तुला सांगतं आहे, नाहीं का ?"

गुरुमहाराज त्रिकालदर्शी, त्यांनां माझं सर्व अंतरंग दिसतच होतें; तेव्हां मी यावर काय उत्तर देणार ? मी खालीं पाहूं लागल्यें.

" इथं रहाणं ह्मणजे काय याची तुला कल्पना आहे का ? एखाद्या कैद्याप्रमाणें इथं तुला रहावं लागेल. शिवाय"–इतकें ह्मणून ते थांबले व उठून मला बरोबर येण्याची खूण केली. त्यासरशीं मी उठून त्यांच्याबरोबर खिडकीशीं गेल्यें. येथून आश्रमाच्या मागील अंगण दिसत होतें.

" या समाधि पहा !" ते ह्मणाले; " त्या कोणाच्या समाधि आहेत, असं वाटतं तुला ? मृतांच्या समाधि नव्हत त्या, मृत आशांच्या अपयशांच्या समाधि आहेत त्या, यांत तूं भर घालणार काय ?"

" कधीं नाहीं !" मी उत्तर केलें; " मला अपयश कां येईल. माझी इष्टसिद्धि झालीच पाहिजे."

" असंच हे–ज्यांच्या आशांच्या समाधि आहेत ते–ह्मणत होते. शिवाय ते पुरुष होते. तूं केवळ स्त्री–अबला–आहेस, नाहीं का ?"

" पण मी नाहीं भीत त्याला. " मी ह्मटलें; "फार तर काय, मरण येईल इतकंच ना ?"

" मरण, वेडे, मरण या त्रिभुवनांत तरी शक्य आहे का ? मृत्यु हा आहे कोठें ? मृत्यु असता व त्याबरोबर आपलीं चिंता, व्याप, कर्तव्य हीं संपत्ति, तर हें जीवनाचं गूढ गूढ असं रहातं का ? मृत्यु

हा मानवी भ्रम आहे. जीवनघटनेंत मृत्यु हा अशक्य आहे. ज्याला मृत्यु असं ह्मणतात, तो अमर–अविनाशी–परमाणूंचं स्थित्यंतर व पुनर्धारणा इतकंच. परमाणूंच्या या स्थित्यंतराचीं व पुनर्धारणेचीं विविध व अनंत रूपें–हींच जीवनगूढ होत. हींच विश्वगूढ होत. हेंच गूढ आह्मी योगाभ्यासानं उकलूं पहात आहों. आह्मांपैकीं कांहींनीं तें उकललेंहि आहे, आणि ह्मणून विश्वाचे घटक जें जड व चैतन्य, त्यावर आह्माला आपली सत्ता प्रस्थापित करतां आली आहे. पण हा योगाभ्यास ह्मणजे कांहीं साधी गोष्ट नव्हे. हा केवढा खडतर अभ्यास आहे, तें सुधाकरानं तुला सांगितलंच असेल. आणि त्यांतून तूं अबला, नाहीं का ?"

"पण मी वाटेल तो ताप, वाटेल ते कष्ट सोशीन."

गुरुमहाराजांनीं स्मित केलें.

" सोसशील. खात्री आहे मला ती. " ते ह्मणाले; " गतजन्मीं तूं अनंत कष्ट सोसले आहेस, हें मला दिसतं आहे. " असें ह्मणून खिडकीजवळून हलले व पुनः खुर्चीवर येऊन बसले; मीहि पूर्ववत् खुर्चीवर येऊन बसल्यें.

" तुझी जिज्ञासा न्याय्यच आहे. योगविद्येचा अभ्यास करणाराची तीच जिज्ञासा असते. निव्वळ वैयक्तिक समाधान व वैयक्तिक लाभ, हीं आपलीशीं कशीं होतील, हें जाणण्याची इच्छा, अन्याय्य कोण ह्मणेल ? जीवनरहस्य, यौवनरहस्य व प्रेमरहस्य; या तिहींचें ज्ञान तुला पाहिजे आहे, नाहीं का ? सहस्र-सहस्र तत्त्ववेत्त्यांनीं याच रहस्यत्रयीचा शोध केला; पण त्यांतील फारच थोड्यांनां ती लाभली. या अपयशाचं कारण रहस्यज्ञानाची अलभ्यता नसून त्यांचाच अहंकार होय. रहस्याचें अल्प ज्ञान होतांच तें सर्व ज्ञान असें त्यांनां वाटून अहंकार बळावला; व त्यानें लभ्यज्ञानहि हातचें गेलें; अशी स्थिति किती तरी रहस्य शोधकांची झालेली आहे. जीवनरहस्य हें या त्रयींत सुलभ्य; यौवनरहस्य हें त्यांहून कठीण व प्रेमरहस्य हें सर्वांत कठीण. कारण प्रेमांतूनच जीवनसातत्य व यौवनसातत्य हीं निर्माण होत असतात. आतां, तुझा इथं येण्याचा उद्देश केवळ वैयक्तिक आहे हें उघडच. तो स्वार्थी आहे असं नाहीं ह्मणत मी 'सुधाकर हा तुजहून अध्यात्मदृष्ट्या बलवत्तर आहे, ही जाणीव तुला असल्यानं, त्याच्या बरोबरीचं तुला व्हायचं आहे, त्याला सर्वथैव पात्र असं होण्याचा तुझा हेतु आहे, त्याच्या साफल्याकरितां तूं इथं आली आहेस, हें स्तुत्यच आहे. पण हें सर्व तूं स्वतांकरितां करिते आहेस, सुधाकराच्या हितार्थ, असं नाहीं ह्मणतां येणार तुला. आज तरी तें तसं व्हावयाला हवं आहे. सुधाकराच्या हितार्थ, अशी भावना व्हायला हवी तुझी; तसंच या रहस्यांचा स्फोट दुर्बलांनां नाहीं होणार कधींहि. दुर्बलांनां ह्मणजे अर्थात्‌च, ज्यांच्यामध्यें मनोबलाचा अभाव आहे त्यांनां; निश्चयाचा अभाव आहे अशांनां, क्षणभंगुर गोष्टींनीं ज्यांचं चित्त ढळतं अशांनां, तूं तशी आहेस, असं नाहीं ह्मणत मी; पण तुला इष्टमित्र आहेत, ते तुजवर टीकाप्रहार करतील; तुझ्या अत्युच्च ध्येयाची टवाळी करतील; तुझ्या प्रगतींत शक्य तितके अडथळे आणण्याचा प्रयत्न करतील; त्यांच्या या विरोधानं रतीभरहि न ढळण्याइतकं तुझं चित्त खंबीर आहे का ? समर्थ आहे का ? तें तसं नाहीं असंच नाहीं ह्मणत मी, पण तें तसं रहायला पाहिजे, समजलीस ? "

गुरुमहाराज थांबले, तेव्हां मी वर पाहिलें.

" महाराजांच्या कृपेनं तें तसं कां नाहीं रहाणार ?" मी ह्मणाल्यें.

महाराज सस्मित झाले; " तुझा निश्चय झालाच तर ?" ते ह्मणाले.

" झाला महाराज."

" ठीक तर, ह्यांत तुला अपयश आलं तर त्याचा दोष तुझ्याकडे; मजकडे मुळींच नाहीं. तूं आपल्या स्वेच्छेनें इथं आली आहेस; स्वेच्छेनं इथं राहूं ह्मणते आहेस; इथं तुला बोलायला चालायला–हितगुज करायला दुसरं बायकोमाणूस नाहीं कुणीहि. अनिष्ट असं कांहीं घडल्यास त्याचा सर्व दोष तुजकडे, समजलीस ?"

हा प्रश्न करतांना त्यांच्या नेत्रज्योति केवळ असाधारण अशा तेजानें चमकल्या, आणि मला कांहींशी भीति वाटली, पण ती क्षणांत झुगारून देऊन मी म्हणाल्यें, " समजल्यें महाराज."

महाराजांनीं तीक्ष्ण दृष्टिक्षेपानें मला नखशिखांत पाहिली; व टेबलावरील घंटेचें बटण दाबिलें; तिच्या नादासरशीं तो वृद्ध शिष्य आंत आला.

" हरानंद " गुरुमहाराज त्याजकडे वळून ह्मणाले; " ह्या बाईंनां त्यांच्या खोलींत पोंचवा, त्या आतां आश्रमांतील शिष्य झाल्या आहेत.

हरानंद मजकडे साश्चर्य व सदय दृष्टीनें पाहूं लागले.

"त्यांनां इथून जायची इच्छा होतांच त्यांच्या प्रयाणाची सिद्धता करायची. जोंपर्यंत त्या शिष्य आहेत तोंपर्यंत त्यांनां एकांत व निःशब्दता सर्वथैव द्यायची."

मी महाराजांकडे पाहिलें, तों त्यांची मुखप्रभा क्षणांत पालटून गेलेलीशी मला दिसून आली. मला धीर देणारी ती सदयता तेथून मावळून तिच्या जागीं गूढ निष्ठुरतेची छटा झळकूं लागली होती.

मी उठून त्यांचे पाय धरले.

"गुरुमहाराजांचा हा कृपाप्रसादच झाला !" मी म्हटलें.

"मुली, कृपाप्रसाद कसचा ? कोणी कोणावर खरं पाहतां, कृपाहि करीत नसतं वा अवकृपाहि करीत नसतं ! कोणी कोणावर उपकारहि करीत नसतं, व अपकारहि करीत नसतं. ज्याचं तेंच दोन्हीं करतं. कृपाहि आपणच आपणावर करतों, उपकारहि आपलेच आपल्यावर; अपकारहि आपलेच आपल्यावर, जा आतां. आपल्या रिपुचा संहार कर."

"माझा रिपु ? तो कोण ?" मी साश्चर्य विचारलें.

"तुझा रिपु–तूंच. प्रत्येकाला याच रिपुशीं झगडायचं असतं."

मी करुणदृष्टीनें पहात आहें, हें पाहून महाराजांनीं स्मित केलें.

"परमात्मन् तुला सिद्धि देवो !" असें म्हणून दारापर्यंत ते मजबरोबर आले.

हरानंदानीं मला माझ्या खोलींत आणून सोडिली. व पूर्ववत् दार लावून ते निघून गेले. पहात्यें तर कोपऱ्यांत तिपाईवरील एका थाळींत डाळरोटी, आणि तांब्या पाण्यानें भरून ठेविलेला. कोपऱ्यांत तिपाईखालीं चोरदार असावें; व या दारानें इतउत्तर मला जेवण मिळणार, हें मला कळून चुकलें. पण त्याविषयीं अधिक विचार न करतां तिपाईवरील थाळी व तांब्या खालीं जमिनीवर घेऊन मी जेवणास बसल्यें. इतका वेळ माझी भूक तहान सर्व मावळून गेली होती पण डाळरोटीची थाळी व पाण्याचा तांब्या पहातांच ती अगदीं प्रक्षुब्ध झाली. क्षणांत ती शांत होऊन जेवण आटपल्यावर मी खिडकीशीं खुर्ची घेऊन बसल्यें व बाहेरील तो रमणीय देखावा पाहूं लागल्यें. विविधवर्णी फुलांचें तें कुंडींतील झाड माझ्या सोबतीला नसतें, तर त्या वेळचा तो एकांत मला, जवळ जवळ असह्यसा झाला असता. चंद्रिकेनें सर्व विश्व तुडुंब भरून गेलेलें; आणि त्यांत मी एकटीच. केवळ दैवी शांततेनें आणि सौंदर्यानें पूर्ण असें तें दृश्य एखाद्या प्रतिभावंत कवीला वा चित्रकारालाच आनंदकर, पण मला तें असह्यसें झालें. पण 'पूर्ण एकांत व पूर्ण निःशब्दता' हीच आतां माझी सहचर, असें गुरुमहाराजांनीं ठरविलें होतें नाहीं का ? मग कुरकुर करून कसें चालेल ?

असें मी आपल्या मनाचें समाधान करत्यें आहें, तो काय ? निःशब्द संगीतलहरी. चंद्रिकेनें भरलेल्या त्या विस्तीर्णतेंतून निःशब्द संगीतलहरी, प्रथम अस्फुट, नंतर स्फुट, अशा रीतीनें मजकडे येऊं लागल्या. क्षणांत मी तन्मय झाल्यें म्हटलें तरी चालेल.

---

## प्रकरण चौदावें

## 'स्वस्तिक'

त्या संगीतलहरी माझें चित्त वाहून नेत असतां, एकदम मला सुधाकरांची आठवण झाली. सुधाकर कोठें असतील ? काय करीत असतील ? ह्या प्रश्नांबरोबर त्यांची मूर्ति माझ्या मनोदृष्टिपुढें दिसूं लागली. तें विशाल भाल, ते निर्भय, प्रेमपूर्ण नेत्र व स्मित, हीं दृष्टीपुढून हालेनात. त्यांची ती सुधामधुर वाणी मी ऐकत्यें आहेसें मला वाटलें. देवा, आणि मी दुष्टेनें त्यांच्याविषयीं निष्ठुर भाव धरला ना ? अविश्वास आणि अहंपणा दाखविला ना ? ही इतकी दूर–हिमालयावर–आल्यें, त्याच अविश्वासामुळें, नाहीं का ? हा विचार विंचवाच्या नांगीप्रमाणें वेदना देऊं लागला. शेवटीं तो असह्य होऊन मी तेथून उठलें व खिडकी बंद करून माच्यावर गवताची अंथरी अंथरलेली होती, तिजवर येऊन पडल्यें. माच्यावर अंग टाकतांच, वरील विद्युत्प्रकाश बंद झाला व खोलींत गडप अंधकार भरला. नाहीं म्हणायला खिडकीवरील तावदानी कमानींतून चंद्रप्रकाश आंत येत होता तेवढाच. कांहीं वेळ मला झोंपच लागेना. आंत पडलेल्या चंद्रिकेंत माझें चित्त तरंगत राहिलें. कांहीं वेळानें बाहेरील संगीतलहरी शांततेंत विलीन होऊं लागल्या; व त्याबरोबरच मी निद्रेंत निमज्जित होऊं लागल्यें.

सकाळी जागी झाल्यें, तों लख्ख ऊन पडलेलें. माच्यावरून तडक उठलें, तों समोर–नळाजवळ– भिंतींत दार दिसलें. तें हातानें दाबतांच उघडलें गेलें. पहात्यें, तर त्याखालीं दगडी जिना. तो उतरून थेट माझ्या खोलीच्या खिडकीखालीं एक चिमुकल्या बगीच्यांत आल्यें. बगीच्याच्या एका कोपऱ्यांत मुख-मार्जनादि विधींची सोय केलेली होती. तिचा उपयोग करून घेऊन मी परत जिन्यानें खोलींत आल्यें.

खोलींत येऊन पहात्यें, तर तिपाईवर दुधानें भरलेली कपबशी. मी लागलीच ती रिकामी केली; व आतां काय करावें, ह्या विचारांत पडल्यें, तों एकदम पुढील दार उघडून कौपिनधारी हरानंद आंत आले.

"माझ्याबरोबर चला माई," असें ते ह्मणतांच मी उठून उभी राहिल्यें. ते मजकडे जिज्ञासादृष्टीनें पाहूं लागले; जणुं काय माझें मनोगतच ते पहात होते. आश्रमाच्या नियमाप्रमाणें मी कोणाशीं भाषण करावयाचें नाहीं, हें जाणून मी कांहीं न बोलतां मुकट पहात राहिल्यें.

"तुह्माला इथें कष्ट, भीति व चिंता नाहीं वाटत, असं दिसतंच आहे, असंच पाहिजे. आरंभ चांगला केला आहे, आतां ह्यापुढं जें कांहीं पहाल, किंवा ऐकाल, तें अगदीं निमूट पहायचं आणि ऐकायचं. तुम्हाला कांहीं बोलायचं असलं, तर आतां बोला. ह्या खोलीच्या बाहेर पाऊल पडतांच शब्द नाहीं निघतां कामा मुखांतून. फक्त ऐकायचं, शिकायचं, आणि आज्ञा धारण करायची, समजलं?"

असें ह्मणून उत्तराच्या अपेक्षेनें ते मजकडे पहात राहिले. मी कांहींच उत्तर करीत नाहीं, असें पाहून त्यांनीं माझ्या हातीं विरविरीत तांबड्या रेशमी छाटीची घडी दिली.

"ही चढवा अंगावर, व इथं परत येईपर्यंत करूं नका दूर." असें म्हणतांच मी ती अंगावर चढविली व त्यांच्या मागोमाग चालूं लागल्यें, त्यावेळीं माझें हृदय कसें धडधडत होतें, तें एक माझें मला ठाऊक.

रांगेनें असलेल्या खोल्यांवरून गेल्यावर, एक नागमोडी वळणाचा दीर्घ पाषाणसोपान उतरून आम्हीं भूगर्भागारांतील एका अगदीं लहान खोलींत आलों. त्या खोलींत भिंतीला एक आडवें लंबछिद्र. हरानंदांनीं त्या छिद्राकडे बोट केलें व ते तेथून निघून गेले. त्या लंबछिद्रांतून मी पाहूं लागल्यें, तों केवळ चमत्कृतिजनक असा देखावा मला दिसूं लागला. एक प्रशस्त सभामंडप, त्यांत दोन बाजूला दोन संगमरवरी स्तंभांच्या रांगा; रांगेआंत संगमरवरी आसनें व त्यांवर आरक्त कौपिनधारी निश्चल मानवी मूर्ति! सभामंडपाच्या शिरोभागीं असलेल्या गवाक्षांतून आंत सूर्यप्रकाश इतका विपुल येत होता, कीं तें भूगर्भागार असेलसें वाटतहि नव्हतें. सभामंडपाच्या पूर्वांगाला मध्यभागीं केवळ डोळे दिपवून टाकणारें तेजोमय स्वस्तिक झळकत होतें. स्वस्तिकांतून स्रवणारे तेजोकिरण इतके प्रखर होते कीं, मला त्यांकडे सारखें पाहवेना. चंडरश्मि ग्रीष्म तरणीचें तेज त्यापुढें फिकेंसें मला वाटलें. ह्या गांभीर्यपूर्ण दृष्यानें माझी वृत्ति गांभीर्यपूर्ण झाली, हें सांगावयास नकोच. आतां पुढें काय होतें, हें पहाण्याकडे माझी सर्व नेत्रशक्ति लागून राहिली. तों क्षणभरांत शांत, गंभीर संगीत स्वर वातावरणांत निनादित होऊं लागले; व क्षणोक्षणीं ते उच्च–उच्च होत, शेवटीं थोड्या वेळांत त्यांनीं सर्व ब्रह्मांड नादमय केलेंसें मला वाटलें. ब्रह्मानंदानें मी नखशिखांत भरल्यें. केवळ स्वर्गीय असें तें संगीत! मर्त्यत्वाच्या विचाराला त्यांत किंचितहि अवकाश नव्हता. तें ऐकतांच देहबंध तोडून मुक्तात्मा तेजोपक्षानें परमात्मस्वरूपीं गेलाच पाहिजे.

संगीतस्वर एकदम थांबले. त्याबरोबर सर्वत्र प्रगाढ शांत झालें. या शांततेंत माझ्या हृदयाचें धडधडणें मला ऐकूं येऊं लागलें; जणूं काय त्या स्थळीं मी एकटीच सजीव अशी व्यक्ति, इतकें शांत–प्रशांत असें त्या वेळीं झालें. डोळे दिपवून टाकणाऱ्या त्या स्वस्तिकाकडे मी पाहिलें, तों त्याच्यांतून निघणारा प्रत्येक किरण कांहीं तरी गूढ संदेश प्रवाहित करीत आहेसें मला वाटलें. तो संदेश काय तें शब्दानें सांगतां येणें अशक्य, तरी तो अंतरात्म्याला पटत होता खास! एकाएकीं त्या आरक्त कौपिनधारी निश्चल मानवीमूर्तींत चलन झालें; व एकसमयावच्छेदेंकरून उठून उभ्या राहिल्या. त्यांतील एक सर्वांत उच्च, सर्वांत भव्य अशी मूर्ति पुढें होऊन त्या तेजोमय स्वस्तिकासमोर उभी राहिली. गुरुमहाराज ते, हें मला लागलेंच ओळखूं आलें. त्यांनीं आपले हात जोडिले होते; जणूं काय त्या तेजोरूप परमात्म तत्त्वाची ते करुणा भाकीत होते. या वेळीं महाराजांच्या मुखश्रीवर जें तेज झळकत होतें, व त्यांच्या ठिकाणीं नखशिखांत

जी भव्यता भरलेली दिसत होती, तें तेज व ती भव्यता मी यापूर्वी कोणत्याहि मानवी व्यक्तीच्या ठिकाणीं पाहिली नव्हती. या वेळीं ते प्रत्यक्ष देवच असे मला दिसले; सर्व शक्ति, सर्व शांति यांची ते केवळ मूर्तीच असे दिसले. पूर्ण विश्वास, पूर्ण सामर्थ्य, पूर्ण अधिकार यांनीं त्यांच्या ठिकाणीं मूर्तरूप घेतलेलें दिसत होतें. आपल्या छात्रांकडे त्यांनीं दृष्टिक्षेप केला, त्यावेळीं चपलाच चमकली, असें मला वाटलें. स्वस्तिकापुढें दोन्ही हात जोडून निश्चल, स्पष्ट अशा वाणीनें ते ह्मणाले; "दृश्यादृश्य कर्ता जो परमात्मन् त्याला नमन असो."

छात्रवर्ग लागलाच एकसमयावच्छेदें ह्मणाला; "प्रेमशक्ति, जीवनशक्ति असा जो परमात्मन त्याला नमन असो."

क्षणभर सर्वत्र शांत झालें. सर्व शिष्य आपापल्या आसनावर बसले; आणि गुरुमहाराजांच्या वाणींतून उपदेशामृत वाहूं लागलें.

"भाई हो,

भूतकाळांत आपणाकडून जें कांहीं झालेलें आहे, तसेंच भविष्यकाळांत आपण जे कांहीं करूं ह्मणतों आहों, त्याचा विचार करण्याकरितां या क्षणीं आपण एकत्र झालों आहोंत. अनादि भूतकाळांतून आपणच आपला वर्तमान केलेला आहे हें आपल्याला ठाऊक आहेच; तसेंच आपल्याला हेंहि ठाऊक आहे कीं अनंत अशा वर्तमानांतून आपणच आपलें भवितव्य निर्माण करणार आहोंत. सृष्टिगणितानें जें स्पष्ट दिसतें आहे, तें सांगावयाला कोणी यायला नको आहे. न्यायाच्या त्रिकालाबाधित तत्त्वावर, कोणालाच कधीं कसली क्षमा मिळणें शक्य नाहीं. प्रत्येक जीवाच्या अंतिम मंगलाचें साधनवैपुल्य पाहतां, कोणालाच कधींहि कसली याचना करण्याचें प्रयोजन नाहीं. केवळ जीवनरहस्यज्ञानाकरितां तुह्मी येथें आलेलां नाहींत; तर जीवनक्रमणेच्याहि ज्ञानाकरितां आलेलां आहांत. आणि निसर्ग आदिकाळापासून तुह्माला जें दाखवित आला आहे, पण तुह्मीं जें कांहीं केल्या कधीं पाहिलें नाहीं, तेंच मी आपल्या बुद्धीप्रमाणें तुम्हाला येथें शिकवूं पहातों आहे. आजकालचें शास्त्र हें निसर्गाचें मुळाक्षराचें पुस्तक होय. त्यांत मुळाक्षरें चित्ररूपानें दाखविलेलीं आहेत, आजकालचे शास्त्रज्ञ सांगतात, कीं मानवी जीवनाचा उद्भव प्रथमतः आद्य पिंडांशांतून झाला. पण आद्य पिंडांशांचा उद्भव कशांतून झाला आणि कां झाला, हें कांहीं त्यांनां सांगतां येत नाहीं. कोटी सूर्यमाला, कोटी-कोटी सजीव प्राणी, ज्यांच्या जीवनाची आपल्याला जाणीवहि नाहीं, यांची घटकसामुग्री कोठून आली, हें कांहीं त्यांनां सांगतां येत नाहीं. या शास्त्रज्ञांतील कांहीं तर परमात्म्याचें अस्तित्वहि कबूल करीत नाहींत. पण त्यांतील बहुतेकांनां हें कबूल करावें लागतें आहे कीं दृश्य विश्वाआड कांहीं तरी बुद्धि वास करते आहे. सूत्रधारक बुद्धिवांचून अनियंत्रिताला नियंत्रित स्वरूप येणें शक्य नाहीं, तसेंच नियंत्रिताला सुस्थित राखण्याइतकें सामर्थ्य त्या सूत्रधारक बुद्धींत नसतें तर तें नियंत्रित पुनरपि लागलेंच अनियंत्रितांत गेलेंच असतें, यांत संदेह आहे काय ?

म्हणून, सर्वारंभ या सूत्रधारक बुद्धींतूनच होतो, ही गोष्ट निर्विवाद आहे. ही सूत्रधारक बुद्धि, मानवी मज्जेप्रमाणें दुहेरी आहे: हींत पुरुषधर्म व स्त्रीधर्म यांचें एकीकरण झालेलें असलें पाहिजे; कारण सर्व सृष्टींत तिचें हें दुहेरी स्वरूप व्यक्त होत आहे. ही बुद्धि, वा ही चेतना स्वभावतः कर्मशील आहे. तिच्या शक्तिसंचाराला क्षेत्र मिळालेंच पाहिजे. हा तिचा धर्मच आहे. आणि या धर्मानें तिजमध्यें विविध मार्गानें आपलें अस्तित्व स्थिर करण्याची वासना उत्पन्न झाली ही वासनाच प्रेमाचा प्रधान गुण होय. म्हणून प्रेम हें असंख्य विश्वांनां आधारभूत व सर्व सजीव प्राण्यांचें आदिकारण असें होय. कारण या प्रेमानेंच चैतन्य-जडाचे दुहेरी परमाणू परस्परांकडे आकर्षिले जाऊन त्यांचा संयोग होतो, व त्यांची पुनरुत्पत्ति होते. या तत्त्वाचें आपल्याला नीट आकलन झालें कीं आपण जीवनरहस्याच्या अगदीं जवळ आलों; असें म्हणण्याला कांहीं हरकत नाहीं."

गुरुमहाराज क्षणभर थांबले; आणि नंतर एक पाऊल पुढें टाकून पुनः बोलूं लागले, त्यांच्या पाठीशीं असलेलें दीप्तिमान् स्वस्तिक त्यांची प्रभाचसें दिसूं लागलें.

"पहिली गोष्ट आपल्याला शिकायची ती ही कीं या तत्त्वांचा आपणावर व्यक्तिशः काय परिणाम होतो. प्रत्येक मानवी जीवनाला मार्गदर्शक व संरक्षक होणारीं हीं तत्त्वें पुढें मांडतांना संदिग्ध भाषा टाळणें अगदीं अवश्य आहे; म्हणून या तत्त्वांचें स्पष्टीकरण शक्य तितकें थोडक्यांत आणि विशदपणें मी आतां करतों आहे.

ज्या चेतनायुक्त आणि उत्पादक परमाणूसमूहाच्या संयोगानें व पुनरुत्पादन क्रियेनें विश्वचमत्कृति घडत आहे, त्यांच्या मागें दैवी बुद्धि व सूत्रधारक बुद्धि आहे, हें गृहीत केलें, कीं मग या दैवी बुद्धीच्या कर्माचें एक प्रधान कार्य मानव प्राणी होय,ही गोष्ट आपणाला पटली पाहिजे. मानवप्राणी हा देवरूप आहे असें म्हणतात. हा काव्यालंकार नव्हे. निर्भेळ सत्य आहे. मानव हा स्वयंसिद्ध आहे; त्याच्या पिंडीं ब्रह्मांड आहे. मानव हा सचेतन, पुनरुत्पादक आणि सततोत्पादन वासनेनें प्रेरित झालेल्या परमाणूंचा समुच्चयच होय. त्यांच्या मागें तीच दैवी–सूत्रधारक–बुद्धि–शक्ति वास करते आहे. कर्त्याच्या सूत्रधारकतेवांचून जी गति विश्वाची, ती मानवाच्या ठिकाणीं असलेल्या सूत्रधारक बुद्धिवांचून मानवाची. मुख्य गोष्ट लक्ष्यांत ठेवावयाची ती ही कीं दृश्य सृष्टीच्या मागें असलेली चिच्छक्ति ज्याप्रमाणें दैवी व अनाद्यनंत आहे, त्याप्रमाणें आपणामध्यें व्यक्तिशः वास करीत असलेली चिच्छक्ति ही दैवी व अनाद्यनंत आहे ती चिरंजीवच रहाणार. जीवनाच्या अवस्थापरंपरेंतून आपण विभिन्न व्यक्तिसंचार करीत असतों. प्रत्येक व्यक्ति आपल्या सूत्रधारक आत्म्याच्या स्वामित्वांत उच्च–उच्च अनुभूति आणि संस्कार यांकडे जात असते. मानवतेच्या बहुतांशाला आत्म्याची जाणीव, कृमीकीटकांनां आत्म्याची जाणीव जितकी, तितकीच. देव आणि अमरत्व याविषयीं प्रलाप करणारे पंथ हा बहुतांश स्थापन करतो; पण देव ह्मणजे काय आणि अमरत्व ह्मणजे काय, याची त्यांनां मुलाइतकीच कल्पना. ज्यांनां ते मृत्यु ह्मणून लेखितात, त्या संक्रमणांतून जाण्यापूर्वी त्यांनां परमात्म्याच्या निस्सीम कृपादानाची कल्पनाहि आलेली नसते. ती कल्पना करून घेण्याचा त्यांनीं कधीं प्रयत्नहि केलेला नसतो; मग त्या कृपादानाचा आपल्या जीवनसाफल्यार्थ उपयोग करून घेण्याचें त्यांनां लांबच राहिलें. पण आपणाला दिक्काल मायेवर पूर्ण स्वामित्व देणाऱ्या त्या सर्वशक्तिमान् आत्मतत्त्वाची अनुभूति करून घ्यावयाची आहे; आपणाला ' मानव ' नामधारी चल वैयक्तिक विश्वावर त्या आत्मतत्त्वाचें स्वामित्व आहे, ही जाणीव पूर्ण आहे; आपण ही अखिल धरणी त्या अमर आत्म्याची दासी आहे, ही गोष्ट पूर्णपणें जाणतों आहों. ही धरणी आणि आप, तेज, वायु हीं सर्व पंचभूतें आपल्या आत्म्याच्या राज्याधिकाराचे बंदिजन व दूत होत; हें आपण पुरें ओळखतों आहों."

गुरुमहाराज येथें पुनः थांबले; व मिनिट दोन मिनिटें निःशब्द राहून पुढें ह्मणाले:—

"ही सुंदर धरणी, डोकीवरील ही आकाशडंबरी, सृष्टीची ही रमणीय, मनोहर अशी विविध घटना, हीं सर्व मानवाला त्याच्या अधिभौतिक गरजा पुरविण्याकरितांच केवळ दिलेलीं नाहींत तर त्याच्या आध्यात्मिक उन्नतीकरितां व विकसनाकरितांहि दिलेलीं आहेत. सूर्यप्रकाशांतून त्यानें आपल्या वृद्धिकरितां नवी ऊष्णता व रंग हीं घ्यावीत; वातावरणांतून जीवनाची नवी सामुग्री घ्यावी; फार काय, पण हे तरु, वनस्पति, पुष्पसमुदाय ह्यांपासूनहि त्यानें नवी शक्ति संपादन करावी. सृष्टींत असा एकहि पदार्थ नाहीं कीं ज्याची घटना मानवाच्या सुखवृद्धीकरितां व कल्याणाकरितां झालेली नाहीं. कारण विश्वाचा पाया जर प्रेमावरच आहे,—आणि तो त्यावर आहे ह्यांत शंकाच नाहीं—तर प्रेमाला आपलीं लेंकरें सुखी असावी असें वाटणारच. विधिघटनेंत आपत्तीला जागाच नाहीं. आपत्ति ही सृष्टिनियमाशीं मानवानें केलेल्या विरोधाची निष्पत्ति होय. नियमानें सर्व कांहीं शांतपणें, संथपणें, स्थिरपणें मंगल साधनानें घडत आहे. सृष्टि ही मूकपणें परमेश्वर नियमन पाळीत आहे. पण मानव, याच्या उलट, शंकावृत्ति धारण करतो; तर्कशास्त्र लढवितो; नास्तिक मत प्रतिपादन करतो; पाखंड माजवितो; आणि याचा परिणाम काय होतो? तर तो आपलें शक्तिसर्वस्व उधळून टाकून हतवीर्य होतो. चिरयौवनसंपादन, अमोघ वीर्यसंपादन, हें त्याच्या हातचें असून तो केवळ स्वेच्छेनें दुबळ, जरठ होतो. त्यानें मनांत आणतांच, विनाशक शक्तीला प्रतिरोध करण्याचें सामर्थ्य त्याला असून, तो संहारक शक्तीच्या मुखी बळेंच पडतो आहे. विश्वमालांचे घटक असे जे असंख्य परमाणू, त्यांवर ज्याप्रमाणें परमात्म्याचें स्वामित्व, त्याप्रमाणें मानवाच्या घटक द्रव्यावर त्याच्या आत्मतत्त्वाचें स्वामित्व असावयला पाहिजे. त्या घटक द्रव्याच्या घडामोडीवर आपलें स्वामित्व ठेवून, स्वेच्छेनें त्यांची पुनर्घटना त्यानें करायला पाहिजे. त्यांच्या विचारसूर्यमाला, प्रतिसृष्टि बनवून आपल्या चिरंजीवन शक्तीचा एक परमाणूहि त्यानें व्यर्थ खर्च करतां कामा नये. तो मनांत आणील, तें त्याला होतां येईल. देवस्वरूप होतां येईल; निर्बुद्ध पशुरूपहि होतां येईल. मानवतेचा बहुतांश या दुसऱ्या रूपाचीच जीवनधारणा करितो आहे. पण त्याला

सृष्टीच्या पिष्ठक यंत्रांतून निसटतां येणें शक्य आहे का? त्याची इच्छा असो वा नसो, सृष्टि त्याजकडून अंतीं कांहीं तरी कार्यें करून घेणारच घेणार. म्हणून मानवाच्या गूढ शक्तीचें ज्ञान झालेले आपण, आपलें भवितव्य ओळखून त्याचा स्वीकार करतों. आणि त्या भवितव्यानें आपणांस गांठून प्रखर अनुभूतीच्या यंत्रांतून आपणांस ओढून काढूं नये ह्मणून आपण विश्वप्रगतींत रेंगाळत मागें राहूं इच्छित नाहीं. आतां कोणाला बोलावयाचें असलें, प्रश्न विचारावयाचे असले, किंवा माझ्या विधानाचें खंडण करावयाचें असलें, तर त्यानें न भीतां पुढें यावें व बोलावें."

गुरुमहाराजांचे हे शब्द मुखावाटे बाहेर येतांच आसनस्थ शिष्यांतून एक व्यक्ति उठून उभी राहून, गुरुमहाराजांजवळ आली व उभी राहिली. ह्या व्यक्तीची मुद्रा दुःखीकष्टी अशी दिसत होती.

"मी जीवाला कंटाळलेला आहें," ती व्यक्ति ह्मणाली "जीवनवेद शिकायला मी इथं आलों, जीवनधारणा करायला आलेला नाहीं. जीवनाची मला काडीचीहि किंमत वाटत नाहीं. कारण जीवन हें विषमय असं मला झालेलं आहे. गुरुमहाराज, दीर्घकालीन जीवनाचें रहस्य आह्माला इथं कशाला सांगता? शक्य तितक्या लघुजीवनाचं रहस्य कां नाहीं आह्माला सांगत?"

स्वामिमहाराज त्याजकडे गंभीर कारुण्यदृष्टीनें पहात होते.

"जीवनाला आपण कोणता दोष लावतां?" ते ह्मणाले; "त्यानं आपला काय अन्याय केला आहे?"

"अन्याय!" तो शिष्य सक्रोध वाणीनं ह्मणाला; "स्वामिजी दुसऱ्याच्या मनांतले विचार सांगतात, भूतभविष्य पहातात, आणि जीवनानं माझा काय अन्याय केला आहे, ह्मणून विचारतात मला? जीवनानं माझे केवढे महदन्याय केलेले आहेत बरं! आधीं मला जन्म कां दिला? जन्मास येण्याची माझी इच्छा होती का? पुढं, मातापितरांनीं माझीं सुखस्वप्नं आणि आकांक्षा, ह्यांची कशी माती केली बरं? तदनंतर माझ्या सहचारिणीनं मला कितीसं सुख दिलं, तें सांगायला हवं का महाराज आपल्याला? जीवाला कंटाळून पंचमहाभूतांत केव्हां एकदांचा एकजीव होऊन जाईन, असं झालं नाहीं का मला? कपटी मैत्री, विश्वासघातकी प्रेम ह्यांचं मुखावलोकन व्हायला नको; असं झालेलं नाहीं का मला? स्वामिमहाराज, ज्याचं आपण संकीर्तन करतां, तो परमात्मा जर अशीं कपटी, विश्वासघातकी माणसं निर्माण करतो, तर-मग काय ह्मणायचं त्याला, मला कळत नाहीं."

शिष्य सावकाश पण त्वेषवाणीनें बोलत होते. महाराज त्याजकडे निश्चल दृष्टीनें पहात होते. त्यांच्या पार्श्वभागीं झळकत असलेलें दीप्तिमान स्वस्तिक अधिकच दीप्तिवंत दिसूं लागलें व त्यांत शतसहस्त्र वर्षांच्या छटा चमकूं लागल्या. सभामंडपांतील सर्व श्रोत्रसमुदाय अगदीं पाषाणमूर्तीप्रमाणें निश्चल, निःशब्दसा दिसूं लागला. एकदम जणुं काय कोणत्या तरी गूढ, अप्रतिकार्य शक्तीनें हतबल होऊन शिष्यानें गुरुमहाराजांपुढें साष्टांग नमन केलें.

"गुरुदेव, आपण सर्वसमर्थ आहांत. दुर्बलावर अवकृपा करूं नका. आपण परमात्मरूप आहांत, मजसारख्या क्षुद्रात्म्यावर करुणा करा. आपण निश्चल आहांत, चंचलांत रुतलेल्या मला आपला साहाय्यकर द्या. आपण जन्ममृत्यूचे स्वामि आहांत, जन्मास विटलेल्या या अभाग्याला मृत्युदान करा. निदान विस्मृति तरी द्या."

क्षणभर निस्तब्ध झालें. नंतर स्वामिमहाराजांची शांत, सौम्य, गंभीर वाणी ऐकूं येऊं लागली.

"मृत्यूला अस्तित्व नाहीं. आपणाला मृत्यू येणें शक्य नाहीं. खरी विस्मृतीहि अशक्य आहे. जीवनाचा एकच मार्ग, जीवनधारणा करणं हा."

स्वामिमहाराज क्षणभर थांबले, क्षणानें पुनः त्यांची निश्चल वाणी वाहूं लागली.

"जीवनावर तुम्ही अन्यायाचा आरोप करतां. पण तुम्हीच जीवनाशीं अन्यायानं वागलां नाहींत का? जीवनानं तुह्माला जीं सुखस्वप्नं, ज्या आकांक्षा दिल्या तीं सर्व खरीं करणं तुमच्या हातचं नव्हतं का? तुम्ही मनांत आणलं असतं तर तीं सर्व खरीं करणं, हें अगदीं तुमच्या हातीं होतं, समजलांत? मानवानं इच्छिलेलं न होणं, हें मातापितरांच्या, आप्तेष्टांच्याच तर काय, पण प्रत्यक्ष परमात्म्याच्याहि शक्तिबाहेरचं आहे. तुमच्या महत्त्वाकांक्षेची होळी तुमच्यावांचून दुसरं कोण करणार? ज्याच्या हृदयांत आशेचं जीवन, त्याच्यावांचून दुसरं कोण त्या आशेचा खून करणार? तुमच्या सहधर्मचारिणीनं तुह्माला सुख दिलं नाहीं ह्मणतां. पण ती तुमची खरी सहधर्मचारिणी, खरी सहचरी, खरी अर्धांगी होती अशी खात्रीं आहे का तुमची?

तुमचं तिच्या ठिकाणीं असलेलं प्रेम केवळ बाह्यसौंदर्य-मूलक होतं, कीं अंतरात्म्याविषयींचं होतं सांगतां का मला? तें कांहीं नाहीं. सर्व गोष्टीबद्दल तुमचे तुम्हीं जबाबदार आहांत. तुमचा तुमच्याकडेच दोष येतो. जीवनाला या बाबतींत बोल लावतां येणं शक्य नाहीं. कारण जीवनानं तुमच्या सुखाकरितां तुमच्यापुढें हें दृश्यादृश्य विश्व ठेविलं आहे; दिक्काल ठेविले आहेत. आणि यांचा जर तुह्मी योग्य उपयोग करून घेतलांत, तर तुमच्या सुखांत दुःखाचा एक परमाणूहि असणं शक्य नाहीं."

गुरुमहाराजांपुढें साष्टांग नमस्कार करणाऱ्या त्या शिष्यानें आपल्या दोन्ही हातांनीं आपलें तोंड झांकून घेतलें.

"तुह्माला मृत्यूदान करणं, माझ्या शक्तीबाहेरचं आहे. तुह्मी ज्याला 'मृत्यु' ह्मणतां तो स्वेच्छेनं तुह्मी घेऊं शकालः क्षणांत सद्यःदेहाचा तुह्मी नाश करूं शकाल. पण सृष्टि तुमच्याकरितां नवा देह अल्प काळांतच घडविणार हें निश्चित. शिवाय, तुमचा खरा स्मृतिनाशहि होणं शक्य नाहीं. आपल्या सद्यः देहाचा विनाश करण्यापूर्वीं या गोष्टींचा विचार करा. सद्यः प्राप्त देहाचा विनाश करणं हा कृतघ्नपणा होय. कृतघ्नपणा संकुचितत्वाचं लक्षण आहे. तुमचा नवा देह कदाचित् तुमच्या सद्यः देहाहूनहि संकुचित, शांतिसुखवृद्धीला मर्यादित असा असण्याचा फार संभव आहे."

स्वामिमहाराजांनीं असें ह्मणून त्या शरणागताला हातानें वर उचलिलें व आपल्या जागीं जाऊन बसायला खूण केली. त्यानेंहि अधिक शब्द न बोलतां निमूट आपलें स्थान गांठलें. तदनंतर प्रेक्षकांतून दुसरी एक व्यक्ति उठून पुढें आली.

"गुरुमहाराज," ती व्यक्ति हात जोडून ह्मणाली; "वार्धक्याहून मृत्यु बरा नव्हे का? आपल्या म्हणण्या-प्रमाणें जर मृत्यु नाहींच, तर क्षय तरी कां असावा? शक्तिऱ्हास होत चालला, नाड्या मंद होऊं लागल्या, कीं मग जगण्यांत काय सुख? रक्त थंडगार होऊं लागलं, ज्यांचं आपणांवर प्रेम, त्यांनांहि आपण भारवत् वाटूं लागलों कीं मग जगावं असं कां वाटेल? माझं वार्धक्य मला जाणवत नाहीं, तरी तें दुसऱ्यांनां जाणवत नाहीं का? शब्दच नव्हत, तर त्यांची दृष्टीहि सांगते कीं तोडलेल्या वृक्षाच्या बुंध्याप्रमाणं मी फार सावकाश–अति मंदगतीनं सुकत आहे, मजमधील ही मंदक्षयक्रिया कमी मंद होईल, तर बरं. पण मी वृद्ध आहे, तरी तरुणाप्रमाणं मजमध्यें शक्ति नाहीं का? तरुणांहूनहि जीवन मला अधिक सुखकर वाटत नाहीं का? तरी पण, वयाचा भार मला वहावा लागतो आहे, ह्याची जाणीव मला जाचते आहे; आणि ह्मणून, इतकं जग-ण्यापेक्षां मृत्यु येणं बरं असं मला वाटूं लागलं तर काय आश्चर्य?

दीप्तिमान् स्वस्तिकाच्या मध्यभागीं उभ्या असलेल्या स्वामिमहाराजांनीं त्या वृद्धाकडे सस्मित दृष्टिक्षेप केला.

"मीहि वयाचा भार वहातो आहे नाहीं का?" स्वामिमहाराज ह्मणाले; "पण वयाला मी महत्त्व देत नाहीं. तुम्हीहि त्याला महत्त्व कां द्यावं? निसर्गसृष्टिमध्यें ऋतूंनींच कालमापन होत असतं. आपलं वय किती, तें पक्षांनां ठाऊक असतं का? आपलं वय पुष्पवृक्ष मोजतात काय? तुम्ही कर्तृत्ववान् आहांत. विद्या-व्यासंगी आहांत. पण खरं प्रेम तें तुम्ही कोणावरहि आजवर केलेलें नाहींत. तें करायला लागा. म्हणजे वयाचा भार तुम्हांला 'भार' असा वाटणार नाहीं."

वृद्ध क्षणभर घुटमळला; जणूं काय त्याला ह्यावर कांहीं बोलायचं होतें, पण शेवटीं अधिक कांहीं न बोलतां, साष्टांग प्रणाम करून तो परत जाऊन आपल्या जागीं बसला.

स्वामिमहाराज क्षणभर थांबले व पुनः बोलूं लागले.

"आश्रमांतील जीवनक्रम व अध्ययन असंच चाल-विण्याची सर्वांची इच्छा आहेना? कुणाला येथून जायचं नाहींना? नसल्यास नित्यक्रमाप्रमाणं सर्वांनीं आपली संमति दाखवावी."

सर्व शिष्य उठून उभे राहिले व लवून प्रणाम करून पुनः स्थानापन्न झाले.

स्वामिमहाराजांनीं तदनंतर त्या दीप्तिवंत स्वस्तिकाकडे तोंड वळविलें. त्यांनीं असें करितांच स्वस्तिकाच्या किरणरेषा त्यांच्या मूर्तिपर्यंत येऊन त्यांनीं स्वामिमहाराज नखशिखांत वेष्टिले गेले. स्वामिमहाराज क्षणांत तेजाची मूर्तीच असे दिसूं लागले. त्यांच्या त्या तेजानें सर्व सभामंडप भरून गेला आहे, असें मला वाटलें. स्वामिमहाराज दोन पावलें टाकून प्रत्यक्ष त्या स्वस्तिकाला टेकून, पुनः छात्रवर्गाकडे तोंड वळवून उभे राहिले, तें स्वस्तिक ह्यावेळीं महा-

राजांची 'प्रभावळ' असें दिसूं लागले. स्वामिमहाराजांनीं हात जोडतांच सर्व शिष्यांनीं उभे राहून हात जोडिले.

"तेजोमय परब्रह्मन्! "–स्वामिमहाराज बोलूं लागले;–"आम्ही सर्व तुझेच अंश आहोंत व तुजमध्येंच विलीन होऊं इच्छितों. तुजकडूनच आह्मांला ह्या भूलोकीं चिरंजीवन प्राप्त होणार आहे. माते माये, ज्या शक्ति तेजानें तुझा गर्भ भरलेला आहे; त्याच गर्भांतून आम्ही सर्व आलेलों असून, आह्मांमध्यें तूं आपलें सौंदर्य, उत्पादकत्व, तूं आपलें सामर्थ्य व प्रगमनशीलता हीं ठेविलेली आहेस. महामाये, ज्या तेजाची तूं स्वामिनी, त्याचें उद्दीपन करणारें दैवी प्रेम तूं आम्हामध्यें ठेविलेलें आहेस. परमात्मन् आमचा स्वीकार कर. माये, आमचा प्रतिपाल कर. प्रेमरूपा ईश्वरा, तुझी इच्छा तेजोरूप तुझी वासना जगदुत्पादक आहे. तूंच आमचा मार्गदर्शक–तूंच आमचा संरक्षक–तूंच आमचा सद्गुरु हो. तथास्तु."

पुनः एकवार दिव्य संगीत सुरू होऊन, त्यांनीं क्षणांत सभामंडप भरून गेला. त्या संगीताच्या दिव्यत्वांत मी सकंप झाल्यें व करयुग्म जोडून भान विसरून नादब्रह्मांत विलीन झाल्यें. कांहीं वेळानें भानावर आल्यें व पहात्यें, तर संगीत थांबून निःशब्दता झालेली व सर्व सभामंडप शून्य झालेला. गुरुमहाराज व त्यांचा छात्रवर्ग तेथून निघून जाऊन तें दीप्तिमान स्वस्तिकच काय तें तेथें झळकत असलेलें.

मी सभोंवार पाहिलें. मागें वळून पाहिलें, तों ज्या खोलींत मी होत्यें, तिचा दरवाजा उघडा. एकदम तेथून निघाल्यें व समोर दिसणाऱ्या कमानीच्या दरवाजानें त्या सभामंडपांत शिरल्यें. माझें हृदय भीतीनें धडधडत होतें, हें उघडच. मला भीति वाटण्याचें कारण नव्हतें, कारण तेथें यावेळीं मजवांचून दुसरें कोणीहि चिटपाखरूं नव्हतें. तरी सहस्र नेत्र सभामंडपाच्या उंबरींतून मजकडे लागले आहेत, असें मला वाटलें. त्या दीप्तिमान् स्वस्तिकाची दीप्ति तर काय, या वेळीं असह्य अशी दिसूं लागली. तरी माझीं पावलें मला नकळत त्याकडेस जाऊं लागलीं व मी अगदीं त्या जवळ जाऊन उभी राहिल्यें. जवळ जातांच त्याच्या तेजोमंडळांत गुरफटल्यें असें मला झालें. त्यांतून निघून बाहेर येण्याचा प्रयत्न करतां, त्याचें सामर्थ्य मजवर अधिकच चालून, मी अगदीं त्याचा एक अंश अशी होऊन गेल्यें, माझे हात पाय सर्व देह पारदर्शक असा मला दिसूं लागला. हें पहातांच त्या मंडळांत–आंत–आंत–स्वस्तिकाच्या गर्भांतहि जितकें जाववेल तितकें जायचें अशा निश्चयानें पुढें पुढें जाऊं लागल्यें. मंदगतीनें पुढें होत होत, एकदम मी त्याच्या गर्भचक्रांत अडकून गरगर फिरते आहें, असें मला झालें. धडपड करून त्यांतून सुटावयास पाहूं लागल्यें, पण व्यर्थ. स्वस्तिकाच्या अंतर्जालांत मी अधिकाधिक गुरफटत चालल्यें. एक शब्दहि मुखावाटे उमटेना. अशा स्थितींत त्या सहस्रसहस्र तेजोरेखाजालांत सांपडून मी निश्चल, निःशब्द होऊन गेल्यें. माझेपणाचीहि मला जाणीव उरली नाहीं. तों एकदम मजवर शीतल, छायारूप, मेघखंड अ त्यासारखें झालें. मी वर पाहिलें; शब्दोच्चार करण्याचा यत्न केला आणि एकदम भूमीवर बेशुद्ध पडल्यें.

## प्रकरण पंधरावें

# 'प्रथमाध्याय'

किती वेळ मी बेशुद्ध होत्यें, तें मला ठाऊक नाहीं: पण शुद्धीवर आल्यें, तेव्हां एका शांत अशा खोलींत मी असल्याचें मला दिसून आलें. खोलीला एकच खिडकी होती. मी एका पलंगावर पडलेली असून, सकाळीं धारण केलेली कौपिन तशीच माझ्या अंगांत होती. डोळे उघडून सभोंवार पाहिलें, तों रात्र झालेली असून चंद्रप्रकाश त्या टेंकडीखालील प्रदेशावर तळपत होता. हवा सुगंधमय झालेली होती. तो सुगंध खिडकींत ठेविलेल्या कांचेच्या कुंडींतील गुलाबाचा होय, हें उघड दिसून आलें. खोलींत मध्यभागीं टेबल असून त्यावर दिवा जळत होता; व टेबलाशीं खुर्चीवर कोण? प्रत्यक्ष स्वामिमहाराजांची स्वारी. त्यांनां पहातांच मी इतकी आश्चर्यचकित झाल्यें, कीं क्षणभर तशीच निश्चल पडून राहिल्यें. उठून बसायलाहि मला भीति वाटूं

लागली; कारण त्यांचा क्रोध मजवर झाला असला पाहिजे, ह्याविषयीं मला शंका नव्हती. पण दुसऱ्याच क्षणीं मी एकदम पलंगाखालीं उडी टाकून, लहान मुलाप्रमाणें धांवत जाऊन त्यांचे पाय धरले.

" गुरुमहाराज, क्षमा व्हावी," मी पुटपुटल्यें, "मजकडून अपराध झाला आहे. स्वस्तिकाजवळ जाण्याचा मला अधिकार नव्हता. "

गुरुमहाराज स्मित करून मजकडे पाहूं लागले.

" कोण म्हणतं अधिकार नव्हता ? तितकं सामर्थ्य आणि धैर्य असल्यावर, तुला कां नाहीं अधिकार ?" गुरुमहाराज म्हणाले; " बाळ, तुला क्षमा ती कसली करायची ? तूंच आपलं दैव घडवितें आहेस. पण तूं साहस मात्र फार दाखविलेंस. स्त्री असून पुरुषांतहि क्वचितच दिसून येणारं साहस तूं दाखविलं आहेस. तुजमधील प्रेमानं तुला हें सामर्थ्य दिलं, ह्यांत शंका नाहीं. परिपूर्ण प्रेम भयातीत असावं, ह्यांत आश्चर्य कसलं ? भयंकर प्रसंगांतून तूं केंसालाहि धक्का न लागतां निभावली आहेस. इतउत्तर तुला ज्या ज्या दिव्याशीं तोंड द्यावं लागेल, त्यांतून तूं अशीच उत्तीर्ण होवोस."

गुरुमहाराजांनीं मला वर उचलून मी त्यांचे पाय धरले होते ते सोडावयास लागले.

" माझं अबलेचं तें सामर्थ्य काय ? "—मी ह्मणाल्यें, " मूकता व एकांत हीं मी सोडूं नयेत अशी महाराजांची आज्ञा होती; त्या मूक एकांतांत आपल्या उपदेशाचा शब्दनिशब्द मी ऐकला. आपली तशी इच्छाच होती. आपला उपदेश संपून छात्रगणासह आपण त्या सभामंडपांतून गेल्यावरहि मी मूक एकांताचा उपभोग घ्यायला हवा होता. पण त्या स्वस्तिकाची वाणी मला ऐकूं येऊं लागली. तें स्वस्तिक मला आपणाकडे बोलावूं लागलें. त्याच्या बोलावण्याप्रमाणें मी त्याजकडे, कां जात्यें आहें हें माझं मला न कळतां, जाऊं लागल्यें आणि जवळ जातांच—"

" त्या तेजोसामर्थ्यानं तुला आपलीशी केली तुझ्या साहसाचं तुला पारितोषक दिलं. याहून दुसरं तें काय झालं ? कांहीं नाहीं. व्हायचं तेंच झालं, माझ्याच सांगीनं तूं उभी असलेल्या गुहेचं द्वार उघडं ठेविलं होतं. तूं काय करणार, तेंच मला पहायचं होतं, आणि तूं जें कांहीं केलं आहेस त्याची तुला अजूनहि कल्पना नाहीं.–पण तें असो. आज तूं एका दिव्यांतून पार पडली आहेस. कारण जर का तूं उभी असलेल्या गुहेंतच, तुला परत न्यायला तेथें कोणी येईपर्यंत थांबून रहातीस, तर तूं दुर्बल इच्छेची व चंचल विकाराची असं मी निश्चित ठरविलं असतं. पण माझ्या कल्पनेपेक्षां अधिक बल तुजमध्यें आहे. ह्मणून आतां तुला तुझा प्रथमाध्याय द्यायला आलों आहे. "

" माझा प्रथमाध्याय"–मी उद्गारल्यें. गुरुमहाराजांनीं मला समोरील खुर्चीवर बसायची खूण केली व त्याप्रमाणें मी बसतांच ते ह्मणाले:—

" होय, तुझा प्रथमाध्याय. तूं जी विद्या शिकण्याकरितां येथवर आलीस, त्या विद्येचा पहिला धडा. भूतलावर तुला इष्ट वाटेल तितका काल जीवनधारणा करण्याची शक्ति ज्या विद्येनं तुला प्राप्त होईल; सुधाकराला ज्या विद्येनं तारुण्य व सामर्थ्य हीं लाभून निसर्गावर कांहीं गोष्टींत श्रेष्ठत्व मिळवितां आलं, त्या विद्येचा पहिला पाठ आज तुला शिकावयाचा आहे."

असं ह्मणून महाराजांनीं टेबलावर असलेल्या भांड्यांतील पाणी रामपात्रांत ओतलें व मला तें पिण्यास सांगितलें.

" सकाळच्या अल्पाहारानंतर तूं कांहींहि अन्न प्राशन केलेलं नाहींस. पण तुला आतां या पाण्यानं अन्नाची उणीव किंचितहि वाटावयाची नाहीं. "

मी तें पाणी पिऊन टाकलें. त्याची रुचि मी सकाळीं प्यायलेल्या पाण्याप्रमाणेंच होती.

" आतां—" गुरुमहाराज ह्मणाले " प्रथम तुझ्यापुढं सृष्टींतील एक महातत्त्व ठेवितों. समज तूं एका विस्तीर्ण पटांगणांत उभी आहेस. आणि तिथं दोन परस्परांविरुद्ध लढणाऱ्या दोन सेना आहेत. एक विध्वंस लालसेनं प्रेरित झालेली, व दुसरी मंगलेच्छेनं प्रेरित झालेली. तूं स्वाभाविकच या मंगलेच्छेनं प्रेरित झालेल्या सेनेस विजय मिळावा, असं इच्छिशील, नाहीं ?"

" अर्थात् " मी न घुटमळतां उत्तर दिलें.

" पण समज–" ते पुढं ह्मणाले " कीं त्या दोन्ही सेना मंगलेच्छेनंच प्रेरित होऊन लढताहेत. पहिलीचा हेतु निर्जीव व अहितकर असं जें असेल त्याचा विध्वंस करून त्याला प्रबल व उदात्त रूप देण्याचा आहे; आणि दुसरीचं ध्येय सांप्रतच्या बलाचं संरक्षण करणें हें आहे. तर कोणत्या पक्षाला जयश्री मिळावीसं तुला वाटेल ?"

मी विचारांत पडल्यें; निश्चित असं कांहीं सांगतां येईना.

" अनिश्चिततेचं हेंच स्थल. मानवी आकलन-शक्तीची हीच मर्यादारेषा. दोन्ही सेनाशक्ति मंगला-करितांच झुंजताहेत; पण आपली सहानुभूति कोणत्या-तरी एका शक्तीकडेच असणार. दुसरीला आपण 'जीवन' म्हणतों. पहिलीला 'मृत्यु' ही संज्ञा देतों. 'जीवन' हेंच कायतें सजीवाचें पक्षपाती; 'मृत्यू' हा सजीवाचा शत्रु; असें आपण समजतों. पण खरा प्रकार असा आहे कीं, 'मृत्यु' हा 'जीवन'–शक्तीइतकाच सजीवाचा पक्षपाती आहे. अखिल विश्व या दोन परस्पर विरुद्ध शक्तींचं बनलेलं आहे. आपण त्यांना मंगल आणि अमंगल अशीं नांवें देतों; पण अमंगळ असं नाहींच मुळीं. जें राहूं दिलं असतां अमंगल-अहितकर-होण्याचा संभव आहे, त्याचा विनाशच होत असतो. अधिक स्पष्ट करून सांगावयाचं म्हणजे विश्वांतील चैतन्य आणि जड हीं ज्या असंख्य परमाणूंचीं झालेलीं आहेत, ते परमाणु दुहेरी आहेत–अर्थात् द्विविध आहेत–एक समतोल स्थितिसंरक्षक; व दुसरे पुनर्घटनेकरितां मूल-स्थितिविध्वंसक. हें जसं विश्वांत चालूं आहे, तसंच मानवी देहघटनेंतहि–मजमध्यें त्याचप्रमाणं तुजमध्येंहि, या दोन शक्तींचं वास्तव्य आहे. आणि आपले आत्मे या दोहोंमध्यें, जणूं काय पहारेकरीच, असे ठेविलेले आहेत. परमाणूंचा पहिला वर्ग आपल्या प्रकृतीची व जीवनाची समतोल स्थिति राखीत असतो; पण आपला पहारेकरी जो आत्मा, त्याच्या दुर्लक्षानं किंवा अदक्षतेनं ते जर दुर्बल झाले, तर परमाणूंचा दुसरा वर्ग, ज्याचं काम सदोष व निरुपयोगी झालेल्या गोष्टींची पुनर्घटना करण्याकरितां त्यांचा विध्वंस करण्याचं, तो आपलं काम सुरू करतो. आणि या विध्वंसनालाच आपण 'क्षय' व 'मृत्यु' अशी संज्ञा देतों. तथापि, वस्तुतः पहातां ही विध्वंसनक्रिया आपल्या अनुज्ञेवांचून होतच नाहीं. या भूतलावर आपल्याला जीवन–धारणा अगदीं अमर्याद कालपर्यंत करतां येईल पण ती आपल्या स्वतःच्या कृतीनं, आपल्या स्वतःच्या इच्छेनेंच करतां येईल; समजलीस? साशंक दृष्टीनें मी स्वामीमहाराजांकडे पाहूं लागल्यें.

" इच्छा पुष्कळ असते, पण ती सफल होतेच होते, असं दिसत नाहीं. " मी म्हणाल्यें.



" तुझा अनुभव असा आहे ?"—मजवर दृष्टि रोंखून त्यांनीं मला विचारलें; " हें बघ, जर आत्म-श्रद्धा असेल, तर प्रबल इच्छेला विरोध करणारी शक्ति अस्तित्वांतच नाहीं, हें पक्कं लक्षांत ठेव. जर इच्छा सफल झाली नाहीं तर ती इच्छा अनिश्चित होय. तूं आणि सुधाकरानं–दोघांनींहि ऐन वेळीं निश्चयाभाव दाखविल्यानं आपल्या गतजन्माचं काय करून घेतलं आहे, तूंच पहा. "

" अपराध झाले " मी दीनस्वरानें म्हणाल्यें; " अपराध झाले खरे; पण त्याला कुणी झालं तरी काय करणार ? शक्य तितका प्रयत्न केला, इतकं तरी त्यावरून नाहीं का दिसत ? "

" नाहीं. " स्वामीमहाराजांनीं सस्मित उत्तर केलं; " शक्य तितका प्रयत्न केलात असं मला तरी नाहीं दिसत, तुम्हां दोघांच्या पूर्वीच्या कित्येक जन्माचं जीवन प्रेम, तुम्हा दोघांनां परस्परांकडे ओढणारी शक्ति, या प्रेमाशीं तुम्ही विरोध केलांत. जणूं काय प्रेम ही अमंगल शक्ति, असं तुम्ही दाखविलंत आणि हें कां ? तर मानवाच्या असत् रूढीला मान द्यावा म्हणून. खरं पहातां, जगन्नियंत्याच्या अचल नियमनाला तुम्ही मान वाकवावयास हवी होती. तें तुम्ही केलं नाहींत. आणि सांप्रत, वियुक्त झालेलीं तुम्ही दोघं, अनंत भवचक्रांतून सुटून पुनरपि एकत्र आलीं आहांत आणि सुधाकर जरी आतां शंकातीत झालेला आहे, तरी तूं कांहीं अद्याप शंकातीत झालेली नाहींस. "

" मी शंकाधीन नाहीं महाराज !" मी एकदम म्हटलें; " आपलं मन मी निःशंक त्यांच्या पायीं वाहिलेलं आहे, आतां मी तें माघारीं नाहीं घेणार. "

शंकायुक्त मुद्रेनें महाराज मजकडे पहात म्हणाले " पण यापूर्वींच तुझ्या साशंक मनानं माघार घेत-ल्यानं सुधाकर तुला अंतरला नसेल असं कशावरून ?"

माझ्या दृष्टीपुढें निराशेची काळोखी आल्यासारखें होऊन, सर्वस्व शून्यवत् भासूं लागलें. माझ्या अवि-चारामुळें आणि स्वार्थामुळें सुधाकर मला खरेच अंतरले असतील, हें शक्य आहे का ? माझ्या मूर्खपणानें व साशंकपणानें सुधाकर मला खरंच दुरावले असतील काय ? माझें हृदय भरून आलें. मी नकळत उठून उभी राहिल्यें व खिडकीशीं गेल्यें. स्वामीमहाराजहि उठून मजजवळ येऊन खिडकीशीं उभे राहिले.

" प्रेम संपादन करणं इतकं कठीण नाहीं, इतकें प्रेमसंरक्षण करणं कठीण आहे, बरं. " ते ह्मणाले " गैरसमज आणि तात्कालिक सहानुभूतीचा अभाव यांचें फल हृत्ताप व वियोग हें होय. "

माझे डोळे पाण्यानें भरून आले. स्वामीमहाराजांचा प्रत्येक शब्द माझा हृदयभेद करीत होता. मी केविलवाण्या दृष्टीनें खिडकीबाहेर पाहिलें. चंद्रप्रकाशांत बाहेरील तो विस्तृत हिमाच्छादित प्रदेश तळपत होता. महाबळेश्वरास एकच आठवड्यापूर्वी अशाच चंद्रप्रकाशांत सुधाकर मजजवळ उभे होते. त्याची मला एकदम आठवण झाली. एकच आठवडा, पण यावेळीं मला तो केवढा दीर्घकाळ असा वाटला, मी शेवटीं म्हटलें,

"सुधाकर मला अंतरले, तर मी मृत्यूला पत्करीन. सुधाकरावांचून मी मृतच नाहीं काय ?"

महाराजांनीं दीर्घ निश्वास सोडला.

" मुली, आत्मा एका जीवनांतून दुसऱ्या जीवनांत आपल्या संवगड्याकरितां कसा उडी घेऊं शकतो, त्याची आतां तुला कल्पना येईल. जेथें प्रेम नाहीं, तेथें खरें जीवन नाहींच. पण तुला घाबरण्याचं कारण नाहीं. मात्र तूं आपलं मन निश्चल आणि एकनिष्ठ ठेव. सुधाकर तुझाच आहे, त्याचा आत्मा बहुतेक तुजजवळच घुटमळत असतो. तूं बहुतेक सारखी त्याच्या हृदयांत वास करते आहेस; आणि म्हणून तो जणूं तुजजवळ वावरत आहे,—पहा !"

असें ह्मणून महाराजांनीं क्षणभर आपल्या दोन्हीं हातांनीं माझे डोळे झांकून धरले. डोळ्यांवरून त्यांनीं आपले हात दूर करतांच मी हर्षातिशयांत बुडून गेल्यें. चंद्रप्रकाशांत तळपणाऱ्या त्या हिमप्रदेशावर सुधाकरांचें तें विद्युन्मंदिर चकचकूं लागलें. सपक्ष होऊन या खिडकींतून त्या मंदिरांत उडून जावें, असें मला झालें. पण गुरुमहाराजांच्या मंत्रसामर्थ्यानें उत्पन्न झालेलें तें ऐंद्रजालिक मंदिर होतें; सुधाकरांचें खरें मंदिर नव्हतें. हें मी जाणून होतें. दुःखावेगांत माझ्या जीवाला सुख देण्याकरितां त्यांनीं दाखविलेलें तें मायावी मंदिर. त्याकडे मी टक लावून पहात राहिल्यें. क्षणभरानें तें अस्पष्ट दिसूं लागून, दुसऱ्या क्षणांत अदृश्य झालें.

" हें सुख क्षणभंगुर खरं, " अदृश्य झालेल्या चित्रावरून गुरुमहाराजांकडे दृष्टि वळवून मी ह्मटलें; " प्रेमहि असंच अशाश्वत न ठरो."

" प्रेम जर अशाश्वत असेल, तर तें प्रेमच नव्हे." गुरुमहाराजांनीं उत्तर केलें; " सामान्य स्त्री पुरुषांमध्यें वास करीत असलेल्या सामान्य आकर्षणाला विनाशी विकाराला प्रेम ही संज्ञा देतात; पण तें खरं प्रेम नव्हे. खरं प्रेम करणाऱ्या स्त्रियांहून खरं प्रेम करणारे पुरुष कमी. पण तुला आज शिकवावयाचं आहे तें तत्त्व, जीवन शक्तीचं स्वामित्व आणणं हें होय. सर्वांनांच हें जीवनशक्तिस्वामित्व येत नाहीं. तें तुझ्या अंगीं येणं, हें सर्वस्वीं तुजवरच अवलंबून आहे. तरी त्या तत्त्वासंबंधीं ज्ञान तुला मी आज द्यावयाचं ह्मणतों."

स्वामीमहाराज खुर्चीवर बसले; मीहि हा प्रथमाध्याय सावधान चित्तानें ऐकण्याकरितां त्यांच्या समोरील खुर्चीवर बसल्यें. समोरच्या मेजावर ज्या वस्तु होत्या, त्याकडे इतकावेळ माझं लक्ष गेलेलें नव्हतें. त्यांत कापडानें आच्छादिलेली अशी एक वर्तुळाकार वस्तु होती. तिचं आच्छादन काढून महाराजांनीं ती दाखविली; चमत्कारिक अशा कांहीं द्रव पदार्थांनीं भरलेला तो कांचेचा गोळ होता; द्रवपदार्थ स्वच्छ असून त्यांत असंख्य सतेज कण चमकत होते.

" हें नीट बघ. " ते ह्मणाले; " एका महा तपस्व्याचं हें अगदीं साधं प्रकटीकरण आहे. हे सतेज व सगतिक कण मानवी देहघटनेंतील व्यापार दाखवीत आहेत. त्यांतील कित्येक अगदीं विभिन्न दिशेनं जात आहेत; तरी पुनः परस्परांनां भेटून एकत्र होत आहेत व पुनः विभक्त होत आहेत. हे अखिल दृश्यांतील विधायक व विध्वंसक शक्तिदर्शक आहेत. हे मुक्त स्थितींत एका सूत्रधारक इच्छाशक्तीच्या लगामीं असतात. आपला प्रत्येकाचा देह या परमाणूंचा बनलेला असून दैवी उत्पादक शक्तीची अंशभूत अशी जी आपली इच्छाशक्ति, तिच्या ते लगामीं असतात. आपण जर विधायक परमाणू नीट लगामीं ठेविले, तर ते त्यांचे प्रतिस्पर्धी जे विध्वंसक परमाणू त्यांनां आहारीं आणतील. या नियमाहून साधा असा दुसरा नियम नाहीं. हा नियम पाळला, ह्मणजे जीवन व यौवन यांचें संरक्षण झालंच पाहिजे. या नियमाचे सर्वपालन आपल्या इच्छाशक्तीच्या प्रयत्नांत आहे. तो प्रयत्न होतांच, सृष्टींतील सर्व कांहीं तिच्या मुठींत आलं. अगदीं सृष्टिसर्वस्व इच्छा शक्तीच्या मुठींत आहे, हें लक्षांत ठेव. या कांचेच्या गोलांत सध्यां जे परमाणु कोंडिलेले आहेत, ते कोणत्याहि इच्छेच्या लगामीं

नाहींत. पण आणखी कांहीं तास जर त्यांनां तसंच कोंडून ठेविलं, तर ते हा गोल फोडून एखाद्या इच्छाशक्तीच्या कक्षेत जातील. ते ' वस्तुपाठ ' म्हणून तुजकरितां या गोलांत आणून कोंडिले आहेत. विधायक व विध्वंसक परमाणु ही नुसती कल्पना नसून वस्तुस्थिति आहे, हें यावरून तुझ्या लक्षांत येईल; या कांचगोलाप्रमाणें तुजमध्येंहि जडचैतन्य परमाणु कोंडिलेले आहेत; व त्यांनां लगामीं ठेवणारी इच्छाशक्तीहि तुजमध्यें आहे. त्या इच्छेचा उपयोग करून तूं आपल्या संवर्धनाला हितकर असा त्यांचा उपयोग करूं शकशील किंवा अहितकर असा उपयोग करूं शकशील. नाहीं का ?"

" होय, " मी उत्तर केलें " पण असा इच्छाशक्तीचा प्रयत्न नेहमीं करतां येईल ?"

" असा एकहि क्षण नसतो कीं ज्या वेळीं तूं जाणून वा न जाणून कांहीं इच्छित नाहींस" स्वामीमहाराज म्हणाले; " आणि अशा अगदीं क्षुद्र गोष्टी इच्छिण्यांत तुझी जी शक्ति खर्च होते, त्या शक्तीनं सूर्यमालेंतील एखादा ग्रहहि उचलतां येईल समजलीस ? पण अगदीं साधं उदाहरण घेऊं. हा माझा हात मी उचलीत आहे. ही क्रिया नैसर्गिक किंवा यांत्रिक, असं आपण समजतों. पण खरं पाहतां, ती उचलायचं मी इच्छितों, म्हणूनच तो उचलतो, असं नाहींका ? तो उचलण्याचं मी इच्छिलं नाहीं, तर तो आपोआप उचलणं, शक्य नाहीं, खरंना ? ही महाशक्ति, इच्छाशक्तीची ही दैवी देणगी, बहुसंख्यांक पुरुष व स्त्रिया उपयोगांतच आणीत नाहींत म्हटलं तरी चालेल. म्हणूनच त्यांचं सैरावैरा धावणं. म्हणूनच त्याचें या नाहीं तर त्या मताला निमूट मान वाकविणं. म्हणूनच अल्पसंख्यांक नेत्यांची त्यांच्यावर सहजासहजीं लीलेनं प्रस्थापित होणारी सत्ता. म्हणूनच अवघ्या समाजाचें स्पर्शजन्य रोगाप्रमाणं पसरणाऱ्या वेड्या समजुतीला बळी पडणं. हे सर्व प्रकार अनेकाग्र इच्छाशक्तीचे परिणाम होत. इच्छाशक्ति एकाग्र केली, तर स्वर्ग खरोखरच भूतलावर येईल. पण सर्व मानवतेला हें ज्ञान आम्हाला शिकवितां येत नाहीं, म्हणून अगदीं शेलक्या व्यक्तींनांच हे शिक्षण देऊन आम्हीं संतुष्ट राहिलं पाहिजे. 'इच्छाशक्तीचा प्रयत्न नेहमीं करतां येईल काय ?' असं तूं विचारलंस. त्याला उत्तर 'होय. इच्छाशक्तीचा उपयोग अर्थातच नेहमीं करतां येणं शक्य आहे, ' असंच आहे. त्याची गुरुकिल्ली निश्चयाचं बळ. भय, अनिश्चितता, रोग, त्रास, क्षय, दौर्बल्य, अपयश, अपूर्तता यासंबंधीं विचारांनां मनांत वाव दिला कीं आपणामधील विध्वंसक परमाणूंनां आपलं काम करण्यास आपण प्रोत्साहन देतों, आणि मग आस्ते आस्ते आपण रुग्ण व भ्याड होऊन, मानसिक व शारीरिक रोगांचं घर बनतों. याच्या उलट जर आपले विचार आरोग्य, चैतन्य, यौवन, आनंद, प्रेम व उत्पादन याविषयीं असतील, तर आपणामधील जीवनोत्तेजक परमाणूंनां प्रोत्साहन मिळून आपणाला नवशक्ति, नवबुद्धि यांचा लाभ होतो. मानव मर्त्य कां असावा, तें आजपर्यंत कोणाहि शास्त्रज्ञानं शोधून काढलेलं नाहीं. मानवानं अमर्यादित कालपावेतों जगावं, अशी त्याची शारिरिक रचना आहे. तो स्वतःच आपलं मरण ओढून आणतो. ज्यांनां अपघात म्हणतात, ते सुद्धां त्यानंच आपल्या निष्काळजीपणानं घडवून आणिलेले होत. मी सांगतों आहे हें आकलन करायला जितकं सोपं आहे, तितकंच आचरण करण्याला कठीण आहे. म्हणून इतउत्तर तूं या आश्रमांत असशील, तोंपर्यंत तुझ्या इच्छाशक्तीला कित्येक दिव्यांतून जावं लागेल. जीवन, यौवन, प्रेम याविषयींच्या तुझ्या शोधनांत तुला कितपत यश येणार, तें या दिव्यांतून तूं जशी उतरशील, त्यावरून कळून येणार आहे. तुजमध्यें निश्चयाचं बळ दिसून आलं, तुजमधील दैवी अंशाच्या केंद्राच्या ठिकाणीं तूं निश्चल आहेस, असं दिसून आलं, कीं सर्व कांहीं ठीक होईल. आणि एक गोष्ट लक्षांत ठेव, कीं तूं स्वतःमधील परमाणूशक्तींनां नियंत्रित करण्यास एकदां समर्थ झालीस, कीं तुझ्या वातावरणांत येणाऱ्या सर्व परमाणूशक्तींनां तूं नियंत्रित करूं शकशील. या रीतीनं तुजमध्यें, बहुजनसमाज जिला चमत्कार करून दाखविण्याची शक्ति, म्हणून म्हणतो ती येईल. पण खरं पहातां, ती 'चमत्कार' करून दाखविण्याची शक्ति नव्हे; तर पुरुषाचं प्रकृतीवरील स्वामित्व दाखविण्याची शक्ति होय, इतकंच. तुला केवळ स्वतःमधील शक्ति नियंत्रित करितां येईल. इतकंच नव्हे, तर सृष्टिमधून तुला त्या शक्तींत भर घालतां येईल. हवा, प्रकाश, वृक्ष, पुष्पें हीं सर्व तुला तुझ्या मागणीप्रमाणं आपली शक्ति देत जातील. माग म्हणजे मिळेल; शोधन कर म्हणजे लाभेल, दार ठोठाव कीं तें उघडलं जाईल. नैसर्गिक नियम असा आहे कीं तुला जें मिळालं असेल, तें निस्सीम प्रेम, औदार्य,

दया, सहानुभूति यांच्या रूपानं परत दिलं पाहिजे; तें फक्त मानवतेसच नव्हे, तर सर्व जीवांनां. आपला ममतेचा एक शब्द द्विगुणित ममतेनं भरून परत येतो. ज्यांनां घेण्याचं ठाऊक, देण्याचं ठाऊक नाहीं, त्यांनां जीवनांत बहुतेक अपयश ठेविलेलं. पण ज्यांनां देण्याचं ठाऊक आहे, घेण्याचं ठाऊक नाहीं त्यांनां परमात्मा अनंत हस्तानं देत असतो. हा अध्यात्मिक नियमच आहे. कीर्ति ह्मणा, संपत्ति ह्मणा सर्व कांहीं अशा व्यक्तींनां मिळालंच पाहिजे. "

" मला कीर्तीची अपेक्षा नाहीं; संपत्तीचीहि नाहीं " मी ह्मणाल्यें; " मला फक्त प्रेम पाहिजे. तें मिळालं, कीं सर्व कांहीं आलं. "

स्वामीमहाराजांनीं स्मित केलें.

" प्रेम मिळालं, कीं सर्व कांहीं आलं. खरंच, मुली, प्रेम मिळालं, कीं कोणालाहि काय, सर्व कांहीं आलं असंच आहे. प्रेमलाभ झाला, कीं परमात्म्याच्या हृदयाच्या हृदयांत तुझा प्रवेश झाला, असंच ह्मणायचं. सर्व प्रकारच्या औदार्याचं, सर्व प्रकारच्या सहनशीलतेचं, सर्व सर्व प्रकारच्या धैर्याचं प्रेरक प्रेमच होय; आणि मला वाटतं, तुजमध्यें प्रेमाची ही प्रेरकशक्ति वास करते आहे. कारण तू आपल्या पहिल्या स्वतंत्र प्रयत्नांत चांगलं धैर्य दाखविलं आहेस; आणि या तुझ्या धैर्यानंच मला या वेळीं तुजजवळ बोलायला आणिलं आहे. आह्मी अध्यात्मविद्यार्थी ज्याला 'अग्नीचं प्रथम वर्तुल' ह्मणतों, त्या वर्तुलांतून तूं स्वेच्छेनं उतरली आहेस, आणि ह्मणून तूं आपल्या दिव्याच्या इतर भागांतून उतरण्यास सिद्ध झाली आहेस आतां, तुला तुझ्या पूर्वीच्या खोलींत नेऊन पोंचवितों. कारण तुझ्या दिव्याशीं तुला एकटीलाच तोंड द्यायला हवं ! "

मी कांहींशी धैर्यगलित झाल्यें. पण कांहींहि बोलल्ये नाहीं. स्वामिमहाराजांनीं तो कांचगोल उचलिला व क्षणभर आपल्या दोन्ही हातांत धरला; नंतर पुनः तो खालीं ठेवून वस्त्राच्छादित केला. दुसऱ्याच क्षणीं तेथील दीपज्योतीला त्यांनीं निरोप दिला. त्यावर, खिडकीशीं चंद्रप्रकाशाच्या झोतांत आम्ही जाऊन उभीं राहिलों. तेथें जाऊन आम्ही उभीं राहिलों नाहीं, तोंच महाराजांनीं मला हातीं धरून जिन्यातून खालीं आश्रमाबाहेर उघड्या हवेंत नेलें. आमच्या पायाशीं तुटलेला कडा व त्याखालीं हिमाच्छादित मैदान हीं दिमन होती. चंद्रिकेच्या मधुर प्रकाशांत अवर्णनीय उल्हासाचा मला अनुभव आला; व सहज स्वामीमहाराजांकडे मी दृष्टि टाकली. त्यांच्या मुखश्रीवर अमानुष तेज झळकत होतें. स्वामीमहाराजांची सत्तरी उलटली असल्याचें सुधाकर म्हणाले होते; त्याची मला आठवण होऊन मी चकित झाल्यें. सत्तर वर्षांचे हे वृद्ध तर ऐन उमेदींत दिसत होते. स्वामीमहाराजांच्या बाबतींत वयाचा प्रश्न हास्यास्पदच नाहीं कां ? मी साश्चर्य त्यांच्याकडे पहात असतां, त्यांनीं दोन्हीं हात वर करून आकाशस्थ ज्योतींनां वंदन केलें. आणि सुधामधुर स्वरानें म्हटलें.

" ब्रह्मांडमालेच्या महासूत्रधारा, तुझी सेवा करूं इच्छिणाऱ्या या जीवाचा स्वीकार कर. सज्ञान व उन्नति ह्यांप्रत पोंचण्याला तिला सहाय्य कर आणि ज्या या सृष्टींत तिचं जनन, तीशीं तिची एकतानता कर. निःशब्द व शांत रजनी, तुझी गाढ–प्रगाढ शांतता तिला लाभूं दे. द्युतिमान् चंद्रा, दिव्य स्वप्नांचा प्रकाश तिच्या अंतरात्म्यांत पोंचूं दे. आणि हे हिमसागरा नगाधिराजा, तुझें सामर्थ्य व तुझी उच्चता यांचं तिला दान कर. आणि वातावरणाच्या संपत्तींतून सर्व स्वास्थ्य, सर्व सौंदर्य, सर्व जीवन, सर्व माधुर्य हीं तिला लाभोत. म्हणजे तिचं जीवित विश्वाला आनंदकर होईल. आणि तिचं प्रेम हें परमात्म्याची कृपाच ठरेल. "

गुरुमहाराज मज अबलेकरितां ही करुणा भाकीत असतां, मी रोमांचित झाल्यें. त्यांचे पाय धरावे असें मला झालें. पण या वेळीं त्यांनां तें रुचणार नाहीं, हें जाणून मी मुकाट उभी राहिल्यें.

महाराजांनीं पुन्हा मला हातीं धरून ते चालूं लागले. उंच–उंच–उंच आणि वांकड्या तिकड्या अशा एका जिन्यानें आम्ही चाललों. जिन्याच्या माथ्यावर येतांच, त्यांनीं कफनींतील खिशांतून किल्ली काढली व एक लहानसें दार उघडिलें.

" मुली, ही तुझी खोली " गंभीर पण प्रेमळ स्वरांत ते म्हणाले; " येतां आतां तुझं भवितव्य केवळ तुझ्या हातीं आहे, लक्षांत ठेव. "

मी क्षणभर त्यांचा हात आपल्या दोन्ही हातांत धरून ठेविला.

" महाराजांचं दर्शन पुनः मला मिळणार नाहीं का ?" मी सकंप स्वरांत विचारिलें.

अर्थात्. तूं जर आपल्या दिव्यांतून उतरलीस, तर अर्थातच मी भेटेन. पण एरव्हीं, हीच शेवटची भेट."

" पण जर दिव्यांतून मी उतरल्यें नाहीं, तर-तर मग पुढं माझी गत काय ?"

" गत ती काय व्हायची बाळे ?" ते ह्मणाले; " तुझी इथून सुरक्षित रवानगी होईल; व आपल्या घरीं जाऊन तूं आपल्या नित्य व्यवसायाला लागशील. सामान्य गतभर्तृकांसारखा, कदाचित् त्याहून थोडा उच्च प्रकारचा असा तुझा जीवनक्रम होईल; आणि कालांतरानं तुझी ही हिमालयाची सफर आपल्या अविचाराचं स्मारक असं तुला वाटूं लागेल. जनरूढि तुला आपली दासी करील."

" कधीं नाहीं." मी उद्गारल्यें; " मी दिव्याला उतरल्यावांचून कधीं रहाणार नाहीं. "

गंभीरपणानें त्यांनीं मजकडे पाहिलें; नंतर उन्नत हस्तांनीं त्यांनीं मला आशीर्वाद दिला व खोलींत जाण्याची हातानें खूण केली. मी तत्काळ आंत गेल्यें. त्यांनीं लागलींच दार लावून टाकिलें; खोलीचें कुलूप लाविलेलें मला ऐकूं आलें, व तदनंतर त्यांच्या पावलांचा ध्वनि दूर दूर जातांनाहि मला ऐकूं आला. खोलींत वर विद्युद्दीप जळतच होता. मी सकाळीं येथून गेल्यें, तेव्हांप्रमाणेंच सर्व वस्तु जेथल्या तेथें दिसत होत्या. भोंवतालच्या शांततेनें मनाला शांतता वाटल्यामुळें, गुरुमहाराजांनीं दिलेला 'प्रथमाध्याय' लिहून काढावा, असें मी मनांत आणिलें. अंगावरील आरक्त कफनी उतरून खुंटीवर ठेविली. लिहिण्याचें सर्व सामान टेबलावर ठेविलेलें होतेंच ! मी सकाळीं येथून गेल्यानंतर व आतां येथें परत येण्याच्या दरम्यान तें ठेविलेलें होतें, हें उघडच. लिहिण्याकरितां खुर्चीवर बसल्यें, व टाक हातीं घेतला. पण एकाग्रता कशी ती येईना. भोंवतालची शांतता प्रगाढ होऊं लागली. खिडकी उघडी होती, तरी ध्वनि म्हणून कसलाहि ऐकूं येईना. ही प्रगाढ शांतता प्रतिक्षणीं प्रगाढ तर होतच होती. शेवटीं थंड असें वाटावयास लागलें. मानवी स्पर्श, मानवी ध्वनि यांच्या आवांक्यापलीकडे असलेल्या अशा स्थळीं आपण जातों आहों, असें मला वाटूं लागलें. आणि आपण सर्वस्वीं एकटी आहों, असें उभ्या जन्मांत मला कधीं वाटलें नव्हतें इतकें आतां वाटूं लागलें.

---

प्रकरण सोळावें

# छायाध्वनि

शांतता अधिकच प्रशांत झाली. माझी नाडीहि अधिक जलद चाललेली मला ऐकूं येऊं लागली, असें वाटलें. एक प्रकारची अनिर्वाच्य, अस्पष्ट भीति मला ग्रासूं लागली. मी तिला झिडकारून टाकण्याचा प्रयत्न केला व पुढ्यांतल्या टेबलावरील कागदांकडे पाहून लिहावयास लागल्यें. गुरुमहाराजांनीं दिलेला प्रथमाध्याय मी कधीं विसरेन हें शक्य नव्हतें; तरी लिहून काढावा, असें योजून मी लिहिण्यास आरंभ केला. पण काय ? आरंभ केला इतकेंच. मला कसेसेंच वाटावयास लागलें व खोलींत कोणीतरी द्वितीय व्यक्ति असून ती मजकडे निरखून पहात आहे असें मला निश्चितपणें वाटूं लागलें.

मी एकदम डोकें वर उचलून सभोंवार पाहिलें. पण प्रथम कोणीहि दिसेना. एकदोन क्षणांत मी व खिडकी यांच्या मध्यंतरीं एक दुर्भेद्य कृष्णतम अशी सावली मला दृग्गोचर झाली. प्रथमतः तिला सुस्पष्ट आकार असा कांहीं दिसेना. पण क्षणोक्षणीं तिला आकार येत येत, मानवी देहाकृतीहून निराळा असा, सुस्पष्ट आकार आला. मी टाक खालीं ठेविला व हृदय धडधड करीत होतें तरी या विलक्षण तिमिराकृतीकडे पहात राहिल्यें. मी पहातां पहातां, खोलींतील विद्युद्दीप मालवला गेला. मी एकदम भीतीनें ओरडण्याच्या बेतांत होतें, तों खिडकींतून आंत आलेला चंद्रप्रकाश माझ्या दृष्टीस पडला. त्या चंद्रप्रकाशांत ती आकृति अधिकच भीषण दिसूं लागली. ती स्थिर नव्हती. क्षणोक्षणीं उंच उंच होत, खालीं मजकडे पहात होती असें मला वाटलें. मी तिकडे सभय पहात असतां माझ्या शरिरांतील शीरनिशीर

ताणली जात होती. त्या तिमिराकृतीचे दोन्ही विशाल, सतेज नेत्र माझ्या नेत्रांतून भेद करून माझें अंतर्याम पहात आहेत असें मला वाटलें. मला यावेळीं काय वाटलें आणि काय नाहीं त्याचें वर्णन करणें कठीण आहे भीतीनें मी देहभान विसरतें कीं काय, असें मला झालें. माझें डोकें फिरावयास लागलें; आणि वाणींत उच्चार करण्याची शक्ति उरली नाहीं.

थरथर कांपत, एकदम अवसान आणून मी उठून उभी राहिल्यें. या भीषणाकृतीपासून दूर पळून जावें कीं काय? असा क्षणभर मनांत विचार आला; पण दुसऱ्याच क्षणीं, असें वाटलें, कीं भ्याडाप्रमाणें पळून जाण्यानें माझी भीतीहि जाणार नाहीं. किंवा ही भीषणाकृतीहि जाणार नाहीं. दोन्ही माझा पाठलाग करतीलच. ह्मणून मी आपले डोळे मिटले व मज-मधील माझा केंद्र–माझा भयातीत आत्मकेंद्र–शोधून काढण्याकरितां अंतर्प्रवेश केला. क्षणांत माझी भीति कमी झाली हें सांगावयास नकोच. त्याबरोबर मी आपले डोळे उघडले व पहात्यें तों ती आकृति अधिकच कृष्ण झालेली अशी दिसूं लागली. हें पाहून मला अधिक धैर्य आलें. ही तिमिराकृति माझ्या जीवाला काय अपाय करणार? ही का मला भीतीनें ठार करील? तसें झालें, तर माझाच दोष. मी भ्यावेंच का? ज्याला 'मरण मरण' ह्मणून आपण म्हणतों, तें सजीव स्थित्यंतर असल्यामुळें, तें केव्हांहि आलें काय, किंवा कसेंहि आलें काय, एकच नाहीं का? असें मी आपल्या अंतर्यामीं विचारूं लागल्यें.

भीतीबद्दल जबाबदार कोण? बाह्यतः अमंगल गोष्टींतील अंतिम मंगलहेतुविषयीं शंका वाटण्या-इतकी, विश्वाच्या दैवी व्यवस्थेंत अश्रद्धा कोणाची? माझ्या भीतीला उत्तेजक मीच स्वतः एकटी नाहीं काय? आणि माझ्या अंतिम मंगलाच्या योजनेहून, ही मूक तिमिराकृति माझें कांहीं अधिक करूं शकेल काय?

हे विचार मनांत येतांच मला धैर्य आलें; माझा कंप नाहींसा झाला. प्रतिक्षणीं कृष्णतर होणारी ती गूढ तिमिराकृति माझी गुप्त हितकर्तीच होय, असें मी निश्चित ठरविलें. दृष्टी वर करून धिटाईनें मी तिजकडे पाहूं लागल्यें. ही माझी निर्भय वृत्ति जसजशी स्थिर होऊं लागली, तसतसें माझें धैर्यहि वाढू लागलें. खुर्चा माग सारून मी एकदम उभी राहिल्यें. उभी राहतांच मला द्विगुणित धैर्य येऊन, आत्मविश्वास आला; आणि समोरील कृष्णाकृति अधिकाधिक भीषण दिसूं लागली होती, तरी मी मंदगतीनें तिजकडे जाऊं लागल्यें. तिला उद्देशून बोलण्याचा मी प्रयत्न केला व शेवटीं बोलल्येंहि;

"तूं कोणीहि अस," मी मोठ्यानें ह्मणाल्यें "परमेश्वरी इच्छेविना तुला अस्तित्वच नाहीं. हिता-करितां नाहीं, असं कांहींहि तो मंगलधाम परमेश्वर घडवीत नाहीं. तेव्हां माझें अहित करण्याकरितां तूं येथें येणं शक्य नाहीं. मी जर भीतीग्रस्त झाल्यें तर माझी भीति ह्मणजे माझीच दुर्बलता होय. मला तूं कांहीं अपाय करूं शकशील किंवा अपाय करूं इच्छि-शील, असें मी मुळींच समजत नाहीं. तूं कोण आहेस, हें पहाण्याकरितां मी तुजकडे येत आहे. तुझी ही कृष्णा-कृति कशाची घडलेली आहे, तें मला पाहूंदे. तुझ्या या भीषणबाह्या, आंतलं तुझं खरं स्वरूप मला पाहूंदे. मजविषयीं तुझा हेतु कांहींहि असो, माझ्या अंतरा-त्म्याला अपाय करणं तुझ्या शक्तीबाहेरचं आहे हें मला पक्कं ठाऊक आहे."

मी बोलत असतां त्या तिमिराकृतीच्या जसजशी जवळ जात होत्यें, तसतशी तिची प्रकाशित रेखा सुप्रकाशित होत होत शेवटीं एकदम विविधवर्णीय विद्युत् माझ्या दृष्टीपुढें चमकून माझे डोळे दिपले. त्यासरशीं मी मटकन् खालीं बसल्यें. नंतर वर पाह-तांच मी त्या आकृतीला साष्टांग प्रणिपात केला. कारण, पहात्यें तर, तिचा कृष्णवर्ण जाऊन ती पूर्ण तेजोमय दिसत होती. तिचें मुख इतकें उज्वल होतें कीं मी मूक आश्चर्यानें त्याकडे पहात राहिल्यें. सभोंवार सुमधुर संगीत चालू आहे असेंहि मला वाटलें. पण त्याकडे लक्ष न देतां मी मजसमोरील दिव्य मूर्तीकडे पहात राहिल्यें. क्षणभरांत त्या दिव्यपुरुषाच्या मुखावर स्मित झळकूं लागून, सुधेहून मधुर असे स्वर मला ऐकूं येऊं लागले.

"धन्य तुझी!" ती दिव्य व्यक्ति ह्मणाली. "असंच निर्भयपणें तिमिराला नेहमीं तोंड देत जा, ह्मणजे तेजाचा लाभ तुला झालाच. श्रद्धायुक्त चित्तानं दुःखाला तोंड देत जा ह्मणजे सुखलाभ ठेवलेलाच. परमेश्वरी इच्छा तुझं अहित करण्याची नाहीं, तुला अपाय करण्याची नाहीं, किंवा शासन करण्याचीहि नाहीं. त्याच्या पायीं सत्त्व वहा; आणि शांतिप्रत जा."

संध्याराग रजनीमध्यें जसा मंदगतीनें विलुप्त होतो, तशी मंदगतीनें ती दिव्य मूर्ति विलुप्त झाली. मी भानावर येऊन सभोंवार पाहूं लागल्यें, तों नितांत शांतता व अंधकार. एव्हांना चंद्रहि अस्तंगत झालेला होता. कितीतरी वेळ या अद्भुत अनुभवावांचून दुसरे कसलेहि विचार मनांत येईनात. मी जरा धीर करून त्या भीषण तिमिराकृतीकडे न जातां भ्याडाप्रमाणें पळून जाण्याचा प्रयत्न करत्यें, तर काय झालें असतें बरें? आश्रमांतील प्रत्येक द्वार मला उघडें सांपडून, माझें पलायन सुगम झालेलें मला आढळून आलें असतें. आणि मग सर्व ग्रंथ आटोपता. आश्रमाचें महाद्वार मला बंद होऊन माझ्या आकांक्षेची समाधीहि कदाचित् आश्रमाच्या अंगणांत बांधली जाती. या वेळेपर्यंत तरी मी दुर्बलता दाखविली नाहीं याबद्दल मनांतल्या मनांत मला आनंद झाला; आणि झोंपेची गुंगी वाटूं लागल्यामुळें खाटेवर जाऊन पडल्यें. वृत्ति संतुष्ट असल्यामुळें लागलीच मी झोंपींहि गेल्यें.

झोंप किती वेळ काढली, कांहीं सांगतां येत नाहीं. पण जागी झाल्यें, तों अगदीं जवळ खाटेजवळील भिंतीपलीकडे कोणीतरी बोलत आहे असें वाटलें. बोलणारे पुरुष असून त्यांपैकीं एक दोघांचे आवाज घोगरे व कर्णकटु असे होते. खोलींत प्रकाश पडला होता; कारण रात्र सरून प्रभात झाली होती असें मला वाटलें. भिंतीपलीकडील संभाषण चालूंच होतें व त्यानें माझें लक्षहि वेधलें.

" हे योगानंद स्वामी म्हणजे भोंदूंचे मुगुटमणीच नाहीं का?" एक म्हणाला; " आपल्या अंध भक्तांचें आराध्यदैवत बनून स्वारी त्यांनां कशी फसविते आहे पण."

यावर थोडा हंशा झाला.

" एकंदरींत ही व्यक्ति असामान्य, यांत कांहीं शंका नाहीं. निखारे तोंडांत टाकणाऱ्या जोगड्यांची विद्या स्वारीला चांगलीच साधली आहे. ज्याला 'चमत्कार' 'चमत्कार' म्हणून म्हणतात, ते सर्व प्रकार याच्या हाताचा मळ आणि अर्थात् अजाण भाबड्यांनां श्रद्धाळू बाया बापड्यांनां–"

" या पलीकडल्या खोलींतल्या बाईसारख्या—" पहिला वक्ता मध्येंच म्हणाला.

" हो—या खोलींतल्या बाईसारख्या. वेडी बिचारी" आणखी हंशा झाला; "सुधाकरावर प्रेम बसलं आहे, असं तिला वाटतं आहे."

मी एकदम उठून बसल्यें व श्रवणेंद्रियाची सर्व शक्ति एकवटून ऐकूं लागल्यें. दोन तीन मिनिटेंपर्यंत कोणी कांहीं बोलेना; पुढें काय बोलतात तें ऐकण्याच्या माझ्या उत्सुकतेमुळें हीं दोनतीन मिनिटें मला दीर्घकाळ अशीं वाटलीं.

" सुधाकर बेटा गमती माणूस खरा." बारीक आवाजाची कुणी तिसरीच व्यक्ति म्हणाली, कुणा तरी बाईला नादीं लावून ठेवीत असतो तो. अर्थातच नादीं लागण्यासारख्याच नादीं लागणार कुणाच्याहि."

" अशा कितीतरी आहेत या जगांत." पहिला वक्ता म्हणाला; " प्रेमाच्या बाबतींत बहुतेक स्त्रिया अंधच."

" निदान आत्मप्रेमाच्या बाबतींत खास."

यावर कोणी कांहीं बोललें नाहीं. मी खाटेवरून उठल्यें. मला हुडहुडी भरल्यासारखें झालें. खिडकीशीं जाऊन बाहेर दृष्टि फेंकिली, तो खालचा विस्तीर्ण प्रदेश प्रातःकाळच्या कोमल प्रकाशांत प्रशांत दिसत होता; माझ्या हृदयांत संशयजन्य भीतीचें वादळ उठलेलें व बाहेर सर्वत्र शांति–प्रगाढ शांति पसरलेली. पण भिंतीपलीकडील संभाषण पुनः सुरू झालेलें ऐकूं येऊं लागलें, म्हणून तें मी ऐकायला लागलें.

" एकूण आटोपलंच सगळं म्हणतां. स्वेच्छेनें चिरंजीवन धारणा करतां येईल, हें त्याचं मत अकालीं निजधामीं गेलं शेवटीं. कुठें कुठेंसं त्याचं तें विद्युन्मंदिर अग्निनारायणानं हस्तगत केलं अखेरी?"

" या हिमालय प्रदेशांत. या आश्रमाजवळच एके ठिकाणीं!"

याचा अर्थ काय, क्षणभर मला कळेचना. आणि म्हणून प्रश्न व उत्तर दोन्ही मी पुनः उच्चारिलीं; ' कुठेसं त्याचं तें विद्युन्मंदिर अग्निनारायणानं हस्तगत केलं?" या हिमालय प्रदेशांत. या आश्रमाजवळच एके ठिकाणीं!"

म्हणजे काय? त्यांचें तें विद्युन्मंदिर? अग्निनारायणानें हस्तगत केलं? कोणाचें विद्युन्मंदिर? सुधाकराविषयीं का बोलताहेत हे? 'आटोपलंच सगळं शेवटीं?' स्वेच्छेनें चिरंजीवन धारणा करतां येईल, हें त्यांचें मत अकालीं निजधामीं गेलं शेवटीं? माझे सुधाकर, ज्यांचे पाय मला अनेकदां मुकले, पूर्वपुण्याईनें जे मला पुनः लाभले ते माझे सुधाकर का पुनः मुकले? देवा, माझ्याच चुकीनें ते मला पुनः मुकले नाहींत काय? मी

धांवत त्या भिंतीजवळ जाऊन कान भिंतीला लावला व 'नाहीं, हें शक्य नाहीं. देवाधिदेव इतका निर्दय नाहीं.' असें स्वतःशीं पुटपुटूं लागल्यें. कितीतरी वेळ कोणीच कांहीं बोललेलें ऐकूं येईना. माझें धैर्य व आत्मसंयमन हीं मला सोडून जाऊं लागलीं; तों एकदम संभाषण ऐकूं येऊं लागलें.

"अशा विद्युन्मंदिरांत–प्रत्यक्ष विजेच्या पोटीं राहणं हेंच धोक्याचं नाहींका?" एकजण सौम्य स्वरांत ह्मणाला; "आतां त्याची रचना मोठी चाणाक्षपणाची होती यांत शंका नाहीं. पण वीज ती, वातावरण प्रक्षुब्ध होतांच तिचा काय नियम धरणार?"

"हें तर सिद्ध झालंच आतां." दुसरा कुणी म्हणाला; "जरासा सोंसाट्याचा वारा, आकाशांत थोडीशीं ढगें आणि विजेची चमक, हीं दिसतांच, या विद्युन्मंदिराची यजमानासह राखरांगोळी झाली नाहीं का?"

"सुधाकराला आपला जीव बचावतां आला असता ह्मणतात. पण आपल्या चाकरनोकरांबरोबर त्यानं आपलीहि आहुति दिली अग्निनारायणाला झालं."

"असं झालं काय?"

यावर कोणीच कांहीं बोलेना. माझें हृदय दुभंग होतें कीं काय, असें मला झालें. जर सुधाकर इहलोक सोडून गेले असले, तर मी अभागिनीनें पूर्ववत् जीवन कंठायचें काय? मी त्यांच्याविषयीं संशयवृत्ति धरली होती, त्याजबद्दल हें मला शासन मिळालें काय? पुनः संभाषण सुरू झालें. न्यायाधीश शिक्षा फर्मावितांना अपराधी ती ज्या वृत्तीनें ऐकतो तशाच सभय वृत्तीनें मी तें ऐकूं लागल्यें.

"योगानंद अर्थातच तिला हें कळवील. मोठेंच बिकट काम, कारण आपल्या विद्यादानाचा सुधाकराला काडीचा उपयोग झाला नाहीं, असंच जवळ जवळ कबूल करणं भाग आहे स्वारीला; आणि शिवाय, सुधाकर ही व्यक्ति एकंदरींत चित्ताकर्षकच खरी. मलादेखील खरोखर वाईट वाटतं त्याच्या निधनाबद्दल. आतां तो जगता तर या बाईला त्यानं वेडच लावलं असतं यांत शंका नाहीं."

"शंकाच नाहीं, आणि तेंहि स्वाभाविकच. पण त्याच्या जाळ्यांत सांपडल्याबद्दल दोषी तीच. नाहीं का?"

मी कांपत कांपत भिंतीजवळून दूर झाल्यें, खाटेवरची शाल उचलून पांघरली आणि खिडकीबाहेर सूर्योदयाची शोभा फांकली होती, ती पहात राहिल्यें. पण त्या देखाव्यांत माझें चित्त रमणें या वेळीं शक्य नव्हतें. आतांच ऐकल्याप्रमाणें सुधाकर जर आपल्या विद्युन्मंदिरांत भस्मीभूत होऊन गेले असतील, तर मग आमच्या गतजन्माविषयींच्या त्यांनीं सांगितलेल्या दृश्य कथा व ज्या प्रेमबंधनानें आम्हाला एकत्र केलें तें प्रेम, हीं सर्व फसवी मायाच नव्हे काय? खिडकीबाहेर मी वांकल्यें व खालीं खिडकीजवळ असलेल्या फुलझाडाच्या कुंडीकडे पाहिलें; तों तें झाड पूर्वीप्रमाणें आत्मविश्वासानें आपला सुगंध दरवळीत होतें.

अस्तित्वांत नसणाऱ्या गोड गोष्टींचीं स्वप्नें पाहून त्यांत आम्हाला रमविणें ही देवाची फसवेगिरीच नाहीं का? प्रेमाचा अंत जर निराशा व विश्वासघात तर आम्हाला प्रेम करावयास लावणें हा देवाचा निर्दयपणाच नव्हे का? आमच्या जीवांची अशी थट्टा करण्यापेक्षां, 'जीवन हें रुक्ष आहे,' 'जीवन हें खडतर आहे' अशी जाणीव आम्हांत उत्पन्न करणें हें अधिक चांगलें नाहीं?

असे विचार माझ्या मनांत चालले असतां एकदम मला गेल्या रात्रीच्या त्या कृष्णछायेची व तिच्या दिव्य रूपांतराची आठवण झाली. त्या भीषण तिमिराकृतीनें उत्पन्न केलेल्या भीतीला जर मी जिंकूं शकले, तर आतांच आपलें आत्मसंयमन मी कां गमवावें? आतांच्या भीतीचें कारण तरी काय? केवळ ध्वनीच नव्हत का? भिंतीआडून, मृत्यु व फसवेगिरी याविषयीं सांगणारे ते ध्वनि; मला माहिती नसलेल्या व दृश्यमान न होणाऱ्या व्यक्तींचे ते ध्वनि; समाजजिव्हेप्रमाणें निंदा करण्यांत आनंद मानणारे, स्तुति करण्यांत कृपणता दाखविणारे ते ध्वनि; त्यांची ती किंमत कितीशी? पण ज्यांनां मी आपले पंचप्राण वाहिलेले, त्या सुधाकरांविषयीं ते अमंगळ बोलत होते, नाहीं का? मग मला तें बोलणें ऐकावयास नको? त्यांच्या फसवेगिरीविषयीं ते बोलत होते, तें मी ऐकूं नये?

त्याच्याविषयीं अशा बेपर्वाईनें बोलणाऱ्या या व्यक्ति तरी कोण? आश्रमांत आल्यापासून, योगानंद स्वामी व त्यांचे शिष्य हरानंद यांशिवाय कोणाचीहि माझ्याशीं भेट झालेली नाहीं; मग माझा येथें येण्याचा हेतु त्या दोघांवांचून तिसऱ्या कोणास कळणार? माझी मला शंका येऊन या भिंतीआडच्या वदंतेच्या सत्यतेबद्दल मला जबर संशय वाटूं लागला. सुधाकरांनां जर

कांहीं अपाय झाला असता, तर स्वामींनीं आपल्या योगबलानें मला विद्युन्मंदिराचें दृश्य दाखविलें त्यावेळीं सुधाकर खुशाल असल्याचें सांगितलें, तें सांगितलें असतें का? तरी मला कसें तें स्वस्थ वाटेना. खालीं खिडकीखालील बगीच्यांत जाण्याच्या दाराकडे पाहिलें, तों तें बंद. गुरुमहाराजांनीं तें बंद केल्याचें मला आठवलें, पण त्याच्या ऐवजीं दुसरें एक दार सताड उघडलें असल्याचें आढळून आलें. भिंतींत जिथें दार असेल, असें स्वप्नींहि आलें नसतें तेथें तें दार पाहून मला आश्चर्य वाटलें; त्या दारांतून पहात्यें तर पलीकडे एक खोली. खोलींत पाऊल टाकिलें; पण आपण करतों तें चांगलें, कीं वाईट याविषयीं निश्चित असें कांहींहि मन सांगेना. तरी पुढें गेल्यें. तों भिंतीपलीकडील संवाद अधिकच मोठ्यानें ऐकूं येऊं लागला; मी एकदम उभी राहिल्यें. भ्यायल्यें, पण आणखी काय ऐकायला मिळतें तें ऐकावें, ऐकण्यानें जरी दुःखच होणार तरी सारें कांहीं ऐकावें, असें वाटून ऐकत उभी राहिल्यें.

"बायका तिथून शंख."

किरकिट्या स्वरांत एक व्यक्ति म्हणाली; या सुधाकरावर कितीजणींनीं तरी प्रेम केलं. पण बिचाऱ्या साऱ्यांची शेवटीं फसगत झाली."

मी सकंप झाल्यें. "सुधाकरांवर कितीजणींनीं तरी प्रेम केलं." हे केवळ ध्वनि, पण ते ऐकतांना हृदयाला किती वेदना होत होत्या. यांत तथ्य तरी किती, तें कळेल का? गुरुमहाराज येऊन खरा प्रकार काय तो कळवितील का? दुःखाच्या तंद्रींत तिथेंच उभी राहून, या ध्वनींच्या कठोरतेविषयीं, निर्दयतेविषयीं मी विचार करूं लागल्यें. समाजजिव्हाध्वनींशीं यांचें केवढें साम्य. उपहास, निंदा करणारे ते ध्वनि; सुखाचा किंवा सहाय्याचा एक शब्दहि न उच्चारतां अमृताचा पाऊस पाडणारे ते ध्वनि: आत्म्याच्या सात्त्विक आकांक्षा चुरडून टाकण्यांत आसुरी आनंद मानणारे ते ध्वनि; प्रेमाला पारखे झालेले, द्वेष व मत्सर यांवर पोसलेले ते ध्वनि; देवा, मानवतेचे हे कठोर निंदाध्वनि जर मूक होतील तर भूतलावर स्वर्ग कां नाहीं उतरणार?

पण आपण ते ऐकावेच कां म्हणून? आपल्याला त्यांच्याशीं काय करावयाचें आहे? वाऱ्यावर ऐकूं येणाऱ्या मतानें आत्म्याचा केंद्र ढळावा काय? माझी कृति अमक्याला संमत आहे किंवा तमक्याला संमत नाहीं, हें कळून मला काय करावयाचें आहे? लोकवदंतेनें मी अस्वस्थ कां व्हावें? अथवा अमंगल वार्तेनें मी भयग्रस्तहि कां व्हावें?

या विचारांत मी गर्क असल्यामुळें खोलींतील प्रशांत पावित्र्याची मला कल्पना आली नव्हती. ते ध्वनि बंद झाल्यानंतर कांहीं वेळानें जेव्हां मी भोंवतालीं दृष्टि टाकली, तेव्हां मला या खोलींतील वस्तु दिसून आल्या. हरिकाप्रमाणें तेजस्वी असें एक लहानसें बिलोरी टेबल व त्यावर एक उघडून ठेविलेलें पुस्तक. त्यासमोर वाचावयास बसण्याकरितां एक खुर्ची ठेविलेली. जवळ जाऊन पाहतां पुस्तकावर "श्रद्धावंत छात्रास—योगानंद याजकडून" असें लिहिलेलें, मी श्रद्धावंत आहे काय? असा मी आपल्या मनाला साशंक प्रश्न केला. भीति व निराशा हीं श्रद्धेचीं लक्षणें काय? भिंतीपलीकडचे ध्वनि ऐकून आत्मसंयमन गमविलेली मी. 'आपल्या हिताला विघातक असें कांहींहि देव घडवीत नाहीं,' असें समजणारी मीच, क्षणांत सुधाकरांचें अमंगल देवानें घडवून आणल्याचें समजलें. विधियोजनेनें ज्यांच्याकडे मला आणली, त्या सुधाकरांचें निधन त्या विधीनें घडवून आणिलें, असें समजून घाबरून जाणारी मी. जिला दिव्य पुरुषाच्या दर्शनाचा लाभ होऊन, "परमेश्वरी योजना तुला अहितकर नाहीं; परमेश्वरी इच्छा तुला अपायकारक नाहीं, तुला शासन द्यावयाची नाहीं. परमेशाला सत्त्व वहा व शांतिप्रत जा." असें आश्वासन मिळालें, ती मी धैर्यगलित होऊन सबल श्रद्धेला विमुख झाल्यें. मला माझी लाज वाटूं लागली. भीत भीत मी त्या टेबलापुढील खुर्चीवर बसल्यें. मी बसल्यें न बसल्यें तोंच भिंतीपलीकडील संभाषण अधिकच मोठ्यानें चाललेलें ऐकूं येऊं लागलें.

"तिला वाटतें कीं आपल्याला जीवनरहस्य शिकून कळेल. वेडी बिचारी."

"अहो नाहीं. तिला जीवनरहस्य नको आहे कळायला. तिला कळून घ्यायचें आहे तें चिरकालिन यौवनरहस्य, आणि तेंच स्त्रीजातीला सर्वस्व."

यावर मोठा हंशा पिकला.

"सुधाकरानें या ध्येयाकडे बरीच प्रगति केली होती. त्याचें खरें वय कळायला खरोखरच कठीण जाई."

"त्याच्यात तारुण्याची ईर्षा आणि ओज असे." दुसरा वक्ता म्हणाला, "प्रेमचैतन्याची तर तो केवळ मूर्ति होता. स्त्रियांचा संबंध आला कीं तो मूर्त चैतन्यच.'

अधिकच हंशा झाला. मी बिलोरी टेबलापाशीं खुर्चीवर बसून निश्चलपणें शब्दनिशब्द ऐकत होत्यें.

"त्याच्या मोहनीला बळी पडलेली अलीकडची स्त्री हीच, नाहीं का ?"

"हो त्याच्या मोहनीनं घेतलेला शेवटचा बळी ही; कारण स्वारी आतां बळी घ्यायला उरली आहे कुठं ?"

"मला वाटतें, योगानंद जर तिला हें वर्तमान कळवील, तर ती इथून तत्काळ जाईल."

"अर्थातच मग कशाला राहील ती ? प्रेमाभासानं केवळ ती इथं आलेली. प्रेमाभास उलगडला कीं काय उरलं मग ?"

खरेंच मग काय उरलें ? सर्व विश्व मग शून्य. प्रत्यक्ष स्वर्गहि मग पोकळ आशा. हातावर मी आपलें डोकें टेंकून स्वस्थ बसल्यें. हे ध्वनि जें सांगतात तें खरें असेल काय ? संभाषण बंद पडून सर्वत्र निःशब्द झालें. माझ्या खिशांतलें सुधाकरांचें पत्र मी काढलें व त्यांतला प्रत्येक शब्द पुनः वाचला.

"जीवनाला अंत नाहीं. तूं व मी दोघेंहि हें जाणतों आहोंत. प्रेमाची अनंतता व प्रेमजीवनाचें सौंदर्य यांविषयीं मनांत शंका येऊं देण्याइतके आपण अजाण नसलें पाहिजे." विशेषतः हीं वाक्यें मी कितीदां तरी वाचली.

"शंका येण्याइतके आपण अजाण नसलें पाहिजे." खरोखर, मी अजाण नाहीं काय ? शंका व अमंगल कल्पना यांनां मी मनांत वावरूं देत नव्हत्यें का ? आणि तें कां ? तर भिंतीपलीकडले ध्वनि तसें सांगतात म्हणून ? खरोखर, दुःखाला हें किती वेडें कारण ? निराशेच्या तिमिरमय गर्तेत माझें मन पडलें होतें. तें तेथून बाहेर काढण्याचा मी प्रयत्न करूं लागल्यें. अमंगल कल्पनेंतून मनाला बाहेर घेण्याकरितां माझ्या-पुढें टेबलावर उघडून ठेविलेल्या पुस्तकाकडे मी पाहिलें; त्याकडे पाहतां सुवर्णाक्षरांत छापलेलें त्याचें नांव "जीवनवेद" हें सूर्यप्रकाशाप्रमाणें एकदम माझ्या दृष्टिसमोर झळकलें. मनांत तीव्र लालसा उद्भूत होऊन, मी सुधाकरांचें पत्र खिशांत ठेविलें; व खुर्ची अगदीं टेबलाला लागून घेऊन पुस्तक वाचूं लागल्यें. सभोंवार नितांत शांतता भरलेली; भिंतीपलीकडचे ध्वनि मूक झालेले; वाचतां वाचतां मला दिसून आलें, कीं मी जें वाचीत होत्यें, तें मला ज्ञानदान करण्या-करितां योजिलेलें; तसेंच तें पुस्तकहि मलाच. मी "श्रद्धावंत छात्र" ठरल्यास, स्वामीमहाराजांकडून दान झालेलें. सकृतज्ञ आशेनें माझ्या हृदयावरचें निराशेचें दडपण दूर केलें व क्षणांत मी 'इतउत्तर ते ध्वनि ऐकणार नाहीं' असा निश्चय केला.

"सुधाकर इहलोक सोडून गेलेले नाहींत." मी मोठ्यानें म्हणाले; "ते माझा त्याग करणार नाहींत. ते असा विश्वासघात करणार नाहींत, ते मला फस-वणार नाहींत, माझी त्यांच्या ठिकाणीं श्रद्धा आहे. असा त्यांनां पूर्ण विश्वास आहे. आणि माझी त्यांच्या ठिकाणीं पूर्ण श्रद्धा राहणार. माझें प्रेम व माझी श्रद्धा हीं केवळ वदंता ध्वनीनें टळणारी नाहींत. 'मी भीरु व दुर्बल' असें त्यांनां वाटण्याला मी कारण देणार नाहीं. माझी त्यांच्या ठायीं अक्षय श्रद्धा राहणार."

हे शब्द हवेंत फेंकून देऊन मी शांत चित्तानें वाचावयास लागल्यें; तों भोंवतालच्या शांत वातावर-णांत एकदम अदृश्य पुष्पांचा परिमल दरवळून गेलेला मला आढळून आला.

---

## प्रकरण सतरावें

# जीवनवेद

माझें लक्ष गढून गेलेल्या या पुस्तकांतील कांहीं निवडक उतारे देण्यापलीकडे मला कांहीं करतां येत नाहीं. हें देण्याचा माझा हेतु आपल्या जीवनाला केवळ व्यावहारिक स्वरूपाहून उच्च असें स्वरूप देऊं पहाणा-रांनां त्यांचा उपयोग व्हावा हा होय; शिवाय, ते सुबोधहि आहेत. माझ्या परिशीलनाकरितां मजपुढें ठेविलेल्या या पुस्तकांतील विवेचन सहज बोधकर असून अर्वाचीन शास्त्राच्या शोधाला धरून होतें;

त्यामुळें मी जसजशी तें वाचीत चालल्यें, तसतसा मला अंधःकारांतून प्रकाश दिसूं लागून जग ज्या गोष्टींनां " चमत्कार " म्हणून म्हणतें, परंतु ज्या केवळ मानवी बुद्धीच्या शास्त्रीय उपयोगानें घडवितां येतात, त्या गोष्टी घडवून आणण्याचें सामर्थ्य कसें येईल, तें मला स्पष्ट कळत चाललें. पहिल्या उताऱ्याचें नांव " जीवन व नियंत्रितता. "

" जीवन ही प्रेमाची दैवी प्रेरणा. विश्वाच्या मागें असलेली शक्ति प्रेम होय. या प्रेमांतून इच्छा व उत्पत्ति यांचें जनन झालेलें. प्रियकर ज्याप्रमाणें प्रणयिनीच्या लाभाची इच्छा करतो व तदनंतर त्यांच्या प्रेमशृंगारांनीं प्रेमसंतति निर्माण होते, त्याचप्रमाणें, परमेश्वर दिग्वधूला आपलीशीं करून, त्यांच्या लीलांनीं असंख्य सूर्यमालांची उत्पत्ति होते. पृथ्वीवरील मानव हा या दैवी लीलेचें एक लघु अर्भक होय; तरी इतर प्राणि सृष्टीहून त्याच्यांत विचार, इच्छा व बुद्धि हीं उच्च प्रमाणांत वास करीत असल्यामुळें व त्याला प्रेममय अविनाशी आत्म्याचा लाभ झाला असल्यामुळें तो केवळ ' सोहं ' ' मी ' देव म्हणण्याला पात्र आहे. जीवनेच्छेनें व चिरंजीवानें तो देवत्व पावलेला आहे. जडदृष्ट्या तो असंख्य परमाणूंचा समूह होय; पण त्या समूहांत जो दिव्यात्मा वास करितो आहे तो त्या समूहाला स्वेच्छेनें अनंत काल एकत्र ठेवूं शकतो. आपली जीवनधारणा त्याला आपल्या सूत्रीं ठेवितां येते; तो तिचा नाश करूं शकेल, वा वर्धन करूं शकेल. साधरणपणें तो स्वार्थानें व दुराग्रहानें तिचा नाशच करीत असतो व याचा परिणाम ' मृत्यु.' हा अर्थातच त्यानें आपण होऊन आणलेला; या मृत्यूमुळें त्याचें केवळ स्थित्यंतर होत असतें. आपलें जीवन आपल्याला या भूतलावर अनंत कालपर्यंत यौवनांत व सुस्थितींत राखतां येतें हें जर मानवाला एकदां कळेल, तर तो दिवस वा वर्षे यांची मोजदाद न करितां अध्यात्मिक अवस्थांची मोजदाद करील. आणि मग त्याला आनंद व विजय हीं श्वासोच्छ्वास क्रियेवत् सुलभ होतील. शारिरीक शक्तीकरितां व्यायाम करितांना आपलें शरीर ताठ ठेवावें व अवयवांची हालचाल मोहक होऊं द्यावी, म्हणजे चांगलें असें समजण्यांत येतें. तसेंच शारिरीक शक्तीच्या व धैर्याच्या कसरतीहि करणें चांगलें असं मानितात. मग आपल्या आत्म्यालाहि आपल्या शरिराप्रमाणेंच ताठ ठेवण्यास मानवानें कां शिकूं नये ? असें केल्यानें त्याला नैसर्गिक व अध्यात्मशक्तीचें पूर्ण स्वामित्व येणार नाहीं काय ? छात्रा, जीवनाची गूढशक्ति व यौवनस्थिति ही नियंत्रिततेंत आहे. शरिराच्या प्रकट परमाणूंनां आत्माधिकाराशीं संलग्न कर, देहविश्वाचा देव हो. आपल्या सूर्यमालेचा चालक हो; म्हणजे तुला चिरंतन वसंतसुख ठेवलेलें. प्रेम तुझ्या जीवनाला ग्रीष्मप्रकाश देऊं दे. प्रेमाला तुजमध्यें उदात्त वासना, शुद्धानंद व ज्वलत् श्रद्धा यांचें जनन करूं दे. तूं परमात्म्याचा अंश आहेस ही जाणीव ठेव; आणि तुझ्या उत्पादक जीवनांत तो दिव्यांश दिसूं दे. तुझ्या आत्म्याच्या शोधनाला अखिल विश्व उघडें आहे. मात्र तुझा मार्गदर्शक दीप प्रेमाचा असूं दे."

इतकें वाचून मी थांबल्यें. जिथें मी वाचीत बसल्यें होत्यें ती खोली अंधुक दिसावयास लागली. कीं ती माझीच कल्पना ? मला विषाद देणारे ते ध्वनि ऐकूं येताहेत का, म्हणून मी पाहिलें, पण कांहींहि ऐकूं येईना. म्हणून पुढ्यांतील पुस्तकाचीं पानें चाळूं लागल्यें; तों पुढील उतारा आढळलाः—

" विचारांचा परिणाम "

" विचार ही विश्वांतील कोणत्याहि चालकशक्तीहून बलवत्तर अशी चालकशक्ति आहे विचार हें केवळ मेंदूच्या विवक्षित भागांतील चलन नव्हे; तें चलन बंद होतांच, विचार शून्यवत होत नाहीं. विचार ही आत्म्याची वाणी होय. ज्याप्रमाणें मानवी वाणी टेलिफोनच्या तारेंतून कांहीं अंतरावर वाहून नेतां येते, त्याचप्रमाणें आत्म्याची वाणी मज्जातंतून मेंदूपर्यंत जाते. मेंदू तिचें ग्रहण करितो; पण त्याला तिचें रक्षण करितां येत नाहीं. ती स्वतःच्या विद्युत्शक्तीनें दुसऱ्यांच्या मेंदूपर्यंत जाऊन पोंचते; सूर्यप्रकाशाचा जसा कोणालाहि मक्ता घेतां येत नाहीं, तसा आपला विचारहि कोणाला आपल्या डोक्यांत ठेवितां येत नाहीं. विश्वांत सर्वत्र आत्मे, मज्जेच्या सहाय्यानें परस्परांशीं बोलत असतात. ते आत्मे केवळ या भूतलावरीलच नसून पहिल्या प्रतीच्या दुर्बिणीनें दृश्यमान होणाऱ्या ताऱ्यांइतके आपणापासून दूरचे होत. गायकाला सुचणारें स्वरमीलन 'गुरु'च्या ग्रहावरून अथवा मृगाच्या ताऱ्यावरून त्याच्या मर्त्य मज्जेवर पडलें असण्याचा संभव आहे. कवी आपल्या स्वप्रप्रेरणेला मान वाकवून, अननुभूत गोष्टी लिहीत

असतो. आपण सर्वच याप्रमाणें विचारवाहक यंत्रें होत. प्रथम हे विचार आपण दुसऱ्या लोकांवरून ग्रहण करितों; नंतर आपणाकडून दुसऱ्याकडे सोडून देतों. कविमुकुटमणी शेक्सपियर म्हणतो "सर्व गोष्टींचें जनन विचारांतून; मग त्या गोष्टी चांगल्या असोत वा वाईट असोत." अध्यात्मशास्त्रांतील हा एक महासिद्धांत होय. जसे आपले विचार तसे आपण. आपले विचारच आचाररूप होतात.

जीवनविकसनांत आणि यौवनसंरक्षणांत विचार हे मुख्य घटक होत. वार्धक्याचे विचार वार्धक्य आणितात; उलटपक्षीं यौवनाचे विचार जीवनशक्तीचे संरक्षक होत. आपली देहघटना ज्या सजीव अणूपरमाणूंनीं झालेली आहे, त्या अणूपरमाणूंवर आपल्या विचारक्रियेचा परिणाम घडतो; ह्मणून आपल्या विचारवृत्तीनें आपण त्यांनां वृद्ध करीत असतों, किंवा नवजीवन देत असतों. मानवी आत्म्याची विचारवृत्ति कृतज्ञतेची, प्रेमाची, आनंदाची असावी. भीति, दुःख रोग अथवा मृत्यु यांनां अध्यात्मसृष्टींत वाव नाहीं. सृष्टीघटनेंत विधात्याचा हेतु सौख्याचा आहे; देह व आत्मा यांनां सौख्याशीं एकतान करून आपण परमेश्वरी नियमन व इच्छा हींच पाळतों. म्हणून दीर्घायु व्हायला सौख्याचे विचार प्रोत्साहि कर. रोग, आपत्ति, विनाश यांविषयीं वक्तृत्व करणाऱ्या व्यक्ति शक्य तितक्या दूर ठेव. कारण, ही त्रयी मानवी पातकजन्य होय; सुंदर विधियोजनेशीं विरोध केल्यानें ती जन्मलेली होय. प्रकाश व शुद्ध हवा यांचा आकंठ उपभोग घे. पुष्पलतातरूंच्या परिमलांत निमज्जन कर. जनसंमर्द स्थानें व पुरें यांपासून दूर रहा. तुझ्या निढळाच्या घामानें जें धन मिळेल, त्यांत संतुष्ट रहा; आणि मुख्यतः हें लक्षांत ठेव कीं प्रकाशबालकांनां अंधकाराची भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं."

हें शेवटलें वाक्य वाचतांच मी थांबून सभोंवार पाहिलें; तों भोंवतालीं अंधकार पडत असून खोलीहि अगदीं लहान दिसूं लागली; इतकी, कीं, माझे हात मी बसल्यें होत्यें तेथून सभोंवारच्या चारहि भिंतीला पोंचूं लागले. मी प्रथम खोलींत येऊन खुर्चीवर बसल्यें तेव्हां त्या भिंती इतक्या जवळ खास नव्हत्या. मग हें कसें झालें? मला कांपरें भरावयास लागलें, पण मी असें भ्यावें का म्हणून? असा मनाशीं निश्चय करून पुढ्यांतलें पुस्तक पुढें वाचूं लागल्यें. यापुढील माझें लक्ष वेधणार उतारा हा होयः—

"जीवनशक्तीचें स्वामित्व."

दीर्घायुलाभ व्हायला जीवनशक्तीवर पूर्ण स्वामित्व यावयास हवें. तुझा देह ज्या अणूपरमाणूंनीं घडलेला आहे, ते चिरगतिक आहेत. तुझ्या आत्म्यानें त्यांनां इष्ट मार्ग दाखविला पाहिजे. नाहींतर ते अव्यवस्थित सेनेप्रमाणें पहिल्या हल्ल्यासरशीं सैरावैरा पळतील. ते जर तुझ्या आत्म्याच्या नियंत्रणेंत असतील, तर तूं खचित रोगमुक्त आहेस. रोग तुझ्या देहांत एखाद्या असंरक्षित मार्गावांचून येण्याचा संभव नाहीं. दुसऱ्याच्या चुकीनें व तुझ्या स्वतःच्या स्वच्छंदीपणानें अपघात होण्याचा संभव आहे. तुझ्या स्वच्छंदीपणानें तो झाल्यास त्याचा दोष तुजकडेच. दुसऱ्याच्या चुकीनें झाल्यास, त्याचा अर्थ असा करावयाचा कीं, प्रस्तुत क्षेत्रास तूं अयोग्य, म्हणून विधियोजनेनें तुझें तेथून स्थित्यंतर झालें. असे अपराध विचारांत न घेतां, तुझ्या इहदैहिक जीवनाला अंत नाहीं. तुझा आत्मा प्रकाशजन्य होय; तुझ्या देहांतील प्रत्येक अणूपरमाणूला नित्य नवजीवन कर. प्रकाश देण्याचें त्याच्या ठायीं सामर्थ्य आहे. तो जीवनशक्तीचा अखंड सांठा आहे, तुझ्या जीवनशक्तीला तो अखंड पोषक होईल. मानव आत्मसंरक्षणाच्या बाह्योपायांची योजना करतो; पण त्याच्या ठायीं असलेल्या अंतःसामर्थ्याला तो विसरून जातो. भूतमात्रीं प्रेम व भूतमात्रीं स्वामित्व या दोन गोष्टींकरितां या अंतःसामर्थ्याचें अस्तित्व. भूतमात्रीं प्रेम म्हणजे अखिल सृष्टीवर प्रेम. भूतमात्रीं स्वामित्व म्हणजे आधीं मानवी देहाचे घटक जे अणूपरमाणू त्यांच्यावर स्वामित्व व त्यांचें नियंत्रण; नंतर या वैयक्तिक स्वामित्वानें व नियंत्रणानें भूतलावरील इतर सर्व शक्ति व सगतीक अणूपरमाणूं यांजवर स्वामित्व. घन पदार्थभेदी 'प्रकाशरश्मि'विषयीं आजकाल आश्चर्य वाटतें आहे; पण त्यांचा हा शोध खरोखर चमत्कारांचा श्रीगणेशा होय. प्रत्यक्ष घन धातूंचा भेद करणारे प्रकाशरश्मि आहेत, इतकेंच नव्हे; तर भूगर्भांतील व समुद्रहृदयांतील सुवर्णरत्नादि अमोलिक संपत्ति दाखविणारे रश्मि आहेत. अध्यात्मविद्यापारंगतावांचून इतरांनां त्यांची कल्पनाहि नाहीं. खरा अध्यात्मविद्यापंडित केव्हांहि निर्धन असणें शक्य नाहीं. ज्या ठायीं जीवनशक्तीचें पूर्ण स्वामित्व, त्याठायीं दारिद्र्यवास

अशक्य. निसर्गाशीं एकतान असलेल्या आत्म्याचे आनंद, शांति व समृद्धि हे स्वाभाविक सहचर होत; आणि जीवनाचें चिरंतनत्व या जीवनानंदांतच ठेवलेलें.

छात्रा, ताठपण धर. तुझ्या आत्म्याला देहांतील अणूपरमाणूंचा स्वामी कर. जें जें ह्मणून हितकर, त्यावर असें स्वामित्व कर कीं तें तुझ्या इच्छेला तत्काळ मान वाकवील. खरी आत्मश्रद्धा एक अणुभर कां असेना, प्रत्यक्ष या हिमालयाला उचलून सागरांत फेकील. तुझ्या मृण्मय देहांतील आत्मा दैवी आहे, देवांश आहे हें लक्षांत ठेव. आणि देवाला काय अशक्य आहे ?"

मी डोकें वर उचलून दीर्घ निश्वास सोडला. कांहींसें गुदमरल्यासारखें वाटावयास लागलें; ह्मणून भोंवतालीं बघतें, तर खोलीच्या चारहि भिंती अगदीं माझ्या खुर्चीशीं येऊन भिडलेल्या. मला त्यांनीं जणूं खुर्चीशीं खिळूनच टाकलें. मी उभें रहाण्याचा यत्न केला; तों उभें रहातां आलें. ज्या दारानें मी खोलींत आल्यें, तें दार माझ्या हाताशींच. पण कांहींतरी अदृश्य शक्ति मला अडवितें आहे असें वाटलें; ऊर धडधड करूं लागला. तों अकस्मात् माझी दृष्टि पुढ्यांतल्या पुस्तकांतील पुढील वाक्यांकडे जाऊन मी तीं वाचलीं:—

" जो जीव आपल्या अमर स्वरूपाचें ज्ञान करून घेणार नाहीं, त्याला जीवन हें संकुचित कोठडीप्रमाणेंच होय. देवाची अखिल सृष्टि त्याच्या इच्छा पुरविण्यास सिद्ध असतांहि त्याला उपासमार काढावी लागते. भय, संशय, अविश्वास, क्रोध, मत्सर आणि काठिण्य यांनीं त्याचें जीवन पंगु होतें. त्याची कर्तृत्वशक्ति खाली जाते. प्रेम, धैर्य, सोशिकपणा माधुर्य, औदार्य, आणि सहानुभूति हीं त्याला व त्याच्या देहाला जीवनबल देणारीं होत. समाजाची सर्व शक्ति त्याला विरोधक होय. सृष्टीची सर्व शक्ति त्याला सहाय्यक होय. शुद्ध निसर्गाचा प्रत्येक घटक त्याची आज्ञा पाळायला सिद्ध असतो. आणि सुखकर जीवनाला याहून अधिक तें काय पाहिजे ? दुःख व निराशा इच्छेच्या दुरुपयोगाचीं फळें होत. दुःखाचें व निराशेचें भूतलावर वा स्वर्गांत दुसरें तें कारण कोणतें ?"

इच्छेचा दुरुपयोग. मी मोठ्यानें उद्गारल्यें व पुढें वाचूं लागल्यें.

" स्वर्ग—स्वर्ग तें काय आहे ? पूर्ण सुखाची स्थिति. सुख ह्मणजे काय ? दोन आत्म्यांचा चिरसंयोग. परस्परांच्या विचारांचे भागिदार झालेल्या, परस्परांवर आनंदाचा वर्षाव करणाऱ्या प्रेमानें व सहानुभूतीनें एकमेकांनां आचारमाधुर्य व आकारसौंदर्य देणाऱ्या दोन आत्म्यांचा अमर योग, ह्मणजेच सुख ! अशा जीवांनां जरा शिवत पाहीं, मृत्यु उरत नाहीं. ते मरणातीत होऊन आपत्तिविमुक्त होतात. ते स्वयंविश्व होऊन विश्वमाला निर्माण करितात. प्रेमानेंच सत्कृत्यें होतात; प्रेमानेंच भाग्यश्री लाभते; प्रेमानेंच किर्तिविजय यांची प्राप्ति होते. असे प्रेमबद्ध जीव परमेशाच्या कृपेंतले होत. त्यांचें प्रेम दैवी असतें; अनंत असतें. प्रत्यक्ष देवाधिदेवहि प्रेमरूप आहे. प्रेमाहून उच्च काय आहे ?"

या ठिकाणीं मला काय वाटलें नकळे. मी एकदम पुस्तक उचलून उराशीं धरलें. मी असें करतांच, घनदाट काळोख मजसभोंवतीं होऊन, मेघगर्जनांचा कडकडाट झाला; आणि ती सर्व खोली खालीं खालीं जाऊं लागून एकदम थांबली. माझें डोळ्याचें पातें लवतें न लवतें, तों खोली नाहींशी होऊन तिच्या जागीं सभोंवार तरुराजी. ' हा काय चमत्कार ?' असें मनाशीं ह्मणतें तों समोरून हे कोण येताहेत, प्रत्यक्ष सुधाकर. पण त्यांच्याबरोबर ही कोण तरुणी ? त्यांच्या हातांत हात घालून चाललेल्या या रूपयौवन–संपन्न स्त्रीला पाहून मी पाषाणशीलेसारखी निश्चल झाल्यें. सुधाकरहि तिजकडे कसे प्रेमपूर्ण नेत्रांनीं–प्रियकराच्या दृष्टिनें पहात आहेत. ते तिशीं किती अकृत्रिम प्रेमभावानें बोलताहेत तरी !

" प्रिये !" ते तिला म्हणाले; " मी तुला गेल्या अनंत जन्मीं याच नांवानं संबोधित आलों आहें, नाहीं का ? उत्कंठित आत्मा आपल्या विधिनियोजित सहचारिणीचें शोधन करतांनां चुकतोहि कित्येकदां. त्याप्रमाणें माझेंहि झालें होतें. तुझी भेट होण्यापूर्वी एका बालविधवेला मी आपली जन्मोजन्मींची सहचारिणी समजून फसलों होतों; पण आतां तो भ्रम दूर होऊन तूं माझी खरी खरी अर्धांगी मला सांपडली आहेस. आतां मी तुला आपल्या हृदयांतून दूर कुठंतरी जाऊं देईन का ? पण तूंहि मला असंच वचन दे कशी !"

तिनें उत्तर केलें; " हें काय विचारणं गडे. वचन तें काय द्यायचं ?"

हातांत हात घालून चालत तीं दोघें थेट मजकडे येत होतीं. मी त्यांच्या वाटेंतच नीट उभी राहिल्यें;

हेतु हा कीं, सुधाकरांनां तरी मी दिसावी व त्यांच्याकरितां मी या हिमाचलाची यात्रा खरीखुरी केली आहे हें त्यांनां कळावें. येथवर तरी आपल्या कर्तव्याला मी चुकलेली नाहीं; तेच आपल्या कर्तव्याला विन्मुख झालेले आहेत, हें त्यांच्या दृष्टीस आणून द्यावें. विषण्ण दृष्टीनें मी त्यांची मार्गप्रतीक्षा करीत राहिल्यें. ते अगदीं जवळ आले; मजकडे पाहून त्यांनीं किंचित् स्मित केलें, त्यांच्या त्या 'सहचारिणी'नें मजकडे टक लावून पाहिलें; व तीं दोघेंहि पुढें गेलीं. मी त्यांनां हटकावयाचें मनांत आणिलें असतें. तरी तें मजकडून होतें नाः इतकी मी विमुढ होऊन गेल्यें. शेवटीं असें व्हावें काय ? मी हा इतका दूरचा प्रवास केला, तो याचकरितां का ? त्यांनीं दुसरीला आपलें सर्वस्व अर्पूनहि टाकलें ना ?

अशा विचारांनीं गोंधळून मी अगदीं वेड्यासारखी झाल्यें. विचाराबरोबर पायहि चाललेच होते. पायाखालीं मृदु मखमालीसारखें गवत असून वनराजीमधून मंद सुगंधवातलहरी वहात होत्या; त्यांनीं थोड्या वेळांत माझा मनःसंताप हलका करून मला बरेंच भानावर आणिलें. माझ्या हातीं तो 'जीवनवेद' ग्रंथ होताच. आतां याचा काय उपयोग, असें मला झालें. प्रेम जर असत्य, तर जीवनाची किंमत काय ? डोकीवर घनदाट वृक्षपल्लवांवर सूर्य तळपत होताः वृक्षशाखांवर पक्षी गात होते; पण दृश्यसौंदर्य हीं आतां मला काय होत ? निश्चल प्रेमाच्या शपथा कवडीमोल व्हाव्यात का ? या जाणिवेवांचून दुसरी कसलीहि जाणीव मला राहिली नाहीं. दाही दिशा शून्य होऊन, केवळ एक 'मृत्यु' हाच सर्वस्व वाटूं लागला. पायच गळून गेल्यासारखें होऊन मी सावकाश कष्टानें चालत होतें. स्वामिमहाराजांची यावेळीं भेट होती तर त्यांनां मी म्हणतें, "बस्स झालं आतां. प्रेमानंच त्याग केल्यावर इतउत्तर यौवनाचं वा जीवनाचं रहस्य कळून काय करायचं आहे मला ?"

आणखी थोड्या वेळानें मी नीट सुसंगतपणें विचार करूं लागल्यें. सुधाकर आपल्या विद्युन्मंदिरांत भस्मीभूत झाल्याचें वृत्त सांगणारे भिंतीपलीकडचे ध्वनि थोड्या वेळापूर्वी मी ऐकिले होते. तें वृत्त जर खरें तर सुधाकर येथें कसे आले ? मी कर—कर—कर विचार केला; व शेवटीं निश्चित केलें कीं खरें प्रेम पालटत नाहीं. सुधाकरांच्या प्रेमावर माझी श्रद्धा आहे कीं नाहीं हाच विचार करण्याचा प्रश्न. पण 'चक्षुर्वैसत्यम्' झालें नाहीं का ? त्यांच्या पालटलेल्या प्रेमाची साक्षिदार मीच स्वतः नव्हे का ?

या ठिकाणीं घनदाट छायेंत एक पाषाणशीला दिसली, तिजवर मी बसल्यें; बसतांच माझें मन बरेंच स्थिर झालें. सुधाकरांनां दुसऱ्या सहचारिणीच्या संगतींत मी पहावें, एवढ्याचकरितां मला अचानक अनपेक्षित रीतीनें या वनराजींत आणिलें नाहीं का ? पण माझ्या त्यांच्या विषयींच्या प्रेमांत यानें अंतर कां पडावें ? खऱ्या प्रेमांत पूर्ण श्रद्धा हीच एक वसत असते. ज्यांत रतिभरहि अश्रद्धा वास करते तें प्रेम का ? ज्यांच्या ठिकाणीं माझें प्रेम आहे त्यांनां जर मजवांचून अन्य साधनानें सुख लाभतें आहे, तर मला त्यांत दुःख कां वाटावें ? तरी पण उदासवाणें वाटावयास लागून क्षणापूर्वीचें माझें सुखभांडार कोणी हिरावून नेलें असें मला झालें. या विषण्ण मनःस्थितींत बसल्यें असतां, या अकल्पित प्रकाराचें मला राहून राहून आश्चर्य वाटत होतें. हा प्रकारहि विधिनियोजित असेल, हें माझ्या स्वप्नांतहि आलें नाहीं.

कोणाचीं तरीं पावलें वाजलीं म्हणून मी वर पाहिलें, तो एक वृद्ध व एक पोक्त बाई हीं मजकडे येतांना दिसलीं. दोघांच्याहि मुद्रा दयाशील दिसत होत्या. माझ्या गोंधळलेल्या मनःस्थितींतून तीं माझी मुक्तता करतील, अशा आशेने मी त्यांच्याकडे पाहूं लागल्यें. ती जवळ येतांच मी उठून पुढें झाल्यें, वृद्धानें मजकडे पाहून स्मित केलें.

" आम्हीं अगदीं वेळेवर आलों, नाहीं का ?" त्यानें म्हटलें; " नाहीं तर या कपटजालांतून तुझी मुक्तता होणं कांहीं शक्य नव्हतं !"

" खरंच-खरंच !" ती बाई म्हणाली; " मग कांहींच शक्य नव्हतं तें. "

मी स्तंभित होऊन त्यांच्याकडे पहात राहिल्यें. 'कपटजालांतून मुक्तता ' कोणत्या कपटजालांतून ? आणि 'ती कधीं शक्य नव्हती !'—अर्थ काय याचा ? सुधाकरांनां त्या ' सहचारिणीसह पाहिल्यापासून माझी वाच्यता गेली होती; पण ती आतां एकदम परत आली.

" काय म्हणतां तुम्ही ? मला नाहीं कळत आपल्या बोलण्याचा अर्थ !" मी ठांसून त्या वृद्धाला प्रश्न केला;

" मी इथं आल्यें आहे, ती स्वेच्छेनं. मग मी कपट-जालांत कशी ? आणि माझी मुक्तता ती काय करायची ?"

वृद्ध दयार्द्र दृष्टीनें मजकडे पाहूं लागला; " मुली तो ह्मणाला; " योगानंदाच्या मठांत तूं बंदिवान नाहींस काय ?"

" होय. पण ती माझ्या स्वतःच्या इच्छेनं " मी उत्तर केलें.

वृद्धाची मुद्रा आश्चर्यचकित झाली; व ती बाई स्मित करून ह्मणाली, "नाहीं मुली, तूं भ्रमांत आहेस. सुधाकरांच्या दुर्वासनेनं तूं इथं आली आहेस. आणि सुधाकर हा कोणत्या प्रकारचा माणूस आहे समजलीस का ? आपल्या वेड्या कल्पनांनां मूर्त स्वरूप द्यायला तो वाटेल तिचा बळी घ्यायला कचरायचा नाहीं बरं ! वेडे मुली. तूं त्याच्या इच्छाकक्षेत सांपडली आहेस हो. आणि कशी सहजासहजीं सांपडली आहेस अगदीं, तूं मनांत मांडे खाते आहेस कीं आपण आपल्या इच्छेनं चाललों आहों. पण वस्तुतः तूं त्याच्या इच्छेची दासी झालेली आहेस. ती केव्हांपासून ?–तूं त्याला प्रथम पाहिलंस तेव्हांपासून, समजलीस ?"

वृद्धानें मान हलवून याला पुष्टी दिली.

क्षणभर माझें डोकें गरगर फिरायला लागलें. हीं म्हणताहेत तें खरें असणें शक्य आहे का ? तीं मजकडे दयार्द्र दृष्टीनें पहात होतीं. माझ्या भावी संकटाची मला आगाऊ सूचना देण्यांत, सदयतेवांचून त्यांचा दुसरा हेतु कोणता असणार ? मला व्यग्र करणारी चिंता मुळींच न दाखवितां शांतपणें मी त्यांनां विचारिलें:---

" आपण म्हणतां तें सगळं शक्य आहे, असं आपल्याला वाटत असलं, तर मग आतां मी काय करावं म्हणून म्हणणं आपलं ? मी जर संकटांत असेन तर मग त्यांतून कशी सुटणार ?"

ती बाई मजकडे निरखून पाहूं लागली; तिच्या दृष्टींत आतां नवीनच चमक आलेली दिसली. वृद्धानें उत्तर केलें:—

" सुटका ही आतां–या क्षणीं ठेवलेली ! आमच्या बरोबर चल; या वनराईबाहेर सुरक्षित अशा एका स्थळीं तुला आम्ही नेऊन पोंचवितों. तेथून तूं आपल्या वेशीं जा व सर्व विसरून जा."

" विसरायचें–तें काय ?" मी मध्येंच विचारलें.

" हा सगळा वेडेपणा " गंभीरपणानें त्यानें उत्तर दिलें. " सुधाकरानं तुझ्या डोक्यांत भिनविलेली चिरंजीवनाची आणि प्रेमाची कल्पना. आत्म्याच्या अमरत्वाविषयीं आणि वैयक्तिकतेविषयीं वेड्या समजुती, हें सगळं विसरून जा. आणि मग इतर सामान्य मर्त्यांप्रमाणं वार्धक्य व मृत्यु यांचा स्वीकार कर. ज्या प्रेमावर सुधाकराची अढळ श्रद्धा तें अस्तित्वांतच नाहीं मुळीं. तसंच तें त्याचं चिरंजीवन. शक्यच नाहीं मुळीं तें, त्यांच्या यौवनाचें रहस्य—"

" हो !" मी एकदम उद्गारल्यें " त्याचं–त्याचं काय तें मला सांगा, तसंच योगानंद स्वामींच्या अकालीं तारुण्याचंहि गूढ काय बरं ?"

दोघेहि क्षणभर गोंधळून गेलीं. हें पहातांच मला आत्मविश्वास येऊन मी ह्मटलें:—

" ईश्वरेच्छेनं किंवा विधियोजनेनं ज्यांचा माझ्या जीवनाशीं संबंध आला आहे, त्यांच्या विरुद्ध मला सूचना द्यायला कां बरं आलांत ? तुह्मीं ह्मणाल आम्हींहि ईश्वरेच्छेनेंच आलों आहोंत. पण दैवी योजना अशी परस्पर विरुद्ध असणं शक्य आहे का ? सुधाकरांकडून वा योगानंदस्वामींकडून मला अद्याप तरी कांहीं अपाय झाल्याचं आठवत नाहीं. मला त्रास होतो आहे तो मी जें ऐकिल्यें व पहाल्यें त्यानें. पण माझी श्रवणशक्ति व दृष्टि हीं फसली असण्याचा संभव आहे. मग या त्रासाची मी क्षिति कां बाळगावी ?"

बाई चपापून मजकडे पाहूं लागली.

" एकूण तूं कांहीं इथून हलणार नाहींस. रहा बापडी ! वेडाला बळी पडून राहीनास इथंच " तिरस्कारानें ती म्हणाली; " तूं बायको माणूस; आणि या ढोंगी ठकव्या पुरुषांत राहून आपल्या नांवलौकिकाला मुकतेस ? मूक हो. खुशाल मूक !"

बाईचें वागणें एकदम पालटल्यासारखें दिसलें, ह्मणून मी सावधगिरीनेंच बोलूं लागल्यें.

" माझा नांवलौकिक राखणं माझ्याकडे आहे. माझ्या कृतीबद्दल मी जबाबदार. "

वृद्धानें पुढें येऊन आपला हात माझ्या खांद्यावर ठेविला; त्याचे डोळे रागानें लाल झाले होते.

" तुझी मुक्तता केलीच पाहिजे " तो एकदम ह्मणाला; " तुला आमच्याबरोबर आलंच पाहिजे. मग तुझी मर्जी असो वा नसो. या योगानंदाच्या ठकवेगिरीला किती जणी तरी बळी पडलेल्या आम्ही

पाहिल्या आहेत. पण तुला मात्र आम्ही त्याचा बळी होऊं देणार नाहीं."

असें ह्मणून तो मला ओढूं लागला; पण माझें स्वत्व जागें होऊन मी बोटभरहि आपल्या जागेवरून हलल्यें नाहीं.

" मी तुमच्याबरोबर येणार नाहीं." मी संतापून बोलल्यें. " मला इथं जर कांहीं अपाय होण्याचा संभव असेल, तर देवच माझं त्यापासून रक्षण करील. सुधाकराविरुद्ध आणि योगानंदस्वामीविरुद्ध तुह्मी जें कांहीं आतां सांगितलंत, त्यांतल्या एका शब्दावरहि माझा विश्वास नाहीं. सुधाकरांवर माझं प्रेम असून स्वामींच्या ठिकाणीं माझी पूर्ण श्रद्धा आहे. माझ्या वाटेस जाऊं नका तुम्ही."

मी हे शब्द बोलतें न बोलतें, तों तीं दोघंहि मजवर तुटून पडलीं. आणि मला धरून ओढून नेण्याचा प्रयत्न करूं लागलीं, मी आपलें शक्तिसर्वस्व खर्च करून त्यांचा प्रतीकार करूं लागल्यें. माझ्या हातांतील ' जीवनवेद ' ग्रंथहि मी घट्ट धरून ठेविला होता. पण त्यांच्या संघशक्तीनें मी निर्बल होऊन शेवटीं हरली जाणार असें वाटून एकदम " सुधाकर, सुधाकर !" असें ओरडल्यें.

क्षणांत मी मुक्त झाल्यें; त्यांनीं आपले हात सोडून दिले. त्यासरशीं मी जी धूम ठोकली ती एका विस्तृत सरोवराच्या कांठावर मी उभी राहिल्यें, तेव्हांच थांबल्यें.

---

प्रकरण अठरावें

## स्वप्नांत स्वप्नें

सरोवराच्या काठीं येतांच मला थांबणें भाग पडलें. पायाशीं काळें काळें कुट्ट पाणी. वर अगदीं अंधुक प्रकाश. माझे पाठलाग करणारे पाठीवर आले आहेत कीं काय, हें पहाण्याकरितां मी मागें पाहिलें. पहात्यें तों धुकें-घनदाट धुकें सर्वत्र पसरत असून त्यामुळें कांहींहि दिसत नव्हतें. दिवस असावा असा माझा समज होता; पण वस्तुतः यावेळीं रात्र होती, असें दिसून आलें. अगदीं थकून गेल्यामुळें मी मटकन् जमिनीवर बसल्यें. जवळ तें कृष्ण सरोवर, शांतता व काळोख यांनीं मला गुंगी आली. वाटलें याच ठिकाणीं अनंत काळ पडून रहावें. कितीतरी माणसें मृत्यूची उत्कंठेनें मार्गप्रतीक्षा करतात, ती कां, तें या वेळीं कळलें. तीं प्रेमाला मुकलेली. आणि प्रेमविरहित जीवन हें कवडीमोल होय. अनंतकाळांतून, माधुर्यहीन जगांत, आशा व सुख यांनां पारखें होऊन, एकलकोंडें जीवन कंठणें ह्मणजे प्रत्यक्ष नरकवास.

" प्रत्यक्ष नरकवास !" मजजवळून ध्वनि आला.

मी दचकून वर पहात्यें, तर एक तमोमय आकृति जवळ उभी. ती स्त्रीची असून सौंदर्यसंपन्न दिसली. सर्वांग कृष्णवेशांत अच्छादिलेलें होतें.

" एकूण शेवटीं तूं इथं आलीस !" ती उद्गारली; " या स्थानीं सर्व गोष्टींचा अंत होतो; कोणत्याहि गोष्टीचा आदि होत नाहीं. समजलीस ?"

मी एकदम उठून उभी राहिल्यें.

" अंत होतो ?" मी म्हटलें, " जिथं जीवन आहे, तिथं अंत करा ?"

तिनें स्मित केलें.

" जीवन हें स्वप्न होय. " ती म्हणाली; " आणि जीवनविषयक गोष्टी-हीं स्वप्नांतलीं स्वप्नें होत. सत्य असें कांहींच नाहीं. असत् गोष्टींनां तूं सत्य लेखितेस "

मी तिजकडे साश्चर्य पाहूं लागल्यें. ती असाधारण सुंदर असून तिची शांत विषण्ण दृष्टि करुणेनें भरलेली होती.

" तर मग सृष्टि असत् काय ?" मी विचारिलें.

तिनें कांहींएक उत्तर न करतां आपला हात कृष्ण-सरोवराकडे केला. मी त्याजकडे बघतांच किंकाळी फोडली. सरोवराच्या पैलतीरावर मला सुधाकरांचें विद्युन्मंदिर विद्युद्दीपमालांनीं प्रकाशित असें दिसलें.

" तें बघ तुझें स्वप्नमंदिर ! " ती म्हणाली; "पाहून घे शेवटचें. "

मी पाहूं लागल्यें, तों कृष्णजलाच्या लाटा वर वर वर मंदिराच्या अर्ध्यावर पोंचल्या. आणि मंदिर क्षणोंक्षणीं निमज्जित होत चाललें. शेवटीं त्याचा घुमट तेवढा वर राहिला.

माझी अंतःशक्ति उसळी मारून बाहेर येते आहे असें मला वाटलें. या मनोवेदनांचें मी संयमन

करणार; मला निराशेप्रत नेणारें हें दुःख मी गिळून टाकणार असा विचार केला.

" हा दुःखाचा भास होय. याला अस्तित्व नाहीं. माझ्या अंतर्यामींचे प्रेम हेंच काय तें सत् होय. माझा आत्मा माझा परमात्मा तें प्रेमच होय. तें परमात्म्या-सारखंच अनाद्यंत आहे. मी तें त्या परमात्म्याच्याच पायीं वहातें. "

मी हे शब्द मोठ्यानें उच्चारिले. 'जीवनवेद' ग्रंथ मी एका हातानें हृदयाशीं धरला होता; माझी दृष्टि वर तिमिरापलीकडील परंधामाकडे लागली होती.

माझे हे शब्द ऐकतांच त्या स्त्रीनें आपला हात माझ्या खांद्यावर ठेविला. तिचा स्पर्श मला मृदु सौम्य वाटला.

" चल मजबरोबर !" ती मधुरस्वरानें ह्मणाली.

इतक्यांत एक अगदीं लहान नौका कृष्णजलावरून आह्माकडे येतांना दिसली; कर्णधाराचें मुख कृष्ण-पटानें आच्छादिलेलें होतें. नौका आम्हांजवळ येऊन थांबतांच स्त्रीनें मला अपणाबरोबर नौकेंत चढावयास सांगितलें. त्या स्त्रीचा शब्द मोडूं नये, असें मला वाटलें व मी तिजबरोबर नौकेंत जाऊन बसल्यें. बराच काल-पर्यंत निःशब्द मूकतेंत नौका चालली; तों एकदम अश्रुतपूर्व रुदनस्वर व करुण विलाप ऐकूं येऊं लागले. तशाच तेजोमय मानवाकृति त्या तिमिरांतून इत-स्ततः संचरतांना दिसूं लागल्या.

" या व्यक्ति कोण ? " मी आपल्या सहचरीला विचारिलें.

तिनें माझा हात आपल्या हातीं घेऊन " ऐक ! "

मी ऐकण्याचा प्रयत्न करतांच त्या रुदनकोला-हलांतून मला स्पष्ट ऐकूं येऊं लागलें.

" मी लक्ष्मी होय !" त्या तेजोमय व्यक्तींतील एक व्यक्ति ह्मणाली; " मजकरितां मानवांनीं व राष्ट्रांनीं आपला नाश करून घेतला आहे. मजकरितां त्यांनीं सुखाचा बळी देऊन देवाला पारखा करून ठेविला आहे; मजकरितां विश्वासघात व वध हीं झालीं आहेत. मी केवळ छाया असून जग मला प्रकाश समजून मजमागें लागलें आहे. मी केवळ भूमीवरील सुवर्ण-धूलिका असून मानव मला स्वर्गीय ऐश्वर्य लेखितो."

" मी कीर्ति होय !" दुसरी तेजोव्यक्ति ह्मणाली; " माझा संचार स्तुतिसंगीतांत पुष्पवर्षावांतून होत असतो. मानवाला मी देवताच वाटते. विजयश्री व सामर्थ्य यांची मी द्वाहि फिरवितें. मजकरितां शौर्य-संपन्न हृदयें भग्न झालीं आहेत, प्रतिभासंपन्न आत्मे निराशेप्रत गेले आहेत. मी केवळ असत्–छाया–होय; पण जग मला सत् लेखितें; मी केवळ श्वासरंग होय; पण मानव मला अचल ध्रुव समजतो."

" मी पदवी होय !" तिसरी तेजोव्यक्ति ह्मणाली, " मजकरितां मानवता महत्त्वाकांक्षेचा गिरी चढूं पहाते. मजकरितां सम्राट अस्थिर सिंहासनावर विराजमान होत असतात. मजकरितां मानव असत्य भाषण, अन्याय हीं करितो. मजकरतां सुखी गृहें उध्वस्त होतात; मजकरितां अन्यायी कायदे होतात; मज-करितांच दुष्ट सुष्टांवर जय संपादन करूं पहातात. मी केवळ छाया होय; पण जग मला तेजोराशी–भास्कर समजतें; मी केवळ क्षणभंगुर विद्युत्प्रभा होय; पण मानव मला पूर्णप्रकाशदिन लेखितो."

आणखीहि कित्येक ध्वनि या कोलाहलांतून ऐकूं येत होते. स्त्रीच्या हातांतून माझा हात काढून घेऊन, मी नौकेंत उठून उभी राहिल्यें.

"तुम्ही सर्व छायारूप असत् आहांत." मी ओरडून म्हणाल्यें; " मला सत्य पाहिजे आहे. प्रीति कुठं आहे ?"

सर्व कोलाहल बंद झाला तेजोमय आकृति अदृश्य झाल्या. आणि सखोल, सुवर्ण, चमत्कृतिजनक प्रकाश त्या तिमिरांत दिसूं लागला. माझी सहचरी म्हणाली " इतका वेळ तूं असत् पहात होतीस; आतां एकच जें सत्य तें पहा. "

मी स्मित केलें. अननुभूत शक्ति व अधिकार हीं एकदम मजमध्यें संचरलीं.

" माझं प्रेमस्वप्न शेवटचं पाहून ध्यायला तूं मला सांगितलं होतंस, नाहीं ? " मी म्हटलें; पण तें शक्य नव्हतं. कारण, प्रेम हें स्वप्न नव्हे, हें तुला ठाऊक होतें."

सुवर्णप्रकाश विस्तृत होत होत त्यानें सर्व त्रिभुवन व्यापिलें आणि नौका आतां सुप्रकाशित जलाशया-वरून विहरत चालली. कर्णधाराकडे पहातां तोहि तेजोरूप दिसूं लागला. क्षणभरांत सरोवराच्या पैल-तीरावर येऊन मी उतरल्यें. पहात्यें तर पुढ्यांत आश्रमाचा दगडी जिना व वर माझी खोली. ती स्त्री, ती नौका, तो कर्णधार व तो जलाशय हीं सर्व नाहींशीं होऊन, मी आश्रमाशेजारीच उभी आहें, असें मला आढळून आलें.

माझें सत्व पहाण्याकरितां गुरुमहाराजांनीं ही सर्व योजना केली होती; हें माझ्या चटकन लक्षांत आलें. पण सत्वाला मी उतरल्यें आहेना? खचित उतरल्यें. कारण मी ईश्वरी सत्याविषयीं वा प्रेमशक्तीविषयीं संशयवृत्ति दाखविलेली नाहीं. असें मी आपल्या मनाचें समाधान करून घेतलें. तथापि भिंतीपलीकडील त्या ध्वनींची स्मृति जागृत होऊन पुनः माझें मन अस्वस्थ झालें. सुधाकरांनीं विश्वासघात केल्याचें, सुधाकरांचें भलतें सलतें झाल्याचें सांगणारे ते ध्वनि माझ्या मनांत चिंता उत्पन्न करूं लागले. भीति व शंका यांनां बळी न पडण्याचा मी निर्धार केला. जगाचे ध्वनीच प्रेमाला विशेष त्रास देतात; असत्य व निंदा हीं प्रेमबंधन जितकें त्वरित तोडूं शकतात, तितकें दारिद्र्य व दुःख हीं शकत नाहींत, हें मला चांगलें ठाऊक होतें. तरी-देखील माझें मन अस्वस्थ झालें व त्याला स्वास्थ्य येईना.

दगडी जिन्याचा दरवाजा उघडा असल्यामुळें मी लागलीच तो चढून वर माझ्या खोलींत गेल्यें. खोलींत सर्व कांहीं जसेंच्या तसें होतें; मात्र खोलीजवळील ज्या दालनांत मी 'जीवनवेद' ग्रंथ वाचण्यास आरंभ केला, तें दालन कोठेंहि दिसेना! खोलीच्या भिंतींत कोठेंहि चोरदार दृष्टीस पडेना.

खिडकीशीं खुर्ची घेऊन मी बाहेरील देखावा पहात बसल्यें. सूर्यप्रकाशांत हिमालयाखालील सर्व प्रदेश तळपत होता. त्या प्रफुल्ल प्रकाशदृश्यांत कांहींहि गूढ दिसत नव्हतें; सर्व कांहीं स्पष्ट–खुलें दिसत होतें. माझा या खोलीबाहेर काळ तरी किती गेला? कांहीं सांगतां येईना. काळाला खरें अस्तित्व नाहीं, असें मला वाटलें. सुधाकर खुशाल आहेत ना? त्यांच्या प्रेमभांडाराची मी स्वामिनी आहे ना? या दोन गोष्टी कळण्याशिवाय दुसरी कसलीहि पर्वा मला या जगांत नव्हती. भूत, वर्तमान व भविष्य–तीनहि काळ या दोन गोष्टींच्या अनुकूलत्वावर अवलंबून आहेत असें मला वाटलें. इहलोकीं वा परलोकीं मला अन्य कशाचीहि अपेक्षा नव्हती. कारण जर मी प्रेमाला मुकलें असतें, तर प्रत्यक्ष परमेश्वरहि मला काय सुख देणार? मी प्रेमाला मुकलें असलें तर माझा परमेश्वराशीं बंधच तुटला असें नव्हे काय?

याप्रकारें विचार करतां करतां कांहीं वेळानें माझें मन प्रगाढ शांत झालें; विषण्णतेचें अभ्र निघून जाऊन गतानुभवांचा मी नीट विचार करूं लागल्यें. माझी मुक्तता करूं पाहणारीं तीं दोघें–तो वृद्ध व ती पोक्त स्त्री यांची आठवण होऊन मी सुधाकरांचा धांवा करतांच, ती कशीं हतबल झालीं, याचें मला आश्चर्य वाटलें. खचित, माझ्या धाव्यासरशीं सुधाकरांनीं गूढशक्तीनें माझी मुक्तता केली असली पाहिजे, म्हणजे सुधाकर कांहीं मला खास विसरले नसले पाहिजेत. अर्थात् मग मीहि त्यांच्या प्रेमाविषयीं कां बरें शंका घ्यावी?

"जीवनवेद" ग्रंथ मी खोलींत येतांच टेबलावर ठेविला होता, तो उघडिला; तों त्यांतील पुढील भाग एकदम दृष्टीस पडला:—

"लक्षांत ठेव, कीं प्रेमाचें अमूल्य भांडार एकदां तुझ्या स्वाधीन झाल्यावर तुजपासून तें हिरावून घेण्याकरितां सर्व प्रयत्न होतील. जग सुखी जीवांचा जितका हेवा करतें, तितका दुसरा कसलाहि करीत नाहीं. तुझे अगदीं जिवलग मित्रहि तुजविरुद्ध उठतील. कारण त्यांच्या वाट्यांस न आलेलें सुख तुला लाभलेलें आहे, तुझ्या शत्रूंशीं सहकार्य करून तुला तुझ्या उच्च नंदनवनांतून खालीं ओढून आणण्याचा ते प्रयत्न करतील. मूढ बहुजनसमाज तुला विरोध करील. तिरस्कार, कुचेष्टा यांचा वर्षाव होईल. विषारी कंड्या व दुष्ट निंदा यांचा प्रसार होईल. प्रकाशवर्तुळांतून तुला तिमिरांत ओढून घेण्याकरितां हें सर्व केलें जाईल. तुला निश्चल रहावयाचें असलें तर झंझावाताच्या केंद्रस्थानीं उभी रहा. आत्म्याचें स्थैर्य राखावयाचें असलें तर वर्तनाचा समतोलपणा राख. तुझा देह व आत्मा हीं ज्या अमर तेजोकणांनीं बनलेलीं आहेत, त्यांचें नियंत्रण एखाद्या सुव्यवस्थित सेनेसारखें कर. नाहींतर तुझ्या सभोंवतालच्या मत्सरशक्ति तुझ्या सुखारोग्यावरच घाला घालतील, इतकेंच नाहीं; तुझी अंतःशक्ति व शांति यांचाहि त्या विध्वंस करतील. प्रेम हें जीवनाचें एकच एक वैभव होय. सर्व विश्वाचें तें हृद्य होय. प्रबल जगज्जेत्यांनांहि तें लाभलेलें नाहीं. सृष्टीचें गूढ याच प्रेममंत्रानें उकलतें. प्रेम ही अमर्याद सामर्थ्याची देवता होय. तिच्या दानानेंच सर्व सौंदर्य, सर्व माधुर्य, सर्व आनंद ह्यांचा लाभ होतो, हें लक्षांत ठेव. तसेंच ज्यांनां हें प्रेम लाधलें आहे, त्यांचा हेवा ज्यांनां हें लाधलें नाहीं त्यांजकडून व्हायचाच! हें कधींहि विसरूं नको!"

इतकें वाचतांच माझ्या डोक्यांत लख्खन् प्रकाश पडूं लागला. गेल्या कित्येक तासांतल्या ( अथवा दिवसांतल्या ) चमत्कारिक व गूढ अनुभवांचा हेतु मला प्रेमापासून चळविण्याचा, माझ्या ध्येयापासून मला च्युत करण्याचा नव्हता का? मी त्याप्रमाणें चळलें आहे काय? कीं निश्चल राहिल्यें आहे? यशापयशाविषयीं मला कांहींच निश्चित सांगतां येईना.

इतक्यांत माझें लक्ष कोपऱ्यांतल्या तिवईकडे गेलें. तीवर डाळरोटीची थाळी व पाण्याचा तांब्या हीं सिद्ध दिसलीं. मी लागलीच ती घेऊन भोजन करूं लागल्यें. इतका वेळ मला भूक व तहान वाटली नव्हती; पण ती शमविण्याचीं साधनें दिसतांच एकदम ती प्रक्षुब्ध झाली. भोजन आटोपतांच " जीवनवेद " ग्रंथ पुढें वाचावयास बसल्यें:—

## ' स्वतंत्रेच्छा '

इच्छाशक्तीच्या व्यापाराला सीमा नाहीं. आपल्या जीवनक्रमाची आपणाला निवड करतां यावी, आपलें दैव आपणांस घडवितां यावें, या हेतूनें आपली इच्छा स्वतंत्र ठेविलेली आहे. प्रेमावांचून इतर सर्व गोष्टींवर तिचें स्वामित्व चालतें; प्रेम दैवी होय; त्यावर कोणाचाहि अधिकार चालावयाचा नाहीं. प्रेमाचें जनन अंतरात्म्यांत प्रेमज्योतीला दोन वाती लागतात; एक आपल्या अंतरात्म्याची व दुसरी दुसऱ्या अंतरात्म्याची. हा दुसरा अंतरात्मा पाहिल्याचा विधिनियोजित सहचर होय. त्याच्या सहवासाविना त्याचें जीवनसाफल्य होणें नाहीं. तो सहवास एकदां झाला कीं, मग ज्याप्रमाणें पक्षाचे पंख पक्षाला प्रगति देतात, त्याप्रमाणें प्रेम इच्छेला प्रगतिपर करून अत्युच्च ध्येयाप्रत नेतें. प्रेमशक्तीनेंच जीवनोत्पादन व जीवनसंरक्षण होतें; प्रेमाविहीन जीवनाचें स्थित्यंतर होतें; व तेथें त्याला प्रेमाचा लाभ होतो. या द्विज्योति प्रेमप्रकाशाविना कांहींहि पूर्ण होत नाहीं, कांहींहि चिरस्थायी होत नाहीं. हा प्रेमप्रकाश इच्छेनें उत्पन्न होत नाहीं. त्याचें जनन स्वयंस्फूर्तीनें होत असतें, व त्याला प्रिय अशा जीवालाच तें प्रकाशदान करतें. इतर सर्व कांहीं इच्छाशक्तीला आधीन आहें, प्रेमच एकटें स्वतंत्र आहे.

## ' सामर्थ्य '

सुव्यवस्थिततेनें सर्व गोष्टींवर, सर्व माणसांवर सामर्थ्य लाभतें. आत्म्याचें मंदिर जें शरीर, तें सुव्यवस्थित ठेवावयास हवें; त्याचा प्रत्येक घटक परमाणू नियोजित स्थानीं कार्यरत ठेवावयास हवा; इतकें झाल्यावर, इच्छेस येईल तें लाभलेंच पाहिजे. निश्चल निश्चयाच्या बळाला विश्वांतील कोणतीहि शक्ति विरोध करूं शकत नाहीं. आत्मा ज्या गोष्टींचें खरोखर शोधन करतो, त्या गोष्टी त्याला सनातन नियमांनीं मिळावयाच्याच. आणि आत्म्याच्या गरजा भागविण्यास देहाला ज्या गोष्टींची आवश्यकता, त्या गोष्टी देहालाहि मिळावयाच्याच. सूर्यप्रकाशांतून, वातावरणांतून आणि आकाशाच्या गूढ भांडागारांतून नित्य नवी शक्ति मिळावयास रहात नाहीं. निश्चित आत्म्याचें सर्व इष्ट पुरवावयास सृष्टींतील प्रत्येक गोष्ट सहाय्य करते. अशा आत्म्याशीं प्रतिरोध करणारें विश्वांत काय आहे? यश, संपत्ति, विजयश्री हीं त्याच्यापायीं लोटांगण घेत असतात. जो आपल्या निश्चित हेतूपासून कशानेंहि चळत नाहीं; ज्याला मत्सर, उपहास हीं निश्चित ध्येयापासून हलवीत नाहींत, ज्याला कोणतीहि गोष्ट नियोजित मार्गापासून चळण्याचा मोह पाडीत नाहीं, जो तिरस्कार व निंदा यांनां पुरून उरलेला, त्याला काय कमी! परमात्मा त्याचें सर्व इष्ट पुरवितोच पुरवितो. पण बहुतेकांचें मन महासागरांतील चल वालुकेप्रमाणें. ज्याचें मन निश्चल तोच समर्थ.

## ' चिरंजीवन '

जीवन अनंत होय, कारण त्याला मरण नाहीं. जें जें म्हणून जीवनधारणा करतें आहे, तें तें सदैव जीवनधारणा करीत असलेंच पाहिजे. ज्याला 'मृत्यु' म्हणतात, तो विधिनियमानें अशक्य होय. जीवन नेहमीं स्थित्यंतर करीत असतें; आणि याच स्थित्यंतराला आपण ' मृत्यु ' म्हणतों. कारण आपणाला तें जीवनाचा अंत असें वाटतें. पण वस्तुतः ते ताजेंतवानें झालेलें चैतन्य होय. मानवी देहांत कारागृहवास भोगीत असलेल्या प्रत्येक आत्म्यानें पूर्वींहि मानवीदेहांत वास केलेला असतो. क्षुल्लक गुलाबाचें फूल डहाळीवर विकसित झालेलें दिसतें; पण तेंहि या जगांत पूर्वीं विकसित झालेलें असतें. प्रत्येक आत्मा आपलें वैयक्तिकत्व आणि अंशतः स्मृति कायम ठेवितो. त्याच्या मानसिक मजेनें सांठविलेल्या असंख्य प्रसंगांपैकीं कांहीं थोडक्यांचीच मात्र स्मृति जागृत रहाते. जेव्हां तो अध्यात्मिक सामर्थ्याच्या शिखराला पोहोंचतो व ज्ञान, दृष्टि, ग्राहकता यांत बलवंत होतो, तेव्हां त्याची सर्व प्रसंगांची स्मृति जागी राहूं शकते. कोणतीहि गोष्ट विसरणें

शक्य नाहीं; कारण विस्मृति ही विनाशदर्शक होय व विधियोजनेंत विनाश हा नाहींच. प्रत्येक विचार उपयोगाकरितां रक्षिला जातो; प्रत्येक शब्दाची, प्रत्येक निश्वासाची, प्रत्येक अश्रूची नोंद होत असते. आपणांस लाधलेल्या संरक्षक साधनांचा उपयोग केल्यास सद्यःप्राप्त देहांतहि आपणांस जीवनधारणा अमर्यादित कालपावेतों करितां येईल. विश्वांत कोठेंहि निर्गतिकता नाहीं. प्रत्येक परमाणू कांहीं तरी करीत आहे, कोठें तरी जात आहे; व कोठेंहि स्थैर्य नाहीं. प्रत्यक्ष विश्रांतिहि सौंदर्य व पूर्णता यांकडे होणाऱ्या प्रगतीचाच एक प्रकार आहे; आणि मंगलकर विधियोजनेंत व्यग असें कोठें कोठेंहि नाहीं.

## 'त्यागी अहंकार'

सर्वसंगपरित्यागी हा परमेशाचा निंदक होय. मानवी समाजाचा त्याग करून तो मानवी सहानुभूतीचा त्याग करीत असतो. देहदंड करून व नैसर्गिक विकार आणि इच्छा यांचा बिमोड करण्याचा अट्टहास धरून, तो कोणाला दंड करतो ? ज्यानें आत्म्याकरितां शारिरीक मंदिर निर्माण केलें, त्या परमेश्वरालाच तो दंड करतो. इहलोकच्या सौख्याला पारखा होऊन तो परमेश्वरी मंगलालाहि मुकतो. सृष्टीच्या सौंदर्यसुखावर उठून तो विधियोजनेचा द्रोह करतो. जीवनसंगीताचा मुख्य सूर आनंदाचा असावा, शोकाचा नव्हे. ज्याला 'पातक' ह्मणतात, तें मानवी कृति होय. देवाचा त्याशीं कांहीं संबंध नाहीं. अहंकारानें मानव सच्चिदानंदास मुकत असतो. सृष्टिकर्त्याहून आपण ज्ञानी, असें लेखून तो सृष्टियोजनेंतील वैगुण्य दूर करूं पहातो; व अनैसर्गिक अस्वाभाविक नियमन निर्माण करतो; ह्मणूनच त्याजवर आपत्ति कोसळतात ! भूमीचीं फळें, इंद्रियांचीं सुखें, बांधवांचें प्रेम, बुद्धीचा आनंद, आत्म्याचा ब्रह्मानंद या ज्या देवानें दिलेल्या गोष्टी, त्यांचा कृतज्ञतेनें स्वीकार करणें व परिमिततेनें उपभोग घेणें; त्याचप्रमाणें निर्दोष विधिघटनेंत केव्हांहि दोष न काढणें असा शुद्ध, सुखी जीवनाचा नियम होय. ज्ञाते व तत्त्ववेत्ते जगांतील दुःख पाहून हळहळतात; पण तें दुःख केवळ मानवी कृति होय. मानवानें बांधवांवर गाजविलेलें क्रौर्य होय. मानवाच्या आरोग्यरक्षणाच्या हयगयीनें रोग निर्माण झाले; मानवाच्या अहंकारानें, अश्रद्धेनें, स्वार्थानें पातकें निर्माण झालीं.

या ठिकाणीं मी वाचायची थांबल्यें; कारण काळोख पडत आहे, असें मला वाटलें; निदान मला वाचतां येईना इतका काळोख पडला होता. खिडकीकडे पाहिलें तर तिच्यांतून फारच थोडा उजेड येत होता; जणूं काय आकाशांत एकदम घनदाट मेघ येऊन सर्व दृश्यसृष्टि काळोखांत गडप झाली, असें दिसत होतें. इतउत्तर भीति ह्मणून वाटूं द्यायची नाहीं; किंवा दुसरें एखादें दार खोलीला दिसलें तरी त्यानें खोलींतून जायचें नाहीं, असा मी निश्चय केला; व लागलेंच माच्यावर अंग टाकलें. उशीवर डोकें ठेवतांच थंडी वाजावयास लागून क्षणांत मला हुडहुडी भरली. भोवतालीं अंधकार घनतर होत होताच. ह्मणून डोळे मिटले व झोपीं जायचा निश्चय केला; आणि चित्त असें एकाग्र केलें कीं, दोनचार मिनिटांत मी गाढ झोपीं गेल्यें.

---

## प्रकरण एकोणिसावें

# अज्ञात

झोंप इतकी गाढ लागली, कीं ती किती काळ काढली, त्याचें मला ज्ञान नाहीं. मात्र जागी झाल्यें, तों भीति वाटूं लागली; माझी सर्व चलनवलनक्रिया बंद झाल्यासारखें होऊन, ओरडतांहि येईना. अदृश्य अशा शक्तीनें मला माच्याला जखडून टाकिलें आहे असें वाटलें. फक्त उघड्या डोळ्यांनीं टकमक पहाण्यापलीकडे मला कांहीं करितां येईना. एक उंच घनकृष्णाकृति माझ्या माच्याशीं उभी. तिचें मुख कांहीं स्पष्ट दिसत नव्हतें; पण तिचे ते तीक्ष्ण नेत्र माझा हृदयभेद करून जाताहेत, असें मला वाटलें.

माझें हृदय धडधड करूं लागलें; त्याचें धडधडणें मला स्पष्ट ऐकायला येत होतें. मनोनिग्रह करून मी निष्कंप होण्याचा यत्न करूं लागल्यें; तों काय चमत्कार,--ती आकृति माझ्याजवळून दूर जाऊं लागली. व आपल्या दीर्घ हातानें मला बरोबर येण्याविषयीं खुणावूं लागली. तत्काळ मी उठून बसण्याचा

प्रयत्न केला, व उठूनहि बसल्यें. थरथर कांपत त्या विशालकृतीकडे मी पहात राहिल्यें. क्षणाभरानें माच्यावरून उतरून उभें रहावें, असा निश्चय करून मी तसें करूं पहातांच, निश्चल उभी राहिल्यें. त्या आकृतीच्या बरोबर जावें, असें नंतर मनांत येऊन मी चालूं लागल्यें. ती कृष्णाकृति पुढें व मी मागें, अशीं चालूं लागलों. "मृत्यु ह्मणतात तो हा. हा मला नेत आहे." असा विचार माझ्या मनांत येऊन गेला. पण लागलाच, "खरा मृत्यु, असा नाहीं. जो आहे ह्मणून ह्मणतात, तो केवळ भास होय." हाहि विचार माझ्या मनांत आला.

मंद-शांत-उदात्त गतीनें ती कृष्णाकृति मजपुढें चालली व मी कांपत कांपत अर्भकाप्रमाणें तिच्या मागोमाग चालल्यें. आमच्या मार्गांत प्रतिबंध करणारें असें कांहींहि आलें नाहीं; आह्मापुढें दरवाजे, भिंती, खिडक्या भराभर नाहींशी होत होतीं. जातां जातां आम्ही एका उंच निमुळत्या उभ्या सोपानाशीं आलों. तो सोपान उंच-उंच-उंच आभाळाला जाऊन भिडला होता. आभाळांतील घनतिमिरांत कोट्यावधि तारका लुकलुक करीत होत्या. ती कृष्णाकृति सोपानच्या पायथ्याशीं थांबून मजकडे हृदयभेदक दृष्टीनें पाहूं लागली व क्षणभरांत जणूं शंका फिटूनच कीं काय, सोपान चढूं लागली.

मीहि तिच्या मागोमाग पायऱ्या चढूं लागल्यें. सोपान कितीतरी उंच असून, पायऱ्याहि चढायला कठीण होत्या; खालीं पहातांच भोंवळ येऊन पडत्यें कीं काय, अशी मला भीति वाटे. कित्येकदां मी ठेंचाळून पडावें, व दोनतीन पायऱ्या खालीं जावें; असें होत होतें. तरी मजपुढें चालणारी ती कृष्णाकृति त्या बाबतींत बेफिकीर दिसली.

तो सोपान मी चढत असतां स्मृति जागृत होऊन मला ताप देऊं लागली. त्यांतल्या त्यांत मानवांनीं परस्परांविषयीं दाखविलेल्या अमानुष निर्दयतेची स्मृति तर मला फार ताप देऊं लागली. आणि त्यांतूनहि नैतिक अत्याचारांची आठवण होतांच मला फार-फार दुःख वाटूं लागलें. जगाला भारी अशा महात्म्यां-संबंधाची जगाची दुष्ट कृति, परहिताच्या कृति करीत असतां या महात्म्यांनां त्यांच्या निंदकांनीं ठेविलेलीं नांवें, इत्यादींची स्मृति माझ्या मनाला कष्ट देत होती. मी वर वर चढतच होतें; व ती कृष्णाकृति मला आपल्या मागोमाग कांहीं गूढ शक्तीनें ओढून नेतच होती.

ढोंगी फसव्या जगांत रहाण्यापेक्षां उच्च अज्ञात-अदृष्टस्थानीं आपणाला नेणारा हा सोपान चढत असणें कितीतरी चांगलें. 'अमंगलाचा नाश व मंगलाचें संरक्षण' या हेतूनें कार्य करणारा निसर्ग कोणीकडे! व याच्या उलट अमंगलाचें जनन व मंगलाचा नाश करूं पहाणारा मानव कोणीकडे!—असे विचार माझ्या मनांत चालले होते व त्याबरोबर मी तो सोपान चढत होत्यें. माझें लक्ष मजपुढें चाललेल्या कृष्णाकृतीवरून मी चळूं दिलें नाहीं, हें सांगावयास नकोच.

ती कृष्णाकृति आतां सोपानाच्या शिखरावर पोंचली. त्यापुढील भव्य शैलहि ती चढूं लागली. हा शैल थेट तारांगणांचा भेद करून जात होता. थंडगार वारा वहात असून, मला त्यानें कांपरें भरलें. माझ्या अंगांत पातळसा पोलका असून, अंगावर पातळ लोंकरी चादर मी घातलेली होती; मला त्या थंडगार वाऱ्यानें हुडहुडी भरली. तरी मी त्या कृष्णा-कृतीच्या मागोमाग चालल्येंच होतें. आणि तसें न करून आतां थोडेंच चालणार होतें. खालीं पाहिलें, तों ज्या सोपानानें मी इतकीं वर आल्यें, तो सोपानहि आतां अदृश्य झाला असून, कृष्णांधःकारावांचून दुसरें कांहीं दिसत नव्हतें.

हें पाहतांच मी इतकी घाबरून गेल्यें, कीं क्षणभर मला ब्रह्मांड आठवलें. इतक्यांत मजपुढील त्या कृष्णा-कृतीनें वळून भीषणदृष्टीनें मजकडे पाहिलें. या क्षणीं मी जर दुर्बल दाखवीन, तर पायाखालील अपरंपार तिमिरांत मला समाधि मिळालीच. असा विचार करून मी मनोनिग्रह केला व पुढील मार्ग क्रमण्यास अवश्य तें बल अंगीं आणून, त्या कृष्णाकृतीच्या मागोमाग मंद पावलांनीं कशी बशी जाऊं लागल्यें. जातां जातां मेघ-गर्जनेसारखा धीर गंभीर ध्वनि ऐकूं येऊं लागला. पुढें पहात्यें, तों ती कृष्णाकृति अधिकाधिक मंदगतीनें चालत शेवटीं स्थिर झाली. त्या कृष्णाकृतीची बाह्य रेषा आतां उज्वलित दिसूं लागली होती; त्यामुळें माझी भीति कमी होऊन मी धिटाईनें तिच्याजवळ जाऊन उभी राहिल्यें. वर दृष्टी वळविली तों अनंत असें तारांगण पसरलेलें. खालीं पहात्यें, तों अनंत तिमिरो-दधि पसरलेला, त्यांतूनच तो गर्जनाध्वनि येत होता

हें आतां मला समजलें. मी निश्चल उभी राहिल्यें; हें पाहून कृष्णाकृति मजकडे वळून सौम्य स्वरानें म्हणाली.

" येथवर तर आलीस. आतां आणखी कोठवर येतेस प्रेमाकरितां, तें पहातों."

" दिक्कालाच्या अंतापर्यंत." मी धीर करून उत्तर दिलें.

पहात्यें तर ती कृष्णाकृति अधीकच उज्वलित दिसूं लागली.

" प्रेमाकरितां काय काय करशील ? छळ सोसशील? निंदा सोसशील ? गैरसमज, कठोरपणा हीं मुकट गिळून टाकशील ? श्रद्धा आणि प्रयत्न यांनीं आपली प्रेमज्योति अखंड उज्वलित ठेवून प्रेमविषयाकरितां वरतीं स्वर्गापर्यंत, खालीं नरकापर्यंत जायला कंबर बांधशील ?"

कृष्णाकृतिच्या त्या अस्फुट मुखमंडलाकडे पाहिलें व म्हटलें " हें सारं करीन; खचित करीन. माझ्या आत्मशक्तीला जें जें शक्य, तें तें मी प्रेमाकरितां करीन !"

" तुझा प्रियकर मृत झाला आहे," ती कृष्णाकृति म्हणाली; " तो इहलोक सोडून गेला आहे. आतां तुझी आणि त्याची भेट युगांतरींच होणार, समजलीस?"

माझ्या काळजाचा चावा घेतल्यासारखें झालें. तरी धैर्यानें मी म्हणाल्यें; "नाहीं. मला कळवल्यावांचून ते इहलोक सोडून जाणें शक्य नाहीं."

यावर कृष्णाकृति कांहीं बोलली नाहीं; पायाखालच्या तिमिरोदधीची गर्जना मात्र ऐकायला येत होती.

" सुधाकरानें तुला फसविली आहे." थोड्या वेळानें कृष्णाकृति म्हणाली; " त्याचें तुजवरचें प्रेम क्षणैक होतें. त्या प्रेमाची आतां इतीश्री झाली आहे, त्याचा त्यालाच आतां पश्चाताप होतो आहे, समजलीस ?"

" अशक्य ! खोटं आहे हें साफ." मी एकदम उत्तर दिलें.

कृष्णाकृति क्षणभर मूक झाली.

" सृष्टिकर्त्या, सत्यलोक नायक परमेश्वरावर तुझी श्रद्धा आहे ?" कृष्णाकृतीनें तदनंतर प्रश्न केला.

दृष्टि वर तारांगणाकडे वळवून मी उत्तर केलें; " माझा जीव सर्वस्वी त्याच्या ठिकाणीं आहे. त्याच्या श्रद्धेवांचून माझं असं दुसरं काय आहे ?"

त्यावर कितीतरी वेळपर्यंत कृष्णाकृति निःशब्द होती; शेवटीं एकदांची पुनः प्रश्न करिते, " जीवनाचं जनक असं जें प्रेम, सृष्टीचं चालक असं जें प्रेम, त्यावर तुझी निष्ठा आहे ?"

" पूर्ण–पूर्ण निष्ठा आहे माझी ! " मी उत्तर केलें.

कृष्णाकृति किंचित वांकली ! तीची उज्वलता आतां स्पष्ट दिसूं लागली. पायाखालच्या तमोदधीकडे हात करून ती पुढें म्हणाली, " तुझं प्रेम जर इतकं बलवंत आहे, तुझी श्रद्धा जर इतकी प्रगाढ आहे, तर टाक उडी या महोदधींत."

मी ऐकते आहें, तें खरंच काय ? माझी मला शंका येऊं लागली. मला देहत्याग करायला सांगणाऱ्या त्या मूर्तींकडे आणि तिच्या हाताकडे दृष्टिक्षेप केला. क्षणभर मी भयंकर भीतीनें आणि भयंकर शंकेनें बावरून गेल्यें. ही कृष्णाकृति मजकडून आत्मघात करविते आहे ? कीं माझी सत्वपरीक्षा पहाते आहे ? हिची आज्ञा पाळणें आपलें कर्तव्य आहे काय ?–मी आपला अंतरकेंद्र हुडकूं लागल्यें. सर्व शक्ति एकवटून मनोबल अजमावूं लागल्यें. मजमधील नश्वरांश त्या अज्ञाताच्या कडेवर थरथर कांपत होता. अंतराळामधील अमित तारासमूहाकडे दृष्टि फेंकली. पायाखालच्या कृष्णमहोदधीकडे दृष्टि फेंकली आणि दीनपणें हात जोडून त्या कृष्णाकृतीकडे पाहूं लागल्यें.

" तुझं प्रेम जर इतकं बलवंत आहे; तुझी श्रद्धा जर इतकी प्रगाढ आहे, तर कां नाहीं घेत उडी या महोदधींत ?" पुनः कृष्णाकृतीनें विचारलें.

क्षणभर प्रगाढ शांत राहिल्यें, माझें सर्व जीवन मजपासून विभिन्न होऊन माझ्या मुठींत आल्यासारखें मला वाटलें. डोळे पाण्यानें भरून आले, हात जोडून मी त्या पाषाणहृदयी कृष्णाकृतीच्या मुखाकडे टक लावून पहात राहिल्यें.

" तुझं प्रेम जर इतकं बलवंत आहे; तुझी श्रद्धा जर इतकी प्रगाढ आहे, तर भीति कसली वाटते तुला ?" कृष्णाकृतीनें पुनः प्रश्न केला.

आतां मात्र माझा अंतरकेंद्र सांपडला. खऱ्या जीवनाच्या पायावर मी उभी राहिल्यें, अविनाशी शक्तीच्या भूमीवर मी निश्चल झाल्यें, आणि एकदम निश्चय केला.

" माझा नाश कशानं होणारा आहे ? माझ्यांतील अमरांश कशानं मरणार ? इहलोकीं वा परलोकीं भीति कशाची वाटायची ? " असा मी मनाचा

नेर्धार करून डोळे मिटले, आणि जोडलेले हात पुढें करून त्या अनंत तमोसागरांत एकदम उडी घेतली.

* * *

डोळे उघडून पहात्यें, तर सौम्य आरक्त प्रकाश, फुलांचा परिमल आणि मधुर संगीत. मी एका माच्यावर पडलेली असून, गुरुमहाराजांची स्वारी माझा हात आपल्या हातीं घेऊन माझी नाडी पहाते आहे. त्यांनां पहातांच मी उठून बसण्याचा प्रयत्न केला.

" स्वस्थ पडून अस " गुरुमहाराज म्हणाले; " बेटा, तूं आज फार श्रम केले आहेस. "

गोड–गाढ झोपेंतून जागें झाल्याप्रमाणें मला यावेळीं सुखानुभव घडत होता, माझ्या नसानसांतून नवें तेजोजीवन संचरत आहे, असें मला वाटत होतें; ह्मणून गुरुमहाराजांच्या आज्ञेप्रमाणें स्वस्थ पडून त्याचा अनुभव घ्यावा, असें मला स्वाभाविकच वाटलें. ज्या या खोलींत मी पडलेली होत्यें, ती मला नवीनच असून, तिच्यांत मूर्तिमंत शोभा नांदत होती; निश्चल पडून ती पहात रहावी असें मला वाटलें. सर्व चिंता, सर्व अडचणी दूर–दूर–दूर गेल्या असें मला वाटूं लागलें.

" दिव्याला उतरलें मी ?" स्मित करीत, भीत भीत मी गुरुमहाराजांनां प्रश्न केला.

" बहुतेक उतरलीस." महाराजांनीं उत्तर केलें.

मी उठून बसल्यें आणि म्हटलें; " मला कोणी वाचविली ? मी उडी घेतली, तेव्हां मला कोणी उचलून घेतली ?"

गुरुमहाराजांनीं स्मित करून म्हटलें, "वाचवायची ती कशांतून ? तूं का संकटांत पडली होतीस, ती तुला उचलून घ्यायची होती ?"

" संकटांत नव्हतें मी ?" मी साश्चर्य विचारिलें.

" छे, संकट बिंकट कांहीं नव्हतें तुजवर आलेलें!"

" ह्मणजे ?" मी पुनः प्रश्न केला.

" धीरानं घे !" महाराज सौम्यपणें ह्मणाले.

" सर्व गोष्टींचा उलगडा आस्ते आस्ते होईल. आतां इतउत्तर तूं या खोलींत राहावयाचें, तुझ्या पूर्वीच्या खोलींतून तुझं सर्व सामान इथं आणविलं आहे. तुझं हें दिव्य भयंकरच होतं; आतां मात्र तुला भय वाटण्याचं कारण नाहीं, मी थोड्याच वेळानं परत येईन; तोंवर तुझं स्नान वगैरे आटपूंदे."

" यावर मी कांहीं बोलायला महाराज तेथें राहिलेच नाहींत, एकदम निघून गेले.

तदनंतर मी माच्यावरून उठलें. अननुभूत शक्ति व आनंद यांचा यावेळीं मजमध्यें संचार झाल्यासारखें मलावाटूं लागलें. या खोलींत वास करीत असलेली शांतता, सौंदर्य यांनीं मी भारून गेल्यें. जिकडे दृष्टि वळवावी, तिकडे सौंदर्याचा ध्वनि निघत होता. खिडक्यांनां आरक्त रेशमी पडदे होते; खिडक्यांच्या बाहेर संगमरवरी बाल्कनी असून तिच्याखालीं चिमुकला बगीचा होता. बगीच्यांतून पुष्पलता बाल्कनींतचढून रमणीय दिसत होत्या.

यावेळीं मध्यान्ह झालेली होती, ह्मणून स्नानाचें साधन शोधूं लागल्यें, तों खोलीला लागूनच स्नानगृह दिसलें; त्यांत संगमरवरी फरसबंदी केलेली असून, फरसबंदींतूनच निसर्गजन्य निर्झराप्रमाणें 'बुड' 'बुड' करीत एक झरा वर येत होता. माझें सर्व सामान नीट व्यवस्थितपणें एका टेबलावर ठेवलेलें मला दिसून आलें. सर्वांत आश्चर्याची गोष्ट ही, कीं मला वाचायला दिलेलें ' जीवनवेद ' हें पुस्तकहि एका चिमुकल्या टेबलावर ठेविलेलें होतें.

मी स्नान केलें. झालेल्या दिव्यासंबंधीं विचार करायला मनाला अवधीच न देतां सद्यःप्राप्त आनंद–शांतीचा अनुभव घ्यावा, असें मला वाटलें. ह्मणून खिडकीजवळ खुर्ची घेऊन बाहेरील शोभा पाहूं लागले. सृष्टीचें ऐश्वर्य केवढें तरी हें ! सृष्टीशीं आपलें जीवन समधर्म केल्यानें हें सर्व ऐश्वर्य आपलेंच नव्हे का ? विधात्यानें अशी ही आपल्या सुखाची योजना केलेली असूनहि आपण काल्पनिक दुःखांत चूर असतों, हा कृतघ्नपणा नव्हे का ? असे विचार मनांत येत होते; तों मागें पाऊल वाजलें; पहात्यें तर गुरुमहाराज.

त्यांनां पहातांच मी त्यांचे पाय धरले. आशीर्वाद दिल्यावर टेबलाजवळील खुर्चीवर ते बसले व खिडकी-जवळील खुर्ची थोडी जवळ घेऊन त्यांची आज्ञा होतांच मी तिजवर बसल्यें.

' तुला आज कितीतरी गोष्टींविषयीं सांगायचं आहे;" ते ह्मणाले; "पण तें सगळें अगदीं थोडक्यांत सांगतों तुला, तूं जी इथं आलीस, ती योगविद्येंतील एक विशेष दिव्य घेण्याकरितां, आणि त्या दिव्याला तूं आतां उतरली आहेस, हें निःसंशय ! त्यांतला

फक्त एक शेवटला प्रकार राहिलेला आहे; त्याविषयीं मी अंमळशानें तुला सर्व सांगेन. सध्यां तुझा असा समज आहे, कीं हें झालेलें दिव्य उतरतांना आपण बऱ्याच अडचणीच्या प्रसंगांतून गेलों आहोंत; पण खरा प्रकार तसा नाहीं हें अडचणीचें प्रसंग केवळ मानसिक स्वरूपाचे होते; ते अनेक डोक्यांनीं तुझ्या एका मनावर घडवून आणलेले प्रसंग होते; त्या अनेक डोक्यांनीं इच्छिलेले शब्द तुला ऐकूं येत होते: त्यांनीं इच्छिलेलीं दृश्यें तुला दिसत होतीं."

मी गुरुमहाराजांकडे आश्चर्यानें पाहूं लागल्यें.

"आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं;" ते ह्मणाले. "या जगामध्यें, हवा पाणी व नैसर्गिक परिस्थिति, यांहून आपल्या सहबांधवांच्या व सहभगिनींच्या आचार–विचार–उच्चारांचा परिणाम आपणांवर कितीतरी अधिक होत असतो; मानवी प्राणि हा नेहमीं त्याच्या स्वतःच्या विचारलहरींनीं, तसाच त्याच्या सभोंवतालच्या मानवांच्या विचारलहरींनीं परिवेष्टित असतो. आणि यामुळेंच तो जर आपला अंतरकेंद्र हुडकून काढण्याइतका बलवंत इच्छाशक्तीचा नसेल, तर त्याजवर इतरांच्या विचारविकारादिकांचा परिणाम होत असतो. जो आत्मा इतरांच्या या मानसिक शक्तीचा प्रतिकार करूं शकेल, तो सर्वांवर आपलं स्वामित्व प्रस्थापित करील. पण हें कांहीं सर्वांनांच शक्य नाहीं. सर्व साधारण माणसांवर हे परिणाम घडतच असतात. आप्तेष्टांच्या व मित्रांच्या उत्साहभंगानं कितीतरी उदात्त ध्येयें चूर्ण होत असतात. त्यांच्या भयध्वनीनें कितीतरी शूर कृत्यें न घडतां रहातात. याप्रमाणें उच्च विचार आचारादिकांचा विध्वंस करणाऱ्या बाह्य शक्तीच्या संहारानें भूतल स्वर्गसुखाला मुकलेलं आहे, हें खचित."

क्षणभर थांबून गुरुमहाराज पुढें ह्मणाले; "या भूतलावर तुझे अनेक जन्म होऊन गेलेले आहेत, हें मी तुला सांगावयाला हवं असं नाहीं. या अनेक जन्मीं तुझ्या विधिनियोजित जीवार्धाशीं तुझा अनेकदां संबंध आलेला आहे; पण तितक्याच वेळां तूं त्याचा त्याग केलेला आहेस; हा आपल्या प्रियकराचा तूं जो त्याग केलास, तो स्वेच्छेनं केलास असं नाहीं; तर केवळ इतरांच्या इच्छाशक्तीला बळी पडून केलेला आहेस. या सांप्रतच्या जन्मीं तुला तुझ्या प्रियकराचा स्वीकार करण्याची संधि मिळालेली आहे. मजकडे तूं येतीनास, तर या जन्मींहि तूं आपल्या जीवार्धाला मुकली असतीस, हें संभवनीय आहे. आणि हें पाहूनच मी तुला या आश्रमांत, आश्रमाचे नियम बाजूला ठेवून, येऊं दिली. अगदीं आरंभींच सभामंडपांत स्वस्तिकासमोर तूं जें साहस दाखविलंस, त्यानं तुझं एकंदर दिव्य सौम्य झालेलं आहे. स्वस्तिकतेजानं तुला आकर्षित केली आणि तुझा आत्मा त्या मूलतत्त्वानं आकर्षित झाला शंका व भीति यांनीं त्या आकर्षणाचा तूं प्रतिकार करतीस, तर तुझं दिव्य अधिक प्रखर झालं असतं, पण पहिलं पाऊल तूं विशेष धैर्यानं टाकलंस, त्यामुळें तुझें दिव्य सौम्य झालं."

गुरुमहाराज पुनः थोडे थांबले आणि ह्मणाले "आपण प्रत्यक्ष घडलेल्या प्रसंगांतून गेलों आहों, असा तुझा समज असल्याचं मी आतांच ह्मटलं. पण त्या प्रसंगांचं अस्तित्व केवळ मानसिक सृष्टींतील होय. ते प्रसंग प्रत्यक्ष सृष्टींत मुळींच घडलेले नव्हत. तूं आपल्या पूर्वींच्या खोलींत असतां मी व माझ्या चार शिष्यांनीं तुला आपल्या इच्छाशक्तिक्षेत्रांत आणून, तुझ्या सर्व मनोशक्तीवर आम्ही आपलें स्वामित्व बसविलें; अशा स्थितींत आह्मांस वाटले ते शब्द तुला ऐकावयास लाविले; आह्मांस वाटलीं तीं दृश्यें तुला पहावयास लावलीं. तुझा आत्मा आमच्या इच्छाशक्तीचा प्रतिकार करतो, कीं कसें, हेंच पहाण्याचा आमचा हेतु होता. ह्मणजे याचा अर्थ आम्ही तुला फसविली असा नाहीं. इतरांच्या इच्छाशक्तीचा प्रतिकार करून तिजवर स्वामित्व मिळविणं, हें जें जीवनांतील पहिलें तत्त्व, त्याचंच तुला प्रत्यक्ष ज्ञान करून दिलं आहे."

गुरुमहाराजांच्या म्हणण्याचा अर्थ मला स्पष्ट कळला व मी त्यांचें पुढील भाषण ऐकायला आतुर झाल्यें.

"जगांत जरा बारकाईनें बघ;" ते पुढें ह्मणाले; "ह्मणजे माझ्या ह्मणण्याचा अर्थ तुला नीट कळेल, जगांत अशी कितीतरी माणसं वावरताहेत, कीं जीं दुसऱ्यांच्या इच्छाशक्तीला बळी पडल्यामुळं कर्तृत्वशून्य झालीं आहेत. कितीतरी प्रतिभासंपन्न पुरुष, प्रतिभासंपन्न स्त्रिया जगांत वावरताहेत कीं जीं या विरोधक परेच्छेनें पिंजऱ्यांतील पांखरं होऊन राहिलीं आहेत. अयोग्य पत्नीशीं जखडलेल्या सहस्र पुरुषांचीं उदाहरणं पहा, त्यांच्या सर्व उड्या स्वप्नवत झालेल्या तुला दिसून येतील, अयोग्य पतीशीं जखडलेल्या सहस्र

स्त्रियांचीं उदाहरणं पहा, त्यांचं सर्व कर्तृत्व चुलीपुरतं झालेलं तुला दिसून येईल. परेच्छेचा हा सर्व प्रभाव होय. जगांतील अर्धीअधीक दुःखें परेच्छेला वळी पडल्यानं आलीं आहेत. या परेच्छेचा प्रतिकार करण्याचं सामर्थ्य हजारांतून एखाद्यांत सुद्धां दिसत नाहीं. अयोग्य पत्नीशीं जखडलेला पति, अयोग्य पतीशीं जखडलेली पत्नी हीं दोन्हींहि आपलं अधःपतन करून घेत असतात. प्रेम–परिसाचा त्यांच्या जीवनाला स्पर्श न झाल्यामुळं, दुःखाला सुख बनविणारं प्रेम त्यांच्या जीवनांत नसल्यामुळं त्यांचे जीव सद्यःजीवनाला कंटाळतात, आणि म्हणूनच त्याचा त्याग करण्याच्या तयारीला लागतात. म्हणूनच 'वार्धक्य' आणि 'मृत्यु' हीं पुढं ठेविलेलीं असतात."

येथें मी एक प्रश्न करणार होत्यें. पण गुरुमहाराजांनीं हातानें मला गप्प बसविलीं व ते म्हणालेः—

" तुझी सांप्रतची अध्यात्मिक अवस्था अशी आहे कीं, तुझ्या विधिनियोजित जीवार्धाशीं तुझा संबंध आलेला आहे. म्हणजे तुझें जीवन सांप्रत परिपूर्ण असें झालेलं आहे. आणि हें तुझं महद्भाग्य असल्यामुळं विरोधक इच्छाशक्तीचे तुजवर आघात होणारच होणार. म्हणून मी आणि माझे चार शिष्य यांनीं तुला आमच्या इच्छाशक्तिक्षेत्रांत आणून, स्त्रियांची मनोवृत्ति ज्या गोष्टींनीं चळते, त्या गोष्टींचा तुजवर परिणाम करण्याचा प्रयत्न केला. त्या गोष्टी म्हणजे संशय, मत्सर व तज्जन्य इतर विकृति या होत. सुधाकराच्या मृत्यूची प्रथम तुला वार्ता सांगितली. नंतर त्याच्या विश्वासघाताचा पाढा वाचला. तसेंच, भिंतीपलीडीकल ध्वनि तूं ऐकलेस पण ते खरे ध्वनि नसून केवळ भास होत. भीषण आकृतीहि तूं पाहिल्यास; पण त्यांचं अस्तित्व केवळ आमच्या इच्छाशक्तीमुळं झालेलं, व त्या तुझ्या मनोदृष्टीला दिसलेल्या होत. अपरिचित स्थळींहि तूं गेलीस, असं तुला वाटलं; पण खरा प्रकार असा, कीं तुझ्या त्या खोलींतून तूं हललीहि नाहींस."

" काय खरंच ?" मी साश्चर्य विचारलें.

" खरंच, तूं हललीहि नाहींस. या सर्व प्रकारांत खरा असा भाग एकच. तो हा " जीवनवेद " ग्रंथ तुला टेबलावर आढळल्याचा. हा पहा तो ग्रंथ इथं आहे. याची आणखी कांहीं पानं तूं उलटलीं असतींस, तर तुला हीं महत्त्वाचीं वाक्यं आढळलीं असतीं." असं म्हणून महाराजांनीं पुढील मजकूर त्या ग्रंथांतून वाचून दाखविला.

" सर्व प्रकारचं कर्म हें विचाराचं दृश्य रूप होय. प्रेमतत्त्वास अनुसरून जो विचार होतो, तो सौंदर्यसंपन्न अविनाशी कृति प्रसवितो. प्रेमतत्त्वाचा त्याग करून जो विचार होतो, तो भ्रम, शंका, बुद्धिभ्रंश उत्पन्न करणाऱ्या कृती प्रसवितो. यापरतें दुसरें जीवन–रहस्य नाहीं, यापरतें दुसरें अक्षय यौवन देणारें अमृत नाहीं. या परतें दुसरें अमरत्व नाहीं. "

हे शेवटचे शब्द महाराजांनीं असे कांहीं परिणामकारक रीतीनें उच्चारिले, कीं ते ऐकून माझें अंतर्ग्राम माधुर्यशांतीनें कोंडून गेलें.

" तूं जें आरंभींच धैर्य दाखविलं होतंस, त्यामुळें मला आणि माझ्या शिष्यांनां तुजविषयीं विशेष कळकळ वाटूं लागली होती. म्हणून धैर्याच्या बाबतींत तुझी आम्ही पुरीच परीक्षा पाहिली. मृत्यूलाहि तूं कःपदार्थ केलेलं पाहून आम्हाला फार आनंद झाला. 'मृत्यु' असा नाहींच, अशी अढळ श्रद्धा ठेवून प्रेमाकरितां तूं देहत्याग केलेला पाहून आम्हाला कां नये आनंद होऊं ? आतां एकच गोष्ट तुला विचारतों. आम्ही जें तत्त्व तुझ्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न केला, त्याचं महत्त्व तुझ्या लक्षांत आलं ना ?"

" होय महाराज, तें तत्त्व स्वावलंबन हेंच नव्हे का ? " मी उत्तर केलें.

" हो स्वावलंबन आणि प्रेम. स्वावलंबन आणि प्रेमरूप परमेश्वर. आतां तूं परत व्यावहारिक जगांत जाणार तेथें तुला सहस्र गोष्टींशीं झगडावं लागणार. लोकमत, टीका, उपहास, निंदा, गैरसमज यांचा तुजवर सारखा मारा होणार. जीवन, यौवन, प्रेम यांच्याकरितां तूं येथवरचा हा प्रवास केल्याचं जगाला सांगशील, तसंच तूं येथें काय शिकलीस हेंहि कळविशील, तेव्हां काय !--जग तुझी हांसून हांसून पुरेवाट करील. तुझ्या आणि सुधाकराच्या प्रेमसंबंधाविषयीं ' ब्र ' काढतांच, तुमच्या आड येण्याचे सहस्र प्रयत्न केले जातील. जगाशीं हा जो तुला संग्राम करावा लागणार, तो तूं कसा करणार, कोणत्या शस्त्रांनीं तूं लढणार ? "

" ज्या शस्त्रांनीं इथं लढल्यें, त्याच " मी उत्तर दिलें–" अमंगलानं फसून न जातां, मंगलाचीच कास धरून.

हृदयभेदक दृष्टीनें महाराज मजकडे पाहूं लागले व म्हणालेः—

" क्रुद्ध लोकमत ही केवढी भयंकर शक्ति आहे, तुला ठाऊक आहे ? प्रचंड वृक्ष मुळासकट उपटणारा झंझावत त्या लोकक्षोभापुढें कांहीं नाहीं. त्याच्याशीं तुझा संबंध येणार. खंबीर सहायकर्तेहि ऐनवेळीं दगा देतात. आणि तुला तर जगांत कोणाचंच सहाय्य नाहीं !"

मी दीर्घ निश्वास सोडला व म्हटलें, " पण इथल्या दिव्याचा शेवटला प्रकार राहिला आहेना ? त्यांत हें मला कळणारच कळणार. नाहींका ?"

" होय. त्यांत तुला हेंच कळेल, त्यांत तुझी याच बाबतींत परीक्षा होईल. " गुरुमहाराज म्हणाले, " पण सुधाकराची खुशाली तुला कळली असेलच. "

" छे नाहीं. ती कशी कळणार ?" मी उत्तर केलें.

" बेटा, तो खुशाल आहे बरं ! तूं काळजी करूं नको ." गुरुमहाराज स्मित करून म्हणाले.

" पण–" मी म्हटलें.

" पण " गुरुमहाराज म्हणाले, " पण त्याचं तुजवरील प्रेम मावळलं असलं तर. असंच, किनई तुझं म्हणणं ?"

मी खालीं पाहूं लागलें.

" वेड्या मुली, तुला ती काळजी नको. " महाराजांनीं दयार्द्र दृष्टिनें मजकडे पहात उत्तर केलें. क्षणभर कोणीच कांहीं बोललें नाहीं. तदनंतर महाराज म्हणालेः—

" जग ज्या गोष्टींना 'चमत्कार' म्हणून मानतें त्याविषयीं आतां तुला थोडंसं सांगावयाचं आहे. मला वाटतं, तुला यावेळीं पूर्ण प्रकृतिस्वाथ्य व तज्जन्य उल्हास यांचा अनुभव मिळतो आहे. "

" होय महाराज !" मी स्मित करून उत्तर केलें.

" तर मग " महाराज पुढें म्हणाले; " जोंवर तूं या जीवनशक्तीचं नियंत्रण करशील तोंवर हें प्रकृतिस्वाध्य व ही उल्हसित वृत्ति हीं तुला लाभलींच पाहिजेत. इतकेंच नव्हे तर अवघी सृष्टि या काळीं तुला सहाय्य करील. सृष्टिजवळ तूं मागण्याचा अवकाश, ती तुला द्यायला नेहमीं तत्पर आहे. सूर्याजवळ तेजदान माग, तो तें तत्काळ तुला देईल. झंझावत, पर्जन्य यांच्याशीं त्यांची धडाडी माग, ते ती तुला देतीलच देतील. पुष्पांपाशीं त्यांचे वर्णगंध माग, तीं त्याजपासून तुला मिळालीच, म्हणून समज. तूं मागून मिळणार नाहीं, असं सृष्टींत कांहीं नाहीं."

असें म्हणून गुरुमहाराज उठले आणि बाल्कनीची खिडकी सताड उघडून बाल्कनींत गेले.

"हीं पहा–" मला हातानें बोलावून ते पुढें म्हणाले; "हीं गुलाबाचीं फुलं पहा. हीं सृष्टिधर्मानुसार कशी वर–वर–वर जात आहेत. त्यांचा एक पुंज तूं आपल्या इच्छाशक्तीनं खालीं तुजकडे लवव पाहूं."

आश्चर्यचकित होऊन मी गुरुमहाराजांकडे पहात राहिल्यें.

" हूं ! इच्छाशक्तीच्या एका झटक्यासरशीं लवव त्यांनां खालीं ! " महाराज म्हणाले.

मी लागलीच माझी दृष्टि त्या उन्नत होणाऱ्या गुलाबपुंजांतील एकाकडे केली, आणि मनांत त्या पुंजाला खालीं लवण्याची आज्ञा केली. परिणाम तत्काल दिसून आला. जणूं काय एखाद्या वायुलहरीनं तो पुंज वाकावा, तसा वाकून माझ्या हाताला येऊन लागला.

" अज्ञान माणसाला हा चमत्कार वाटेल, नाहीं ?" गुरुमहाराज म्हणाले, " पण वास्तविक पहातां तुझ्या इच्छाशक्तीनं तुझ्यांतील चुंबक तेजोकिरणाची जडशक्ति केंद्रीभूत होऊन तिनं हा पुष्पपुंज तुजकडे ओढला. लोहचुंबक–मणि आजवर जें करीत आला आहे, तें या ठिकाणीं झालं आहे; यांत चमत्कार तो कसला ? आतां होऊं दे तो पुंज पुनः उन्नत. "

मी तसें केलें व गुलाब पुंज पुनः उन्नत झाला.

" हा तुला एक वस्तुपाठच मिळाला. " गुरु–महाराज म्हणाले, " या फुलांवर तूं आपली आकर्षणशक्ति जितक्या सहजतेनं चालविलीस, तितक्या सहजतेनं ती तुला इतउत्तर वाटेल त्या वस्तूवर चालवितां येईल. आरोग्याचे व जीवनाचे जंतु तुला आकर्षण करून घेतां येतील, तसेंच रोगाचे व विनाशाचेहि. दोन्हीहि गोष्टी तुझ्या हातच्या आहेत. सूर्याजवळून तुला मज्जाशक्ति व स्नायुशक्ति घेतां येईल, सौंदर्यसंपन्न पदार्थाजवळून तुला सौंदर्यलाभ करून घेतां येईल. जें तुला हवं असेल त्यावर तूं आपली अंतर्शक्ति केंद्रीभूत करायची, म्हणजे तें तुझें झालेंच समज. आणि हें तुझं सामर्थ्य व्यायामानं वाढत जाईल. पण एक गोष्ट मात्र लक्षांत ठेव कीं या सामर्थ्याचा उपयोग तूं प्रेमतत्त्वाला अनुसरून केला पाहिजेस, प्रेमतत्त्वाचा त्याग करून कधींहि करतां उपयोगी नाहीं."

असें म्हणून महाराज जाऊं लागले, "पण-" ते मध्येंच थांबून म्हणाले, "रात्रौ हरानंद येईल, त्याजबरोबर तूं सभामंडपांत यायचं. तदनंतर तुझं शेवटचं दिव्य होईल. आपलं धैर्यसर्वस्व दाखवायचं; समजलीस ?"

मी गुरुमहाराजांचे पाय धरले.

" म्हणजे मग जीवनरहस्य तुला करतलामलकवत् झालंच, म्हणून समज."

---

## प्रकरण विसावें

## " तेजांत ! "

स्वामिमहाराज निघून गेल्यावर मी ज्या शुद्ध आनंदाचा अनुभव घेतला, तो केवळ अवर्णनीय असा होता. भोंवतालीं पसरलेल्या सृष्टिसौंदर्याच्या आरशांत प्रत्यक्ष परमेश्वराचें रूप उमटलेलें मला दिसून आलें. उन्नत होऊं पाहणाऱ्या जीवाला दटाविणारें असें अवघ्या सृष्टींत कांहींहि नाहीं. जीवाला आपल्या दैवी सामर्थ्याची जाणीव मात्र व्हावयास हवी; म्हणजे विधिघटनेच्या नियमांनीं तो अत्युच्च दैवी सामर्थ्यांप्रत पोंचलाच पाहिजे. असे विचार माझ्या मनांत येत होते. या विचारांतील तत्त्व यापूर्वी मला अस्पष्ट असें कळलेलें होतें, यावेळीं तें स्पष्ट कळून आलें. अखिल बाह्य सृष्टि आपल्या अंतःशक्तीचें दास्य करण्याकरितांच अस्तित्वांत आहे, ही गोष्ट मला यावेळीं कळून चुकली.

खिडकीशीं बसून विचार करतां करतां, आजच्या या शेवटच्या दिव्याचें स्वरूप तरी कशा प्रकारचें असणार ? असा मी आपल्या मनाशीं प्रश्न केला. त्याचें स्वरूप कांहीं का असेना, गुरुमहाराजांनीं सांगितल्याप्रमाणें मी आपलें धैर्यसर्वस्व दाखवावयास हवें, इतकें खरें ! असें माझ्याच मनानें प्रश्नाला उत्तर दिलें.

आश्रमांत वेळ कळण्याचें साधन नव्हतें, तरी वर आकाशाकडे पाहतां तिसरा प्रहर असावा, असें दिसून आलें. नित्यक्रमाप्रमाणें ही माझ्या भुकेची वेळ, असें मनांत येतांच, भूक वाटूं लागली. मागें वळून पहातां तिपाईवर एका ताटांत नित्याची डाळ-रोटी-तूप व खालीं पाण्यानें भरलेला तांब्याहि सज्ज. तत्काळ मी आपली भूक शमविली. येथें येऊन मला दिवस तरी किती झाले ? तें कांहीं माझें मला सांगतां येईना. अध्यात्मसृष्टींत कालाला अस्तित्व नाहीं, या गोष्टीची प्रचीति यावेळीं मला आली. याविषयीं विचार करतां टेबलावरील ' जीवनवेद ' ग्रंथाकडे लक्ष गेलें. लागलींच पुस्तक उघडून पाहूं लागल्यें, तों पुढील मजकुरानें दृष्टि ओढलीः—

### ' कालाची माया '

या भूतलाबाहेर कालाला अस्तित्व नाहीं. मानवजात ऋतु-दिन-घटि गणना सूर्यावरून करते; पण सूर्याच्या पलीकडे सहस्र सहस्र सूर्य आहेत त्यांच्या तुलना करतां सूर्य हा एक क्षुद्र तारा होय. अनंत अवकाशांत 'कालच ' नाहीं. तेथें फक्त अनंतत्वच वसतें आहे. म्हणून अविनाशी आत्म्यानें अविनाशी गोष्टींशीं आपला संबंध ठेवावा; आणि आपलें जीवन वर्षांनीं गणूं नये. त्यांच्या जीवनाला अंत नाहीं, म्हणून वार्धक्य व मृत्युहि नाहींत. आयुष्य जात चाललें एवढ्याचकरितां जे कोणी आपणाला उदासीन व दुर्बल होऊं देतात, त्यांच्याठिकाणीं कांहींतरी मानसिक वा आध्यात्मिक दुर्बलता आहे, असें समजावे. आत्मा हा चिरतरुण आहे; आणि ज्या देहांत त्याचें वास्तव्य त्या देहाचें तारुण्य तो आपल्या स्वयंसामर्थ्यानें राखूं शकतो. आत्म्याच्या या स्वयं सामर्थ्याची ज्यांना जाणीव नाहीं, त्यांनाच जरा व दौर्बल्य हीं येतात. ज्या स्थित्यंतराला 'मृत्यु' म्हणतात, तें घडवून आणणारें विध्वंसन केवळ आत्माच थांबवूं शकतो. या गोष्टी स्वयंसिद्ध आहेत; म्हणूनच जणूं त्या खऱ्या वाटत नाहींत."

इतकें वाचून मी पुस्तक खालीं ठेवलें, तों काय ! अत्यंत मधुर संगीतलहरी दूर-दूर-दूर अंतरावरून खिडकीकडे वहात येत होत्या, त्यांनीं सर्व वातावरण सकंप झालें होतें. मजमध्यें त्या सहस्र विचार, सहस्र कल्पना जागृत करूं लागल्या. कांहीं अकल्पित कारणांनीं सुधाकरांचा व माझा वियोग झाला, किंवा मजविषयीं त्यांचें मन पालटलें, तरी मजमध्यें फरक का व्हावा ? माझें त्यांच्यावरील प्रेम रतिभरहि कमी कां व्हावें ?

आमचें प्रेम जडातीत होतें; तें अध्यात्मिक होतें. मग आमचा योग घडून येण्यास आमचा विधिनियोजित योग घडून येण्यास, आणखी कांहीं काल लागला, ह्मणून काय बिघडलें ? जीवनाचें खरें सुख, प्रेम करून घेण्यापेक्षां प्रेम करण्यांतच आहे. प्रेमदान करणाराला जें सुख लाभतें तें प्रेमविषय होणाराला नाहीं.

गीतस्वर उच्च नीच होत होते आणि माझी मनोनौका त्यांच्या लहरीवर वहात जात होती. अति क्षुद्र हेतूंच्या साफल्यार्थ जीवनसर्वस्व घालविणाऱ्या सहस्रावधि माणसांच्या असंतुष्टपणाचे विचार मनांत येऊन मला त्यांची कींव आली. माणसें जर अत्युच्च ध्येयें दृष्टीपुढें ठेवतील, नैसर्गिक उच्च मनोवृत्तीला वाव देतील स्वयंविश्वावर खरें स्वामित्व चालवितील, तर जीवन किती आनंदपूर्ण होईल. आणि मग भूतलावर खराखुरा स्वर्ग अवतरला, असें होणार नाहीं काय ?

अशा विचारांत मन वहातां वहातां वेळ किती गेला, याचें भान राहिलें नाहीं. तिसरा प्रहर संपला, संध्याकाळ गेला, व रात्रीचा काळोख पडूं लागला. आकाशांतील एका अत्यंत दीप्तिमान ताऱ्यानें माझें लक्ष ओढून घेतलें, तेव्हां माझे विचार थांबले. नंतर मी खिडकींतून उठून खोलींत येरझारा करूं लागल्यें. इतक्यांत डोकीवरील विद्युद्दीप एकदम प्रज्वलित झाला. भिंतीवर टांगलेल्या तसबिरांकडे लक्ष जाऊन, त्या पाहूं लागलें; तों पूर्वभिंतीवर मध्यभागीं प्रमुखपणें लाविलेली एक तसबीर पाहून, हृदयानें एकदम उडी घेतली. सुधाकरांचा तो रंगीत अर्ध–फोटो होता. ती प्रतिभावंत दृष्टि मजकडे लागली आहे, असें मला वाटलें. मुखश्रीवरील तें स्मित मला पाहून उमटलें आहे, असें मला वाटलें, " मी फसवीन असं तुला वाटलं ! " असें सुधाकर मला विचारताहेत असें मला वाटलें. आपलें प्रेम असलेल्या माणसाच्या चित्रांतदेखील केवढी शक्ति असते, तें मला यावेळीं कळलें; आणि त्यांत, चित्रांत वैयक्तिकता उतरली असली, ह्मणजे तर काय, ती शक्ति अवर्णनीय असते. या बस्टफोटोंत सुधाकरांची वैयक्तिकता पूर्ण उतरलेली होती. त्याकडे पहातांच, ते माझे अनंतकाळचे परिचित, हा भाव मनांत उभा राहिला. मी त्यांच्याकडे हृदय उचंबळून येऊन पहात राहिल्यें, आणि ते जणुं प्रत्यक्ष उभे आहेत, असें समजून त्यांच्या जवळ बोलूं लागल्यें:—

" आपली भेट केव्हां बरं होईल. आपण माझे सर्वस्व, माझ्या जीवनाचे आधार, माझ्या विचारांची–माझ्या आचारांची स्फूर्ति, माझ्या विश्वाचे ईश्वर, हें मी आपल्याला कसं बरं कळवूं ? आपली सहचारिणी होणं, हें माझ्या महत्त्वाकांक्षेचं अत्युच्च शिखर, तें मला केव्हां बरं मिळेल ? आपल्या दोन अर्ध्या जीवनाचा संयोग केव्हां बरं होईल ? आपला जीवनयोग केव्हां बरं घडून येईल ? केव्हां बरं ?"

माझे डोळे पाण्यानें भरून आले. दुराग्रहानें, शंकेखोरपणानें मी केवढ्यातरी सुखास आंचवलें, तें मला यावेळीं कळलें.

खोलीचें दार संयपणानें उघडून हरानंद आंत आले. त्यांनां पहातांच मी अश्रू पुसले.

" मला नेण्याला आलां आहांत, नाहीं का ?" मी त्यांनां विचारिलें, " मी तर यायला सज्ज आहे."

" होय माई " हरानंद म्हणाले, " ही कौपीन चढवा आणि चला मजबरोबर " असें म्हणून तांबड्या कौपिनीची घडी त्यांनीं माझ्या हातीं दिली. मी ती लागलींच अंगावर चढविली.

" या खोलींत तुम्हाला पुनः येतां नाहीं आलं, तर तुमच्या कोणा आप्तेष्टांनां कांहीं निरोप वगैरे सांगून ठेवायचा असल्यास सांगा मला तो " हरानंद जड आवाजानें मला म्हणाले.

मी घाबरून गेल्यें. माझं दिव्य इतकं का भयंकर आहे ? क्षणभर विचार केला आणि स्मित करून मी म्हटलें, "निरोप असा कांहीं नाहीं कळवायचा पण मी इथं परत येणार नाहीं असं कशावरून ?"

" माई !" हरानंद सद्गदित स्वरानें ह्मणाले; " हें दिव्य फारच थोडीं माणसं उतरलीं आहेत. गेल्या दहा वर्षांत अवघीं दोघ याला उतरलीं !"

" त्या दोघांतले एक ?"

मी प्रश्न केला, त्याचें उत्तर ह्मणून त्यांनीं सुधाकरांच्या चित्राकडे हात केला; पण त्याचें उत्तर येण्या आधींच मी तें सांगूं शकले असते, नाहीं का ?

" भ्यायचं काय ह्मणून ? चलावं आतां सभामंडपांत !" असें मी ह्मणतांच ते मुकाट निघाले व मी त्यांच्या मागून चालूं लागल्यें.

आम्ही कित्येक सोपान उतरलों. कित्येकांत मंद प्रकाश दिसत होता; तर कित्येकांत मुळींच प्रकाश नव्हता. रात्र चांगलीच पडली होती. खिडक्यांतून बाहेर दृष्टि

टाकतां तारांगण झळकत असलेले दिसलें. मी आश्रमांत आल्यें त्याच दिवशीं दिसलेलें तें रमणीय कारंजें व त्याभोंवतालचें शुभ्रधवल संगमरवरी मंदिर हीं झुमराच्या डंबरींतून पहिल्या दिवसाप्रमाणेंच दिसत होतीं. स्निग्ध, शांत, अल्हादकर असा विद्युत्प्रकाश पडलेला होता. त्या प्रकाशांत उडणारें तें कारंजें पहिल्या दिवसाप्रमाणेंच इंद्रचापाशीं स्पर्धा करीत असलेलें दिसत होतें. यापुढें आम्ही एक दीर्घ पाषाणसोपान उतारूं लागलों. त्याला कितीतरी वळणें होतीं. तीं संपून एकदांची आम्ही भूगर्भागारांत आलों. पहात्यें तर मजपुढें चाललेले हरानंद अदृश्य होऊन मी एकटीच राहिल्यें.

एकदम संगीतध्वनी ऐकूं येऊं लागले. त्यांच्या अनुरोधानें पुढें जातां प्रकाशाचा प्रचंड प्रवाह सभामंडपाच्या महाद्वारांतून बाहेर येत असलेला दिसला. बिनदिक्कत पुढें चालल्यें व महाद्वारांत पाऊल टाकलें. दीप्तिवंत स्वस्तिक अगदीं मजसमोर झळकत होतें; आरक्त कौपिनाधारी छात्रगण माझ्या दोन्ही अंगांस रांगेनें उभा होता. मी त्या रांगांमधून जाऊं लागल्यें, छात्रगण मजकडे मारख्या टकमक पहात होता. माझें हृदय धडधडूं लागलें; सर्वांग सकंप झालें. या इतक्या छात्रांच्या दृष्टीपासून माझी आरक्त कौपीन माझें रक्षण करीत होती; ह्मणूनच मी धीर धरून पुढें जात होत्यें: "तूं स्त्री! तूं इथं कां? जीं दिव्यें आह्मी उतरूं पहातों, तीं तूं कशी उतरलीस? व कशासाठीं उतरलीस?— अबलांचें आत्मबल पुरुषांइतकेंच आहे, हें दाखविण्याकरितां? कीं केवळ प्रेमाकरितां?" असे सहस्र प्रश्न त्या छात्रांची दृष्टि मला टाकीत होती.

असंख्य शक्ति मजभोंवतीं संचरताहेत, असंख्य डोकीं माझ्या अंतरात्म्याची परीक्षा पहाताहेत, असें मला वाटलें. पण त्यांचा पगडा आपणांवर बसूं द्यायचा नाहीं असा मी पक्का निर्धार केला. समोरच्या त्या तेजोमय स्वस्तिकावर दृष्टी ठेवून मी सरळ पुढें चालल्यें. स्वस्तिकाच्या प्रखर प्रकाशानें सर्व सभामंडप भरून गेला होता; त्या प्रखर प्रकाशांतून मंदगतीनें मी पुढें चालल्यें. संगीतप्रवाह वहातच होता, तरी माझ्या हृदयाची धडधड व शरीराचा कंप हीं कमी झालीं नाहींत. पण भीति ती कसली वाटायची? भ्यायचें तें काय ह्मणून? असा प्रश्न मी आपल्या मनाला करीत करीत निश्चयानें पुढें चालल्यें.

क्षणाभरांत स्वस्तिकाच्या पुढ्यांत, किंचित् बाजूला स्वामिमहाराजांची मूर्ति दिसूं लागली. स्वस्तिकदीप्तीनें ते वेष्टिलेले दिसत होते. मी त्यांनां पहातांच त्यांनीं मला पुढें येण्यास हातानें खूण केली. मी पुढें जाऊन त्यांच्या पायीं लोटांगण घातलें. त्याबरोबर संगीत बंद होऊन सर्वत्र शांत झालें. सर्व छात्रांची दृष्टि मजवर खिळली आहे असें मी दृष्टीनें न पाहतां जाणलें.

"ऊठ." मी लोटांगण घातलें असतां मला हातानें वर करून गुरुमहाराज ह्मणाले; "उठ. पुढें जा. तूं याहिपुढें गेलेली आहेस; पण आज त्याच्याहि पुढं गेलं पाहिजे. शेवटच्या दिव्याचं द्वार हें बघ उघडं झालं; शीर आतां आंत त्यांतून. परमात्मन् तुझं रक्षण करो."

महाराजांच्या आज्ञेप्रमाणें मी उठून उभी राहिल्यें. तो प्रचंड प्रकाश स्वस्तिक प्रवाह माझ्या दृष्टीवर येऊन आदळला. दीप्तिमान प्रकाश एकदम दुभंगून त्यापलीकडे प्रत्यक्ष अग्निमंदिर दिसूं लागलें. सहस्र रंगाच्या ज्वाला त्यामध्यें हलकल्होळ करीत होत्या. तें मंदिर ह्मणजे एक विशाल भट्टीच, सर्व कांहीं भस्मसात् करणारें होमकुंडच असें मला वाटलें. हें पहातांच मी गुरुमहाराजांकडे दृष्टिक्षेप केला. गुरुमहाराजांनीं त्या होमकुंडाकडे हात केला. हें मी पहातांच, एक क्षणभरहि न घुटमळतां तडक पुढें चालल्यें. "जगदीश तुझं रक्षण करो." असा सर्व छात्रांनीं एकच आशिर्वाद दिला. हें शेवटलें दिव्य उतरण्याच्या कृतनिश्चयानें मी एकएक पाऊल पुढें टाकूं लागल्यें.

पुढें जातां त्या हलकल्होळ करणाऱ्या ज्वाळा मला चाटूं लागल्या. तरी मी पुढें-पुढें चालतच राहिलें. यावेळीं मला वाटूं लागलें, कीं ज्या स्थित्यंतराला आपण 'मृत्यु' म्हणतों तेंच हें स्थित्यंतर आज मला खरोखर घडत आहे; आणि कदाचित याच साधनानें परलोकीं माझा आणि सुधाकरांचा जीवनयोग घडणार असेल. नाहीं कोणी म्हणावें? ह्मणून सुधाकरांचें ध्यान करून मी प्रत्यक्ष त्या अग्निकुंडांत पाऊल टाकलें.

अग्निकुंडांत पाऊल टाकतांच गुरुमहाराज, छात्रगण व तो सभामंडप हीं सर्व मला अदृश्य झालीं. अग्निकुंडाबाहेर असतां, ज्या ज्वाळांच्या चाटीनें मी होरपळून जाणार, असें मला वाटत होतें. त्या ज्वाला आतां पुष्पपरागांप्रमाणें सौम्य, स्निग्ध, सुगंध, शीतल वाटूं लागल्या. आश्चर्यचकित होऊन मी पुढें पुढें जात चालल्यें. जसजशी पुढें जात होत्यें तसतसें मला

अधिकाधिक धैर्य येत चाललें. एके ठिकाणीं या ज्वाळांतून मजवर स्फटिकवत् शुभ्र किरणांचा वर्षाव झाला; तर दुसऱ्या एके ठिकाणीं मनोहर अरुणप्रभेनें मला आच्छादून टाकिलें. एके ठिकाणीं प्रगाढ नील प्रकाशपुष्पांचा मजवर वर्षाव होत होता; तर दुसऱ्या एके ठिकाणीं पांचमण्याप्रमाणें हिरव्यागार प्रकाशांतून मी पुढें पुढें जात होतें तस तसा प्रकाश घनतर होत होता. त्यांत माझें सर्वांग पारदर्शक व तरल झाल्यासारखें मला वाटत होतें. सभोंवार विविधवर्णी पुष्पांच्या ताटव्याप्रमाणें त्या ज्वाला मला दिसत होत्या; कोठें कोठें तर त्यांचे लताकुंजच उभे आहेत असें दिसे व त्यांतून मी जात असे. याप्रमाणें मी पुढें पुढें जात असतां एकदम, समोर दूरवर, एक दिव्य मूर्ति उभी असलेली मला दिसली. ती केवळ एक क्षणभरच दिसली. तरी ती मूर्ति ह्मणजे कोण, हें मी तत्काळ ओळखलें. अधीकच धैर्य येऊन, माझ्या सर्व अंतःशक्ति एकवटून मी पुढें-पुढें जाऊं लागल्यें. सभोंवतालचा प्रदेश महोद धीच्या लाटांप्रमाणें मजवर आतां आदळूं लागला. आणि मग मी त्या लाटा नेतील तिकडे वहात वहात चाललें वहातां वहातां एका तेजोमय स्तंभावर जाऊन आदळल्यें. मी त्यावर आदळतांच, त्या स्तंभाचें एक विशाळ, दशदिशा व्यापून टाकणारें तेजोवलय झालें. तें पहातांच माझी दृष्टि दिपून जाऊन "अनाद्यंत तें हेंच नव्हे का?" असें मी उद्गारल्यें. कोणीसें मला या क्षणीं उचलून घेतलें.

"अनाद्यनन्त तें हेंच लाडके. अनाद्यनंतांतच खरं प्रेममिलन व्हायचें! अनाद्यनंतांतच खरा जीवनयोग घडावयाचा!"

मला उचलून घेणारी व्यक्ति असें ह्मणतांच मीं डोळे उघडून पाहिलें. तों ती व्यक्ति ह्मणजे सुधाकर होत, यांत आश्चर्य कसलें?

---

प्रकरण एकविसावें

## 'परिसमाप्ति'

येथवर सांगितलेल्या गोष्टी घडून आज उणें पुरें वर्ष झालें आहे. स्वामिमहाराजांचा आशिर्वाद घेऊन आह्मी दोघें आपल्या जन्मभूमींत-प्रिय महाराष्ट्रांत-आलों व मंगल विधिसंस्कारानें बद्ध होऊन महाबळेश्वरास एका रमणीय स्थळीं आमचा आश्रम बांधून तेथें रहात आहोंत. येथें आम्हाला जग हें नंदनवनासारखें सौंदर्यनिधान आनंदधाम असें वाटत आहे.

आह्मी स्वभूमीस येण्यापूर्वीच श्रीमंत आप्पासाहेब इहलोक सोडून गेले होते. उषेचें आणि डॉक्टर भास्कररावांचें लौकिकदृष्ट्या 'मंगल' झालें आहे व समाजांत मानानें आणि धनानें त्यांची योग्यता मोठी अशी समजली जात आहे. परंतु आमचे मार्ग भिन्न असल्यामुळें आमच्या भेटी क्वचितच होतात, हें सांगावयास हवेंच असें नाहीं.

## समर्पण

भगिनी सौ. गीताबाई यांनीं ही अध्यात्मकथा मला सांगितली, तशीच शब्दन् शब्द मी लिहून काढून, सौभाग्यविहीन भारतिचरणीं समर्पण करतों.

चरणरज

**'भालचंद्र'**

---